माझ्या लाडक्या

कल्पनेस—

तिच्यामुळें माझें घर सदा हसत खेळत असतें

# लग्नाचा वाढदिवस १

आपल्या चार फुटाच्या डबल बेडवरची साडेतीन फूट जागा अडवून बंडू औरस चौरस झोपला होता. आणि सामानानें भरलेल्या बॅगेच्या कोपऱ्यांतल्या फटींत जुनें पातळ कोंबावें तशी स्नेहलता उरलेल्या अर्धा फूट जागेंत सामावली होती. कुठच्याहि फुटबॉल टीममध्यें शोभावा असा बंडू होता. विणकाम करून स्नेहलतेनें ज्यांचें मधुमीलन उशीच्या अभ्र्यावर घडवलें होतें, तीं दोन पांखरें बिचारीं बंडूच्या डोक्याखाली चिरडलीं होतीं. स्नेहलता बकरीनें ओरबडलेल्या लतेसारखी होती. अंगावर घेतलेल्या रगाखाली ती चिरडली होती. बंडूची एक तंगडी कॉटच्या कडेवरून खालीं लोंबत होती. दुसऱ्या बाजूनें स्नेहलतेच्या वेणीची लता लोंबत होती.

कॉटखालीं बसलेल्या मांजरीच्या पिलाला प्रश्न पडला कीं बंडूच्या तंगडीला ओरबाडावें का स्नेहलतेच्या वेणीला चावावें. यांत्रिक बाहुलीप्रमाणें त्यानें टकमक टकमक दोन्ही दिशांना पाहिलें आणि अखेर स्नेहलतेच्या वेणीवर हल्ला चढवला. स्नेहलता जागी झाली. क्षणभर तिला वाटलें कीं आपलें डोकें म्हणजे टाचण्यांचें घर आहे. आणि मग तिला वाटलें कीं आपण कुठच्या तरी गोड ओढीनें जाग्या झालो. तिला एकदम आठवलें. गडे ! त्याच्या लग्नाचा वाढदिवस होता आज ! प्रीतीचें आइसफरूट खात आठवणींचीं अनेक गोडस बालकें तिच्या हृदयात नाचूं बागडूं लागलीं.

किती झटकन् गेलें होतें एक वर्ष ! सिनेमांतल्या गाण्यासारखें, अगदीं गोड

गोड भावगीतासारखें जीवन जगलीं होतीं तीं दोघें ! एक एक दिवस कसा इंग्रजी चित्रपटासारखा चुंबनांनीं भरलेला होता. फॅमिलीरूममध्यें बसून दोघांनीं एकदां एकमेकांना आइसक्रीम भरविलें होतें. त्या आठवणीनें तिच्या अंगावर शिरशिरी आली. जुहूच्या किनाऱ्यावर तीं गेली असतां एकदां बंडूनें तिला उचललें होतें आणि पाण्यात टाकायची धमकी दिली होती. इतकी सुंदर किंचाळली होती ती तेव्हां ! एकदां घरीं बंडू तिला खांद्यावर घेऊन आपल्या मतानें इंग्रजी गाणें म्हणत नाचला होता ! त्यानें तिला कपड्यांच्या कपाटांत बंद करून ठेवलें होतें आणि तिला हँगरवर अडकवतां येत नाहीं म्हणून दुःख केलें होतें. आणि एकदां तर त्यानें तिचा सॅटिनचा जंपर टराटरा फाडला होता ! फाजील नाही तर ! तिनें हें कुणाकुणाला सांगितलें नव्हतें. फक्त आपल्या एका जिवलग मैत्रिणीला काय तें सांगितलें. आणि मग तिनें आपल्या नवऱ्याजवळ तसेंच करण्याचा हट्ट धरला असावा. त्याशिवाय का आठ दिवसांत ती हसतहसत सांगत आली कीं, आपल्या नवऱ्यानेंहि तसेंच केलें म्हणून ! हीं बायकांचीं वर्मे बायकांनाच समजतात !...

प्रीतीचा विजेचा पंखा तिच्या हृदयांत गरगरू लागला. तें वारें तिच्या डोक्यात भरलें आणि लडिवाळपणें तिनें बंडूच्या कानात कुर्रर केलें. बंडूनें आपल्या गालाच्या दिशेनें एक थप्पड मारली आणि ती स्नेहलतेच्या नाकावर बसली. रागवायला अवसर मिळायच्या आंतच ती आपल्या प्रियकराच्या कानांत दोनदां फडाफड शिकली.

बंडूनें डोळे उघडले.

स्नेहलता त्याच्या हाताला चावत म्हणाली, " गडे, ऐकलं का ?"

बंडू म्हणाला, " नाहीं ! " आणि तिच्याकडे पाठ फिरवून पाय पोटाशीं घेऊन झोपीं गेला.

"असें काय गडे करायचें !" लडिवाळपणें बंडूच्या कानाची पाळी कुस्करली गेली.

बंडूनें पाय अधिकच पोटाशीं घेतले.

" रागावेन हं मी अशानें !" अधिक लाडिकपणा.

आणि मग अखेर ती खरोखरीच रागावली. बंडूला तिनें गदगदा हलवून जागें केलें. बंडू कष्टानें डोळे उघडून म्हणाला, " अग काय ?"

" काय म्हणजे ? लग्नाचा वाढदिवस आहे आज आपल्या ! " एखादें वॉरंट बजावावें अशा थाटांत स्नेहलता म्हणाली.

" अग, मग सागितलें नाही का काल, साखरभात कर म्हणून ? " बंडू पुन्हा झोपण्याच्या तयारीनें म्हणाला.

" खाण्यापलीकडे सुचायचें नाहीं यांना कांहीं. मुळींच नाहीं करणार साखर-भात. " स्नेहलता सात्त्विक संतापानें म्हणाली.

बंडूची झोप उडाली. तावातावानें बिछान्यावर हात आपटीत तो म्हणाला, " का म्हणून नाही करणार ? कालच एक रत्तल साखर मिळवून आणली आहे मीं. "

" मु–ळीं क–र–णा–र ना–हीं ! " प्रत्येक अक्षर सुटें सुटें उच्चारीत स्नेहलता जोरदारपणें म्हणाली.

" तूं नाहीं—तुझा काका करील. " बंडूचें माथें भडकलें.

" तुमचा. "

" तुझा. "

" नाहीं तुमचा. "

" नाही तुझा. "

" वॅ–व्वॅ–वॅ–वॅ–वॅ–वॅ–वॅ–" स्नेहलतेनें वेडावलें. आणि ती स्वतःच रडूं लागली.

रडतां रडतां जेव्हां तिनें एकदोनदां किलकिल्या नजरेनें बंडूकडे पाहिलें तेव्हां बंडू कर्तव्यबुद्धीनें म्हणाला, " अग ! काय, झालें काय ? "

" तुम्हांला कांहींसुद्धां वाटत नाहीं. माझ्यावर मुळींसुद्धां प्रेम नाहीं तुमचें. दुष्ट आहांत तुम्ही. " आरोपपत्रिका वाचण्यांत आली.

" सारखे छळत असतां मला. मी एकदां मेलें म्हणजे समजेल. " बंडू पुरवणी पुटपुटला.

" काय म्हणालांत ?" बंडूचें बोलणें ऐकण्याकरितां रडणें थांबलें.

" अशी काय बरं रागावतेस ? " बंडू आपल्या चेहऱ्यावरून कांहीं भावनेचे

ओघळ वहावे असा प्रामाणिक प्रयत्न करूं लागला. परिणाम इतकाच झाला कीं त्याच्या चेहऱ्यावर बऱ्याच सुरकुत्या पडल्या.

हुंदके अधिकच मोठमोठे झाले. ही रडणें बंद व्हायची पूर्वसूचना आहे हें बंडू समजला. मग तो उठून प्रेमानें तिच्या मानेला गुदगुल्या करीत म्हणाला, " अशी काय बरें रडतेस ? चुकलें माझें. अं ? आता हस बरें. त्या फोटोत हसते आहेस तशी हस." बंडू कादंबरीच्या नायकासारखे काव्यात्मक बोलला. आणि आपल्या शर्टाच्या टोकानें त्यानें तिचे डोळे पुसले. शर्टचें टोक डोळ्यापर्यंत पोहोंचेना तेव्हा तिनेंच आपलें तोंड पुढें केलें. भावना आणि व्यवहार ह्यांची बायका नेहमींच अशी गोड सांगड घालतात !

नंतर दोघांनीं थोडा वेळ प्रेम केलें. म्हणजे स्नेहलतेचें अणकुचीदार कोपर बंडूच्या पोटांत खुपसलें. आणि तिचे केस बंडूच्या शर्टच्या बटनात अडकले.

मग स्नेहलता टुणकन् उठली आणि म्हणाली, "गडे, आपण आता चहा पिऊं या. पण मीं काल आणलेला चहाचा सेट पाहिला का तुम्हीं ?"

"चहाचा सेट ?" बंडू संशयी मुद्रेनें म्हणाला.

"होय ना. इतका छान आहे. फार आवडेल तुम्हाला." स्नेहलता कपाटाच्या दाराशीं ओंबी खेळत म्हणाली.

चहाचा सेट बंडूच्या पुढें आला. "किती छान आहे नाहीं का ? त्या गोखल्याच्याकडे आपण पाहिला ना, तसलाच आहे."

"कप फार पातळ आहेत. फुटतील लवकर."

"ठेवा बरें तुम्ही खाली. नाही तर फोडून टाकाल."

"पण कप फार लहान आहेत. एवढा चहा मला पुरायचा नाहीं." बंडू असंतुष्टपणें म्हणाला.

"इश्श ! असें काय करतां ? तुमच्याकरितां नाहीं तो. पाहुण्यांकरितां आहे." मानेला एक वळसा देत स्नेहलतेनें खास मुंबईच्या व्यवहारीपणाचा एक वळसा उगाळला.

"बरें ! ह्याला किंमत काय पडली ?" बंडूनें मुद्द्याला हात घातला.

"कित्ती छान आहे. आवडला ना तुम्हांला ?" स्नेहलतेचें लक्षच नव्हतें.

"किंमत किती पडली?"

"त्या गोखल्यांच्याकडे आहे. मग आपल्याकडे नको वाटतें?"

"पण किमत सांगशील कीं नाहीं?"

"एकदा घेतला म्हणजे मग कायमचा होतो. पुन्हा पुन्हा का घ्यायच्या असतात अशा वस्तू?"

बंडूनें जबरदस्त आत्मसंयमन केलें. आणि टाइम्समधला पॉपचा विनोद समजावून घेण्याचा तो प्रयत्न करूं लागला.

"फार नाहीं कांहीं. पंचवीस रुपये तर पडले."

"पंचवीस रुपये?"

"इश्श! आज लग्नाचा वाढदिवस. आज नाहीं वाटतें हौस करायची?"

"अग पण! गेल्या रविवारींच स्वतःचा वाढदिवस म्हणून नाही का तूं हौस केलीस?"

"इतकें असलें तर संक्रातीला तुम्ही मला पातळ देणार आहांत तें देऊं नका."

"पण मीं कधीं म्हटलें संक्रांतीला पातळ देईन म्हणून?"

"वा! वा! शहाणेच लागून गेलांत मोठे. उद्यां म्हणाल कीं पाडव्याला सोन्याची चेन देणार नाहीं म्हणून!"

ह्यापुढें बोलण्यांत कांहीं शहाणपणा नव्हता. बंडूनें आपला राग व दुःख चहाबरोबर गिळलें. चहा प्यायल्यानंतर बंडू वर्तमानपत्र वाचूं लागला. थोड्याच वेळांत बंडूच्या हातांतल्या वर्तमानपत्राला मध्यभागीं पोंगा आला. बंडूनें तो सारखा करण्याचा प्रयत्न केला तशीं पलीकडून आवाज आला. "थांबा! मी जरा क्रॉसवर्डची जाहिरात पहातें आहें."

"तुला हवाय् का टाइम्स?" वाचणें अशक्य झाल्यामुळें औदार्यानें बंडू म्हणाला.

"नको बाई! मला कुठें वेळ आहे? मला आहे घरांत काम."

हीं प्रश्नोत्तरें पुनः पुनः होत असतांना स्नेहलतेनें क्रॉसवर्डची जाहिरात, सिनेमाविषयक मजकूर, एका नटीच्या घटस्फोटाची हकीकत आणि एक

अपघाताची बातमी इतकें सगळें वाचून काढलें. आपण वाचलेल्या बातम्या नवऱ्याला सांगायला ती पतिपरायण स्त्री विसरली नाहीं.

"मला वाचतां येतेंय्." बंडू कडवटपणें म्हणाला.

"हो का!" असे उद्गार काढून स्नेहलता घरांत गेली. आणि ताबडतोब बाहेर येऊन म्हणाली, "आपल्या खोलीच्या ह्या कोपऱ्यांत रेडिओग्रॅम चांगला दिसेल नाहीं का?"

"रेडिओग्रॅम!" संकटाच्या चाहुलीनें चपापून बंडू म्हणाला.

"क्रॉसवर्डचें बक्षीस मिळाल्यावर नाहीं का मिळायचा आपल्याला? मग गडे त्याच्यावर टाकायला मी एक जाळीदार कव्हर विणीन."

"हं." सरसावून बसलेला बंडू आरामखुर्चीत खालीं घसरला आणि टाइम्स वाचण्यात गढून गेला.

थोड्या वेळानें ती पुन्हा बाहेर येऊन म्हणाली, "दाढी करायची वेळ झाली म्हटलें."

पुन्हा थोड्या वेळानें—"इश्श! अजून नाहीं का दाढी केली?"

पुन्हा थोड्या वेळानें हातांतला पेपर काढून घेत—"आतां गडे पेपर वाचणें पुरे झालें. आतां दाढी करा. मग आंघोळ करून घ्या आणि मग—"

बंडू डोक्यावर पेपरवेट मारून घेऊं लागला.

"फोडाल हं!" अशी सूचना देऊन ती प्रेमळ पत्नी घरांत गेली.

बंडूनें नतर यथाकाल दाढी केली व आंघोळ करून टॉवेल गुंडाळलेल्या अवतारात तो आरशापुढें उभा राहिला. त्यानें आपल्या दंडावर पसंतीचे गुद्दे मारले, आपल्या वाढणाऱ्या पोटावर नापसंतीदर्शक थापट्या मारल्या. मग आपल्या मानेला सिनेमानटाच्या ऐटीनें झटका देऊन आपले पिंजारलेले केस अधिकच पिंजारले. आणि अखेर 'लारीलप्पा-लारीलप्पा-लारीलप्पा-ला' ह्या रमणीय गीताचें गायन तो करूं लागला. कांहीं वेळानें 'मारीन लाफा-मारीन लाफा-मारीन लाफा-जा' अशी अर्थपूर्ण शब्दरचना त्यानें केली. एवढ्यांत खालून दणदणीत हाक आली.

"बंडू! बंडो! बंडोपन्त! बंड्या!"

गायनाच्या तंद्रींत बंडूला ती ऐकूं गेली नाहीं. पण आपल्या नवऱ्यानें आंघोळ केल्यावर कपडे घातले कीं नाहीं यावर देखरेख करण्याकरितां बाहेर आलेल्या स्नेहलतेला ती ऐकूं आली. अभावितपणें ती पुढें झाली. खालून आवाज आला, "अहो! अहो! शुत्! शुत्! बंडू आहे का?" स्नेहलता कपाळाला आठ्या घालून मागें सरकली. रस्त्यात उभें राहून दुसऱ्या मजल्यावरच्या माणसाशीं संभाषण करण्याचा अस्सल भारतीय परिपाठ तिला रानटीपणाचा वाटे.

बंडू दचकून म्हणाला, "कोण दत्तू का?"

स्नेहलता फणकाऱ्यानें म्हणाली, "मुळींच हाक देऊं नका. वर यायला काय होतें त्यांना? आणि चकचकीत बंडू काय म्हणतात. चांगलें कृष्णा नांव आहे, त्यानें हाक मारावी कीं."

पण बंडूचें गाढ मित्रप्रेम असल्या कुशंकांनीं बधणारें नव्हतें. तो पुढें सरसावला.

स्नेहलता निराशेनें म्हणाली, "निदान शर्ट तरी घाला अंगांत." पण तिचें वाक्य पुरें होण्याच्या आंतच उघडाबंब बंडू खिडकींतून ओथंगून प्रेमळ संभाषणांत मग्न झाला होता. रस्त्यांतल्या सगळ्या लोकांना साक्षी ठेवून हें संभाषण चाललें होतें आणि सारे लोक बावळटपणानें ह्या मित्रांकडे पहाण्याचें आपलें नागरिक कर्तव्य बजावीत होते.

आपला मुखचंद्र पूर्णपणें आकाशाकडे वळवून दत्तू म्हणाला, "काय रे! काल कुठें मेला होतास? खूप वेळ कट्ट्यावर वाट पाहिली तुझी."

"काल आमचा सुपरिन्टेंडेंट वारला होता ना, साला! त्याचेंहि काम मलाच पहावें लागलें. आठ वाजले घरीं यायला."

"मग आज दांडी का?"

"नाहीं रे! रिट्रेंचमेंट चालू आहे ना? डच्चू मिळायचा."

इथें रस्त्यावरच्या गाईनें दत्तूला ढुशी मारून संभाषणांत अडथळा आणला. दत्तू जरा पुढें सरकला आणि नंतर व्हिक्टोरियावाल्याला वाट देण्याकरितां मागे सरकून त्यानें एका सायकलवाल्याला पाडलें. बंडूनें वरून दम भरला, "काय रे! कशी सायकल चालवतो अं?"

दत्तूनें आवाज चढवला, "काय रस्त्यांतलें माणूस दिसतें कीं नाहीं?"

आणि स्नेहलता सभ्यपणाची ती भीषण हत्या अंगावर शहारे आणीत पहात होती.

दत्तूनें विचारलें, "मग आज कट्ट्यावर भेटणार कीं नाहीं?"

बंडूनें डोकें खाजवलें, "नाहीं बुवा! आज बायकोच्या लग्नाचा वाढदिवस आहे."

"आणि तुझ्या लग्नाचा कधीं आहे?" दत्तूनें मिस्किलपणानें विचारलें. बंडू गदगदून हसला. रस्त्यांतलींहि दोनचार टवाळखोर माणसें हसलीं. स्नेहलतेला मेल्याहून मेल्यासारखे झालें. तिनें बिछान्यात आपलें तोंड लपवलें आणि अंगावरून पांघरूण ओढून घेतलें.

सुदैवानें तेवढ्यांत कोणीं तरी भोपळ्याच्या साली दत्तूच्या तोंडावर टाकल्या आणि त्यामुळें तें प्रेमळ संभाषण थांबलें.

तें प्रेमळ संभाषण संपल्यानंतर घरामध्यें दुसरें प्रेमळ संभाषण सुरू झालें.

"तुम्हीं माझें अगदीं कांहीं ऐकायचें नाहीं असें ठरवलंय् ना." स्नेहलता कोपानें थरथरत म्हणाली.

"एवढं काय मनावर घेतेस? जाना दो."

"म्हणे काय मनावर घेतेस! आज वर्षभर पहातें आहें मी. कुठच्याच बाबतींत माझें ऐकत नाहीं तुम्ही. माझी तुम्हांला मुळींच किंमत वाटत नाहीं. प्रत्येक बाबतींत आपल्या मनाप्रमाणें वागायचें आणि सगळें हसण्यावारी न्यायचें."

"मग काय तुझ्यासारखा दिवसभर रडत आणि चिडत बसूं कीं काय? दिवसभर तेंच. वीट आलाय् मला ह्या खोट्या कांगाव्याचा."

"अगाई ग! मला वाटलेंच होतें हें सगळें असें होणार म्हणून. काय प्रेम केलें, काय सिनेमाला नेलें, काय वचनें दिलीं आणि आतां वर्ष नाहीं झालें तर पहा कसे उलटे फिरले ते!"

आणि असें मोठें कडाक्याचें भांडण झालें. सगळ्या उखाळ्यापाखाळ्या निघाल्या. प्रत्येक गोष्टीचा उलटा अर्थ लावण्यांत आला. स्नेहलता भडभडून रडूं लागली. बंडू विलक्षण उद्विग्न स्थितींत येरझारा घालूं लागला. दोघांनाहि

वाटलें कीं आपलें लग्न पूर्णपणें अयशस्वी झालें आहे. दोघांनाहि वाटलें कीं आपला ससार आतां कायमचाच भग्न झाला आहे. स्नेहलतेनें घर सोडून जाण्याचा निर्धार केला आणि जातांना बंडूनें दिलेल्या सगळ्या वस्तू कशा बाणेदारपणें परत करायच्या तेंहि ठरवून टाकलें. बंडूनें ठरविलें कीं सरळ खाणावळींत जाऊन जेवायचें आणि लग्नात सासुरवाडीहून मिळालेलें रिस्टवॉच स्नेहलतेच्या अंगावर भिरकावून द्यायचें. आत्महत्या करण्याचा विचार दोघांच्याहि डोक्यांत आला.

अखेर स्नेहलतेनें बंडूचा हात धरला आणि काकुळतीनें विचारलें, "खरेंच का मी तुम्हाला नकोशी झाल्यें आहें?"

बंडू तिला घट्ट हृदयाशीं कवटाळून म्हणाला, "तुझ्याइतकी मला कशाचीहि किंमत वाटत नाही. सत्तावीस दत्तूंच्यापेक्षां तू मला जवळची आहेस."

"जाऊं दे. कशाला उगीच आता तो विषय काढतां? माझेच चुकलें."

"तूं ढीग म्हणशील तुझें चुकलें म्हणून. पण मी साफ ऐकून घेणार नाहीं तें. सगळा गाढवपणा माझाच आहे." बंडू मुठी आवळून आणि डोळे गरगरा फिरवून म्हणाला.

त्यामुळें स्नेहलता घाबरून म्हणाली, "बरें बाई, तुमचेंच चुकलें. मग आतां पुन्हा तसें करूं नका म्हणजे झालें."

बंडूचा आवेश ओसरला. आपलें चुकलें असें कबूल करण्यांत आपलें चुकलें असें त्याला वाटूं लागलें. पण आतां बिचाऱ्याला आपलें म्हणणें मागे घेतां येईना. त्यामुळें त्यानें पुन्हा आवेशानें तेंच म्हटलें. आणि मग दोघानीं घरांत जाऊन साखरभात यथेच्छ चापला. दोघांनाहि फार गोड लागला तो आणि त्यामुळें दोघानाहि आपल्या प्रीतीच्या दिव्यतेची खात्री पटली.

जेवण झाल्यावर बंडूनें घाईघाईनें कपडे चढवले आणि जाण्यापूर्वी स्नेहलतेचें प्रेमातिशयानें चुंबन घेतलें. बंडूची अशी प्रामाणिक कल्पना होती कीं चुंबन घेतांना जेवढा मोठा आवाज काढावा तेवढें चुंबन अधिक प्रेमळ. त्यामुळें रबरी फुग्यावरून हात फिरवल्यावर जसा आवाज यावा तसा त्यानें चुंबन घेतल्यावर आला.

स्नेहलता फुरंगटून म्हणाली, "असें वाटतें घ्यायचें?" आणि मग नुकत्याच

पाहिलेल्या इंग्रजी सिनेमातील एक मिनिट टिकणारें चुंबन तिनें त्याला घ्यायला लावलें.

बंडू संध्याकाळीं लवकरच परतला. त्यानें स्वतःच्या वाटणीचा शिरा खाल्ला. मग स्नेहलतेच्या बशींतला खाल्ला आणि मग कालथ्याच्या टोकाला राहिलेला शिरा चाटीत तो म्हणाला, "हें कांहीं आपल्याला पसंत नाहीं बुवा. तूं कांहींच खाल्लेस नाहीं तर तुझी प्रकृति सुधारणार कशी?"

स्नेहलता खरोखरीच्या औदार्यानें म्हणाली, "तुम्ही खाल्लेंत म्हणजे माझें पोट भरतें."

पण बंडू म्हणाला, "असलें नाहीं चालायचें. तूं खाल्लेंच पाहिजे." तो आवेगानें उठला. कपाटाशीं झोबी खेळून त्यानें तें उघडलें आणि मग आंतून बिस्किटें, काजुगर वगैरे पदार्थ काढून मूठभर तिच्या तोडांत कोंबले आणि मग आपल्याहि तोडांत कोंबले. बायकोच्या प्रकृतीची काळजी घेण्याची नैतिक जबाबदारी अशा रीतीनें पार पाडल्यावर त्यानें समाधानानें आपल्या कपातला चहा संपवला आणि नंतर खेळकरणानें तिच्याहि कपातला थोडासा चहा घेतला.

चहा घेऊन झाल्यावर स्नेहलता लडिवाळपणें म्हणाली, "आतां कीं नॉय गडे आपण जूहूला जाऊ या."

"चला कीं." बंडू म्हणाला. आणि कपडे चढवूं लागला. तेवढ्यांत स्नेहलतेनें त्याला आपण विणलेला स्वेटर घालण्याचा आग्रह केला. बंडूच्या चेहऱ्यावर क्षणभर आडमुठेपणाची चमक उमटली. पण नंतर तो मवाळपणें म्हणाला, "घालूं या कीं! त्यांत काय मोठेंसें!" स्वेटरमध्यें त्यानें दोन्ही हात घातले आणि डोक्यांत घातला. तिथेंच तो अडकला. आपल्या दोन्ही हातांनीं तो खालीं ओढण्याचा प्रयत्न करीत बंडू जागच्या जागीं नाचूं लागला.

"असें करूं नका. फाटेल ना तो." स्नेहलता ओरडली आणि त्याच्या मदतीला धावली. अखेर सूत सूत खालीं सरकत तो स्वेटर एकदां डोक्याच्या खालीं सरकला. आणि बराच वेळ अदृश्य झालेलें जग बंडूला पुन्हा दिसूं लागलें. ह्या खटाटोपांत त्याचा चेहरा तळलेल्या भज्यासारखा दिसूं लागला होता. एक अगदीं नवीन पद्धतीची केशरचना त्याच्या डोक्यावर झाली होती आणि सुमारें पांच मिनिटें दीर्घश्वसनाचा व्यायाम आपोआपच त्याच्याकडून घडला.

स्नेहलता म्हणाली, " उगीचच तुम्हीं धांदल केलीत म्हणून तें असें झालें."

हसतमुखानें संमति दर्शविण्याचा बङ्कूचा इरादा होता. पण स्वेटर घातल्या-नंतर बरगड्या कोणीं आवळल्या आहेत असें त्याला वाटत होतें आणि त्यामुळें त्याला हसणें दुरापास्त झालें होतें. शिवाय वर वर सरकून पोट उघडें टाकण्याची वाईट सवय त्या स्वेटरला होती. आणि बंङ्कूच्या पोटाचा आकारहि ह्या त्याच्या सवयीला अनुकूल असाच होता. त्यामुळें तो पुन्हा खाली ओढण्याच्या कामांत बंङ्कूचे हात सदैव गुंतलेले रहात होते.

इकडे स्नेहलतेचा साजशृंगार सुरू झाला. बराच वेळ केसांतून फणी फिरवल्यानंतर तिनें हातातली फणी खाली टाकून दिली आणि ती रडव्या कातावलेल्या आवाजात म्हणाली, " मेलें वळणच जमत नाहीं केसांचें." खरोखरच तिच्या डोळ्यांतून पाणी आलें.

बङ्कू बोटानीं आपलें डोकें नागरत तिची समजूत काढण्याच्या उद्देशानें म्हणाला, " बरें जमले आहे कीं वळण."

" कप्पाळाचें बरें जमलें आहे. तुमच्यामुळें होतें हें सगळें."

" माझ्यामुळें ?"

" हो ! हो ! तुमच्यामुळेंच. तुम्हीच मला सागतां ना कीं केसांना पिना लावून घरात बसत जाऊं नकोस म्हणून."

" पण—पण तूं पिना लावल्यास म्हणजे तुझ्या डोक्यावर बरींच गळवें उठल्यासारखे दिसायला लागतें."

" दिसूं दे गळवें उठल्यासारखे. तुमचें डोकें अमेरिकन मोटारीसारखें मागच्या बाजूनें लाम्बोडकें आहे तें पहा आधीं." आणि झणकाऱ्यानें उठून केसांना वळण लावण्याचा प्रयत्न सुरू झाला. वळण जमल्यावर (!) तिनें पाठीवर लाडू ठेवल्यासारखा दिसणारा अंबाडा घातला. बंङ्कूनें तो पाहिला मात्र आणि प्राणपणानें त्याला तीव्र विरोध केला. तो ओरडला, " अंबाडा हा मानेवरच असला पाहिजे. त्याला पाठीवर असण्याचा काहींही अधिकार नाहीं अशी माझी तात्त्विक भूमिका आहे."

स्नेहलतेनें फिसकारून त्याला तीव्र विरोध केला. अंबाडा हा प्रांत तुमचा नव्हे असें बजावून सांगितलें. आणि अखेर त्यानें सपशेल माघार घेतल्यानंतर

तिनें चरफडत तो अंबाडा सोडून टाकला. "कांही म्हटल्या काही मनाला यायचें नाही." ती पुटपुटली.

"पण माघार नव्हती का घेतली मीं?"

"आधीं म्हटलेंतच कां पण तुम्हीं तसें?" एवढ्या वेळात इंग्रजी 'O'च्या आकाराचा पोकळ अंबाडा घालून झाला होता.

तेवढ्यांत बंडू कुतूहलानें म्हणाला, "आज तूं बॅंडमास्तरच्या हातातल्या काठीसारख्या दिसणाऱ्या आखूड आणि लठ्ठ दोन वेण्या का नाही घातल्यास?"

ह्यावर पुन्हा वादविवाद सुरू झाला असता, पण तेवढयांत वेणीवाल्याचें ओरडणें ऐकूं आलें. आणि बंडूला त्याला हाक मारण्याचा हुकूम सुटला.

बंडू कुरकुरला, "आपण वाटेंत घेऊ कीं! मला बुवा असें वरून रस्त्यांतल्या फेरीवाल्याला हाक मारणें आवडत नाही."

स्नेहलतेचे डोळे विस्फारले. पोकळ अंबाडा डगडगला. ती ओरडली, "आणि रस्त्यातल्या मित्राशीं वरून खिदळत गप्पा मारायला आवडतें ना तुम्हाला?"

"अग पण वेणीवाल्याला पुरुषानें हाक मारायची म्हणजे जरा चमत्कारिक वाटतें. शिवाय हे वेणीवाले नवऱ्यांकडे नेहमींच तुच्छतेनें पहातात आणि बायकांशीं आपला काही निराळा आणि नाजुक संबंध आहे असें दाखवत असतात. I hate them!" बंडूनें पल्लेदार वक्तव्य केलें.

"आतां चावटपणा नका करूं. मारतां कीं नाहीं हाक?" निर्वाणीचा हुकूम सुटला.

आणि मग वेणी घेण्याचा समारंभ झाला. अखेर सगळा नट्टापट्टा झाल्यावर दोघेजणं बाहेर पडलीं. स्नेहलता बंडूच्या कपड्यांकडे पाहून नाक मुरडतच होती. कारण शर्टचीं बटणें त्यानें उघडीं टाकलीं नव्हतीं. शर्टच्या हाताच्या बाह्या अर्धवट लोंबत्या ठेवल्या नव्हत्या. आणि कपाळावर मेलेल्या झुरळाप्रमाणें केस लोंबत ठेवले नव्हते.

थोड्याच वेळांत दोघें गिरगांवच्या रस्त्यांतल्या लोकगंगेत आणि स्वेदगंगेत सांपडलीं. आणि अगतिकपणें वहात चालली. स्नेहलतेला एकदां म्हणावेंसें वाटलें कीं हें पातळ कित्ती छान आहे. माझ्याकडे एक ब्लाऊज आहे त्याला अगदीं मॅचिंग आहे. पण तिच्या कानाजवळ एक घोडा फुरफुरल्यामुळें तो बेत

विरून गेला. आणि बंडू समजून भलत्याच एका गृहस्थाचा दंड धरून ती चालूं लागली. बंडू आपल्या शेजारून चाललेल्या स्नेहलतेचा हात धरून प्रेमाच्या कानगोष्टी करूं लागला. पण स्नेहलतेनें त्याचा हात झिंडकारून टाकला आणि "फाजील मेला" असे उद्गार काढले. बंडूनें दचकून तिच्याकडे पाहिलें. तेव्हा त्याच्या ध्यानात आलें कीं ती दुसऱ्या कोणाची तरी स्नेहलता होती. त्या स्नेहलतेचा बंडू रस्त्याच्या पलीकडच्या बाजूनं पहात चालला होता. तो सशयानें ह्या बडूकडे पहात होता. आणि हातवारे करीत जनगंगेचा प्रवाह ओलाडण्याचा अयशस्वी प्रयत्न करीत होता.

अखेर रस्ता ओलाडण्याच्या जागीं सगळे बंडू आपापल्या स्नेहलताना भेटले. आणि एकमेकाचे दंड पकडून शर्यतींतल्या खेळाडूंप्रमाणें तीं जोडपीं रस्ता ओलाडायला सज्ज झालीं. दोन मोटारींत मोठीशी फट दिसली तेव्हा बडू उत्साहानें पुढें धावला. पण अनिश्चितपणामुळें स्नेहलता मागे धावली. ती मागें राहिली असें पाहून बडू मागे फिरला. त्याच वेळेला स्नेहलतेला धीर आला आणि ती पुढें धावली. बडूनें तिचा हात धरला आणि दोघे पलीकडे जाण्याकरितां धावूं लागली. तीं रस्त्याच्या मध्यभागीं आली तेव्हा मोटारचें हॉर्न वाजलें. त्याबरोबर 'क्याक्' असा आवाज काढून स्नेहलता मागे पळत सुटली. आणि बंडू रस्ता ओलांडून पलीकडे गेला. त्यानंतर काही वेळ त्यानीं चक्रवाक पक्ष्यांची विरहावस्था अनुभवली.

दोघाचें मीलन झाल्यानंतर तीं स्टेशनवर गेलीं. लोकांच्या रांगेकडे बंडू बेगुमानपणानें पहात राहिला आणि स्नेहलतेनें तिकिटें काढली. नंतर गाडींत शिरण्याचा समारंभ झाला. तीं दोघे उतरली तेव्हा स्नेहलतेचें डोके उसकटलेल्या गवताच्या गंजीसारखे दिसत होतें. तिच्या इच्छेप्रमाणें बंडूच्या शर्टचीं बटणें सुटलीं होती. त्याच्या शर्टच्या बाह्या लोंबत होत्या आणि त्याचे केस मेलेल्या झुरळाप्रमाणें कपाळावर लोंबत होते.

जुहूच्या किनाऱ्यावर गेल्यावर बंडू तंगड्या पसरून बसला. स्नेहलता 'पोज' घेऊन बसली. तिनें वाळूंत दोघांचीं नावें कोरलीं. बंडूनें शहाळींवाल्याला हाक मारली. शहाळें खाऊन तृप्त झाल्यावर माडांच्या झाडाकडे आणि समुद्राकडे पहात तो म्हणाला, "अगदीं आफ्रिकेंतल्या जंगलात आहोत असें वाटतें." त्यानें आफ्रिकेंतील जंगल सिनेमात पाहिलें होते.

स्नेहलतेनें ओठ जुळवून मान हलविली. कुठल्याशा नटीसारखी. बंडू काव्यात्मक वृत्तीच्या आहारीं जाऊन पुढें म्हणाला, "वाटतें कीं नीग्रो लोक वल्हवत असलेल्या लांबड्या होडींत बसून सुसरींनीं भरलेल्या नदींतून प्रवास करावा."

"नको ग बाई!" स्नेहलतेनें अंगावर शहारे आणले, आणि बंडूचा दंड पकडला. मग एका कुत्र्याला घाबरून ती बंडूला बिलगली. बंडूनें शौर्यानें त्या कुत्र्याच्या अंगावर दगड मारला. असा एकंदर सगळा रोमॅंटिक प्रकार चालला होता. इतक्यात पलीकडे बसलेल्या दुसऱ्या जोडप्यांतली स्नेहलता हात पसरून म्हणाली, "किती तरी पाणी हें. फुकट चाललेंय् नुसतें! गोड असतें तर चोवीस तास नळ तरी आला असता."

तिच्या अरसिकपणाचें स्नेहलतेला हसूं आलें. आणि मग आपली रसिकता दाखविण्याकरिता ती म्हणाली, "कित्ती कलरफुल दिसतंय् नाहीं का? अगदी टेक्निकलर पिक्चरसारखें दिसतेंय्."

बंडूनें मान डोलविली आणि अंधार पडला असें पाहून तिच्या मांडीवर डोकें ठेवलें.

प्रेमाची दिव्यता बराच वेळ अनुभवल्यानंतर तीं मुंबईला परतलीं. एका फॅशनेबल हॉटेलांत दोघें चमचमीत जेवली. बंडूनें वेटरकरितां आठ आणे टिप् ठेवली. स्नेहलतेनें त्यांतले चार आणे कमी केले. मग स्नेहलतेनें सुगंधी सुपारी खाल्ली. बंडूनें पान खाल्लें.

घरीं आल्यावर बंडू विशेषच प्रेमाच्या भरांत आला. नेहमींप्रमाणें स्नेहलतेचें अणकुचीदार कोपर बंडूच्या पोटांत टोचलें. आणि तिचे केस बंडूच्या शर्टच्या बटनांत अडकले. एवढ्यांत स्नेहलता म्हणाली, "अय्या! खरेंच गडे! जेली संपली आहे."

बंडूची प्रेमाची धुंदी खाडकन् ओसरली. तो संन्यस्त वृत्तीनें आपल्या चार फुटांच्या डबल बेडवर साडेतीन फूट जागा अडवून झोपीं गेला. आणि उरलेल्या अर्धा फूट जागेंत बॅगेच्या कोपऱ्यांत कोंबलेल्या जुन्या पातळाप्रमाणें स्नेहलता झोपली.

★★★

# बसचं तिकीट २

ट्रॅमचें अगर बसचें तिकीट काढणें अगर तें न काढतां प्रवास करणें ही मुंबईकराच्या जीवनातील अगदीं मामुली आणि रोज घडणारी गोष्ट आहे. मुंबईकर ह्या गोष्टीचा कधीं विचार करीत नाही. जो तिकीट काढणारा असतो तो कंडक्टरनें कट्कट् असा आवाज केल्यावर खिशातून एक नाणें काढून कंडक्टरकडे न बघताच त्याच्या हातावर ठेवतो आणि समोरच्या दिशेला बोट करतो. कधीं तो नुसती मान हलवतो तर कधीं दोन शब्द पुटपुटतो. आणि मग तो शेजारच्या मित्राशीं बोलूं लागतो अगर आपल्या हातांतल्या कागदपत्रांची चाळवाचाळव करूं लागतो. तिकीट काढणारा नसतो तो घड्याळाच्या पट्ट्यांत अडकवलेलें जुनें तिकीट ऐटींत मनगट झटकून दाखवितो, अगर काढलें आहे असें आत्म-विश्वासपूर्ण मानेनें खुणावतो, किंवा पुस्तक वाचण्यांत नाहीं तर खिडकीबाहेर बघण्यांत तो फारच गढून जातो. इतका कीं कंडक्टरनें केलेला कट् कट् असा आवाज त्याला ऐकूंच जात नाही. हें सगळें अगदीं साहजिकपणें घडतें, पुष्कळदां हें घडतें आहे ह्याची मुंबईकराला जाणीवहि नसते.

बंडूचादेखील अनेक वर्षे असाच अनुभव होता. आणि पुढेंहि अनेक वर्षें त्याला तसाच अनुभव येत राहिला असता, पण एक दिवस जरा चमत्कारिक गोष्ट घडली. आपण तिकीट काढून घड्याळाच्या पट्ट्याखाली अडकवलें आहे अशा कल्पनेनें बंडू बसमधून खाली उतरत असतां इन्स्पेक्टरनें त्याचें बकोट पकडलें. बंडूनें खसकन् आपलें बकोट सोडवून घेतलें आणि तो गुरगुरला, "बेवकूफ! क्या है?"

'बेवकूफ' ही बंडूची विशेष आवडती शिवी होती आणि 'क्या है?' ह्यापलीकडे त्याला राष्ट्रभाषेचें ज्ञान नव्हतें.

इन्स्पेक्टरनें त्याचें बकोट पुन्हा पकडलें आणि म्हटलें, "तिकीट बताव."

बंडूनें स्वतःला सावरून म्हटले, "तो ऐसी सीधी बात करो ना."

"तिकीट बताव." इन्स्पेक्टर त्याचें बकोट न सोडतां निर्विकारपणें म्हणाला.

बंडूनें घड्याळाला पट्ट्याखाली अडकवलेलें तिकीट त्याच्या हातांत दिलें. आणि आपलें बकोट सोडवून घेऊन पुढें जाण्याचा प्रयत्न करीत तो म्हणाला, "अरे भाई! जाने दो? ऑफिसकु लेट होएंगा ना!"

इन्स्पेक्टरनें आपला हात ताठ करून त्याला लटकत म्हटलें, "सबूर करो."

त्यानें हात ताठ करून अडवल्यामुळें बंडूच्या मानेला हिसका बसला होता. त्यामुळें चिडून बंडू एका खरमरीत उत्तराची राष्ट्रभाषेत रचना करूं लागला. तेवढ्यांत इन्स्पेक्टर त्याचें तिकीट उलगडून पहात म्हणाला, "ये तिकीट नही चलेगा."

बंडू चमकला. "कैसा नही चलेगा?"

"चलो. दो रुपया निकालो. Your name please!" इन्स्पेक्टरनें पेन्सिल सरसावली; आणि साभिप्रायपणें आजुबाजूच्या माणसाकडे पाहिलें. आजुबाजूचीं माणसें गालातल्या गालांत हसली. 'हा सूटबूट घातलेला संभावित डाकू दिसतोय!' असा अभिप्राय त्यांच्या नजरेंत तरळत होता.

तो अभिप्राय पाहून बंडू अधिकच चिडला. (तेवढ्या वेळांत त्याच्या असेंहि ध्यानात आलें होतें कीं, आपण तिकीट काढायला विसरलो होतो.) आपला आवेश व्यक्त करायला हिंदी भाषा अपुरी आहे असें पाहून तो इंग्रजींत म्हणाला, "Why should I pay two rupees? I just forgot."

"Yes. Yes. You forgot. That is why you have to pay to rupees." इन्स्पेक्टरनें पुन्हा पेन्सिल सरसावली.

तेवढ्यात बसमधले लोक घाई करूं लागले. दोन रुपये देऊन प्रकरण मिटवून टाक असा उपदेश करूं लागले. पब्लिकला उगीच हैराण न करायचा आदेश देऊं लागले, घड्याळाकडे पहात "च्! Nonsense!" असें म्हणूं लागले. भकास चेहऱ्यानें आकाशाकडे पहात आपल्यावर मोठी आपत्ति कोसळली आहे

असा आविर्भाव करूं लागले. हातांतले रुमाल गरगर फिरवूं लागले. फक्त दोन आण्यांकरितां अशी लबाडी करणाऱ्या लोकाबद्दल तुच्छता दाखवूं लागले. भिकाऱ्याला 'पुढें जा' असें सांगताना जसा कपाळाला हात लावतात तसें बंडूकडे पाहात करूं लागले.

रस्त्यावरचीं दोन पोरें उगीचच्च 'हेऽऽ' असें बंडूच्या कानाशीं ओरडलीं आणि पळून गेलीं. बंडू जेव्हां चेवानें त्याच्यामागे धावण्याचा प्रयत्न करूं लागला तेव्हां इन्स्पेक्टरनें त्याला अडवलें आणि म्हटलें, "Pay two rupees and then go"

आता मात्र बंडू बेफाम झाला. तो इंग्रजींत ओरडूं लागला, "तुम्ही बस कंपनीचे लोक महाउर्मट झालेले आहात. तुम्हाला माणसाची पर्वा नाही. आज काय मी पहिल्यादाच बसमध्यें बसतोय् कीं काय? आज दहा वर्षं बसमधून प्रवास करतोय. कधीं तिकिट काढल्याशिवाय राहिलों नाही. मला तुम्ही चोर समजतां कीं काय? मी जगप्रसिद्ध कियु-शियु बँकेत नोकरीला असतो. मी वकील करीन आणि हा खटला लढवीन. हायकोर्टात लढेन..."

ज्या उच्च पातळीवरून बंडू बोलत होता त्या पातळीवर पोहोचण्याची त्याच्या श्रोतृवर्गाची तयारी दिसली नाही. उलट, त्याच्याभोवतीं जमलेला जमाव माना वाकड्या करून करमणूक करून घेण्याच्या कल्पनेनें त्याच्याकडे पाहात होता. त्यामुळें बंडूचा वीररस त्याला स्वतःलाच मिळमिळीत वाटूं लागला. शिवाय इतके बोलल्यामुळें त्याला दम देखील लागला होता. त्यामुळें तो थांबला.

इन्स्पेक्टर आता चिडून म्हणाला, "Are you paying or shall I take you to the police-station ?"

तेवढ्यांत जमलेली गर्दी पाहून पोलिसदादा दंडुका हलवीत-हलवीत तेथे आला आणि दोन-चार पोराना पिटाळून आणि थोराना मागे हटवून पुढे सरकत म्हणाला, "काय गडबड आहे?"

त्याचा हात आपल्या मानेवर पडायला शिवशिवत आहे असें ध्यानांत आल्यामुळें बंडूनें कच खाल्ली. आणि तो खिशांतून दोन रुपये काढून इन्स्पेक्टरच्या अंगावर भिरकावीत म्हणाला, "अच्छा. Take this money"

त्या 'अच्छा' मध्यें त्यानें शक्य तितकी तुच्छता ओतली होती. मग तो

बेदरकारपणें निघून जाऊं लागला. पण इन्स्पेक्टर पेन्सिल सरसावून म्हणाला, "Your name please?"

पोलिसानें मित्रत्वाच्या भावनेनें त्याच्या खांद्यावर हात ठेवून त्याला अडवलें आणि इन्स्पेक्टरनें जे त्याला इंग्रजींत थोडक्यात सांगितलें होतें तेंच राष्ट्रभाषेत विशेष विस्तारानें सांगितलें.

अखेर बंडू ओरडला, "समजा! समजा! मला सऽब समजा." आणि त्यानें आपलें नांव, पत्ता वगैरे इन्स्पेक्टरला सांगितलें. इन्स्पेक्टरच्या सरसावलेल्या पेन्सिलीचा उपयोग झाल्यानतर बंडू हताशपणें ओरडला, "अबी तो सब हो गया? Is everything over now? संपलें ना आता सगळें?"

इन्स्पेक्टरनें त्याच्या हातांत दोन रुपयाची पावती खुपसली आणि तो मान हालवून म्हणाला, "Yes,"

आणि सुरू झालेल्या बसला लोंबकळत तो निघून गेला. बंडू बोटांनीं केस नांगरीत चालूं लागला तेव्हां दोन-चार पोरें त्याच्यामागे ओरडत धावलीं. आणि त्यांचा उत्साह मावळतो न मावळतो तों मिस् नंदिनी सप्रेबरोबर ऑफिसकडे जाणारा अरविंद फडके त्याला हेटाळणीच्या स्वरांत म्हणाला, "काय लेका बंड्या, परवां इन्क्रिमेंट घेतलेंस आणि दोन आण्याकरिता असें करतोस अं?"

नंदिनी सप्रे नाकाला सुरकुत्या पाडून तिरस्कारानें हसली.

आणि आपण गाडीच्या चाकाखालीं चिरडलेलें झुरळ आहों असें बंडूला वाटूं लागलें.

त्यानंतर बंडूनें जबरदस्त हाय खाल्ली. त्याचा जीवनाकडे पाहण्याचा बेडर दृष्टिकोण मोडक्या चष्म्याप्रमाणें त्याच्या नाकावर बसेना. आत्मविश्वास तो कसा त्याला वाटेना. आपले केस आपल्या डोळ्यांवर आले आहेत, आपला शर्ट् आपण उलटा घातला आहे, आपल्या नाकावर गळूं झालें आहे, असें त्याला सारखे भासूं लागलें. कां कोण जाणे, पण लहानपणीं त्यानें अर्धी चड्डी घातली असतांना एकदां लंगोटीचें टोक तिच्यांतून लोंबत होतें त्या प्रसंगाची त्याला आठवण झाली. आपल्याला एकोणीसशें अठ्ठेचाळीस सालच्या जुन्या फायलींत कोणा तरी कारकुनानें फाईल करावें असें त्याला वाटूं लागलें. होल्डरनें

शाईचे शिंतोडे सगळ्या माणसांच्या अंगावर उडवावे अशी विचित्र इच्छा त्याला झाली.

बसमधून प्रवास करतांना जीं अनेक संकटें येण्याची शक्यता असते त्यांची त्याला आठवण झाली. तंगड्या वर करून मेलेला उंदीर पडावा त्याप्रमाणें कोलमडून पडलेल्या एका बसचें टाइम्समध्यें आलेलें चित्र त्याच्या नजरेसमोर आलें. आपण आत चढल्यावर धक्का देऊन बस सुरू झाल्यामुळें आपण कोलमडून रस्त्यांत फेकले जात आहोंत असें चित्र त्याच्या नजरेसमोर आलें आणि टिपकागदाआड त्यानें आपले तोंड लपवलें. बसमधून आपण पडूं नये म्हणून त्यानें खूप प्रयत्न केले आणि अखेर तो मोठ्या प्रयत्नानें वरच्या मजल्यावर पोहोंचला. पण तेथें गेल्यावर बसचा एकदम ब्रेक लागल्यामुळें तो एका सुंदर युवतीच्या मांडीवर कोसळला. त्यामुळें चिडून तिनें त्याला आपल्या उंच टाचांच्या बुटानें बडवायला सुरुवात केली. तो मार अपुरा वाटून कीं काय एका सैनिकानें आपले लष्करी बूट काढले. तें पाहून बंडूनें किंचाळी फोडली. आणि वरच्या मजल्या-वरच्या ज्या एमर्जन्सी एक्झिटचा उपयोग कसा करायचा ह्याचा त्याला नेहमीं प्रश्न पडत असे त्याची कांच खळ्कन् फोडून त्यानें खाली उडी मारली...... बंडूनें डोके हलवलें आणि स्वतःला शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न केला. पण त्यानें किती प्रयत्न केला तरी बसमध्यें शिरून घोटाळे करण्याचा त्याचा उपक्रम थांबेना.

तो ह्या वेळीं बसमध्यें जाऊन व्यवस्थितपणें बसला. न विसरतां तिकीट काढण्याकरितां त्यानें खिशात हात घातला आणि शंभर रुपयांची नोट बस-कंडक्टरच्या हातांत दिली. बस्-कंडक्टरनें ती खिशात घातली. त्याला तिकीट दिलें आणि म्हणाला, "पैसा लाव."

बंडू आश्चर्यानें म्हणाला, "दिले ना पैसे?"

बस्-कंडक्टरनें आश्चर्य व्यक्त केलें. आणि सगळ्या उतारूंकडे बघून तो हात वाकडा करून म्हणाला, "देखो कैसा आदमी है."

बंडू चवताळून उठला आणि म्हणाला, "वा! शंभर रुपयाची नोट दिली मीं. आणि नाहीं म्हणतोस? बदमाष लेकाचा!"

बंडू त्याची मानगूट पकडणार होता. पण तेवढ्यांत सगळे उतारू खदखदा

हसूं लागले. आणि म्हणाले, "म्हणे शंभर रुपयांची नोट दिली! बसचें तिकीट काढायला कोणी शंभर रुपयांची नोट देतो कीं काय?"

ह्यावर बंडू किंचाळून म्हणणार होता, "पहा. त्याचे खिसे तपासून पहा.'

पण तेवढ्यांत एक लठ्ठ पारशी गृहस्थ उठून म्हणाला, "हा माणूस लफंगाच आहे. मागे एकदां बसचें तिकीट न काढल्याबद्दल ह्याला पकडलें होतें. पोलिसच्या स्वाधीन करा याला."

बस-कंडक्टरनें संमतिनिदर्शक मान हलविली. सगळ्यांनीं पोलिसला बोलवावें असा सूर काढला. आणि अखेर एक दयाळू उतारू बंडूला म्हणाला, "आतां मुकाट्यानें रस्ता धर कसा. नाहीं तर फुकट तुरुंगांत जाशील."

डोळ्यावर केस आलेला बंडू मुकाट्यानें खालीं उतरला.

छे! छे! भयंकर! फार भयंकर! साधा बसचा प्रवास तो काय! हजारो माणसें तो हजारो वेळां करतात. पण बंडू तसा प्रवास करूं लागला म्हणजे त्याच्यावर अशीं हजारो संकटें कोसळावीं ना? परमेश्वराचा न्याय तरी काय पाहा! आणि इतकें करून पुन्हा बंडू आपला बसमध्यें शिरण्याकरिता धडपडत होताच!

बंडूनें डोक्यावर पेपरवेट् मारून घेतलें. शर्टाची कॉलर घट्ट दाबून स्वतःला गुदमरवण्याचा त्यानें प्रयत्न केला. आणि अखेर उठून तो चहा प्यायला गेला. कारकून चिडला म्हणजे जास्तींत जास्त इतकेंच करूं शकतो.

त्या दिवशीं संध्याकाळीं बंडूनें निरनिराळ्या कामांच्या व खरेदी करण्याच्या सबबी काढून बसनें जाण्याचें टाळलें. चालत-चालत धापा टाकीत तो जेव्हां घरीं पोहोंचला तेव्हा स्नेहलता त्याला सामोरी आली आणि म्हणाली, "अय्या! किनई गडे! मी आज दादरला गेलें होतें. आणि येतांना दादरपासून ऑपेरा हाऊसपर्यंत कंडक्टरनें मला तिकीट विचारलेंच नाहीं. मी फुकट आलें."

तें ऐकून बंडू चवताळला. "फार घाणेरड्या सवयी लागल्या आहेत तुला, स्नेहल. तूं सरळ समोरच्या वाण्याकडून काळ्या बाजारांतली साखर आणतेस. कोंकणांतून पातळांच्या घड्यांतून पोहे आणतेस आणि बिगरतिकीट प्रवास करतेस."

" मग ? सगळींच माणसें असें करतात." स्नेहलतेनें त्याला उडवून लावण्याचा प्रयत्न केला.

" सगळीं माणसें गाढव आहेत; मी तुला सांगतोंय् कीं असें करायचें नाहीं. This is immoral and illegal."

" आले मोठे शहाणे !" स्नेहलतेनें गाल फुगवले.

" एकदां तिकिटाशिवाय प्रवास केल्याबद्दल पकडतील तेव्हां समजेल."

" आधीं मुळीं बायकांना तिकीट विचारीत नाहीत. आणि उतरायच्या आधीं मी वाकून बघतें खालीं इन्स्पेक्टर आहे कीं नाहीं तें." स्नेहलतेनें आपली चतुराई सांगितली.

" हें पहा ! ते इन्स्पेक्टर मोठे लुच्चे असतात. कुठें तरी लपून बसतात आणि मग दत्त म्हणून तिकीट मागायला उभे रहातात. तेव्हा तुझी हुषारी ठेव बाजूला आणि तिकीट काढीत जा बसचें." बंड्र अधिकारवाणीनें म्हणाला.

स्नेहलतेनें मानेच्या एका झटक्यानें त्याच्या अधिकाराचा अधिक्षेप केला.

तेव्हां बंड्र चिडखोरपणानें म्हणाला, " माझें तूं ऐकणार नाहीस हें मला माहीत आहे. पण निदान एवढें तरी ध्यानात ठेव कीं इन्स्पेक्टरनें पकडल्यावर मोटमोठ्यानें त्याच्याशीं भांडत बसू नको. मुकाट्यानें दोन रुपये भर. नाहीं तर उगीच रस्त्यांत तमाशा करीत बसशील."

" भांडत बसायला मी काय वेडी आहें कीं काय?" स्नेहलतेनें त्याच्या बोलण्यात कांहीं अर्थ नाहीं असें पुन्हा सूचित केलें.

" तें नको सांगूं ! चांगली-चांगलीं माणसेंदेखील अशा वेळीं चिडतात आणि मूर्खपणा करतात." बंड्रच्या आवाजाची टीप अधिक वर गेली.

" पण एवढ्या लहानशा गोष्टीवरून तुम्ही चिडताय् कशाला मघांपासून ! आज तुम्हाला पकडलें कीं काय इन्स्पेक्टरनें ?" स्नेहलतेनें धूर्त आणि सूचक प्रश्न विचारला.

बंड्र उत्साहानें म्हणाला, " छट् ! मी बसलोंय सापडायला ! मीं अशा कित्येक लोकांचें आणि इन्स्पेक्टरांचें पाणी जोखलें आहे. मात्र आज त्या अरविंद फडकेला पकडलें आणि चांगली जिरली गुलामाची. नाहीं तरी फार मिजास

करीत असतो लेकाचा. मीं त्याला सांगितलें कीं उगीच गडबड करूं नको. पण त्यानें ऐकलें नाहीं आणि मग बसला होता घोळ घालीत."

स्नेहलतेनें एकदां संशयीपणानें बंडूकडे पाहिलें. त्यामुळें आपण किती बेमालुमपणें वेळ मारून नेली ह्याविषयींच्या त्याच्या समाधानाला गळती लागली. आणि तो पुढे घाईने म्हणाला, "आणि लेकाचा सागत हिंडतोय कीं मलाच इन्स्पेक्टरने पकडलें! काय माणसें असतात एकेक!"

स्नेहलतेला जी शंका वाटत होती ती आतां खात्री झाली आणि ती बंडूला म्हणाली, "हें पहा. तुम्ही मात्र तिकीट न काढतां जाऊं नका हं बसमधून. तुम्ही आहात वेंधळे. उगीच पकडले मात्र जाल. आपलें बसमध्यें बसल्याबरोबर तिकीट काढावें आणि घड्याळाच्या पट्ट्याखालीं ठेवावें आणि इन्स्पेक्टरनें मागितलें कीं काढून द्यावें. आणि समजा, तिकीट नसलें तर मुकाट्यानें आपले दोन रुपये देऊन मोकळे व्हा. उगीच वितंडवाद घालून रस्त्यात स्वतःची शोभा करून घेऊं नका."

स्नेहलतेच्या बुद्धीविषयीं बंडूला नेहमींच आदर वाटत असे. पण हें तिचें बोलणें ऐकून मात्र त्याला अचंबा वाटला. जो उपदेश तो तिला करीत होता आणि ज्याप्रमाणें वागायचें तिनें नाकारलें होतें तोच उपदेश ती आतां शांतपणें आणि अधिकारवाणीनें त्याला करीत होती. आणि असें करण्यांत काही विसंगति आहे असें तिला तर वाटत नव्हतेंच, पण बंडूलादेखील तसें म्हणण्याची भीति वाटत होती.

बंडूनें आपलें सारें धैर्य एकवटून तिच्या बोलण्यांतील विसंगति दाखविण्या-करितां तोंड उघडलें, तेवढ्यांत स्नेहलता ओरडली, "किती वेळां सांगितलेंय मीं तुम्हाला कीं कोचावर पाय टेकूं नका म्हणून? आणि खिशांतल्या रुमालाचा बोळा केलात ना पुन्हां? मी म्हणते, जरा घडी राहिली रुमालाची म्हणून काय हरकत आहे?"

बगलेवर आणि पिछाडीवर असा हल्ला झाल्यामुळें बंडूचा तेजोभंग झाला. त्याच्या मनांत तयार झालेली बाणेदार वाक्यांची सेना उधळली गेली. बायको-बरोबर होणाऱ्या युद्धांत तो नेहमींप्रमाणें पराभूत झाला. तो पराभव त्याला डाचूं नये म्हणून स्त्रीसुलभ मुत्सद्देगिरीनें स्नेहलतेनें सरकारी कायदा मोडून आणलेल्या

पोह्यांचे खमंग बटाटेपोहे त्याच्यापुढें ठेवले. आणि तसें पाहिलें तर तिनें अशा प्रकारें त्याच्या जखमेवर मीठ चोळलें.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं बंडू उठला तेव्हां त्याची पराभूत मनोवृत्ति कुठच्या कुठें उडून गेली होती. आपण चाकाखालीं चिरडलेलें झुरळ आहोत असें आतां त्याला मुळींच वाटत नव्हतें. आत्मविश्वासानें छाती पुढें काढून तो आरशात बघत होता. आपल्या लहानशा खोलीत डुलत डुलत चालण्याचा प्रयत्न करतांना खुर्चीच्या पायावर पाय आपटून त्याला ठेच लागत होती आणि मग दोन्ही हातांनीं एक पाय उचलून धरून तो दुसऱ्या पायानें नाचत होता. खुंटीला टांगलेल्या टायला ठोसे मारण्याच्या प्रयत्नात स्वतःची मूठ भितीवर आपटून घेत होता. आणि स्नेहलतेला स्वतःचें संरक्षण करण्याकरितां तापलेली पळी सारखी हातात घेऊन बसणें भाग पडत होतें.

जेवण झाल्यावर त्यानें घाईघाईनें कपडे केले. टायची ग्वसकन् गांट मारली. त्यामुळें नको तें टोक लांब झालें आणि मग तें पाटलोणींत खोचणें त्याला भाग पडलें. त्या रागानें बुटाची नाडी खेचताच ती तुटून हातांत आली. आणि तिला योग्य ठिकाणीं गाठ मारता न आल्यामुळें दर पावलागणीक पाय बुटाबाहेर येऊं लागला.

खिशांत पाकीट न घेतां जेव्हां तो घराबाहेर पडूं लागला तेव्हां त्याला अडवून शांतपणें त्याच्या खिशात पाकीट ठेवीत स्नेहलता म्हणाली, "इश्श ! आज भांग नाही वाटतें काढायचा ?"

बंडू ओरडला, "मग ? आधीं कां नाहीं आठवण केलीस ?"

त्याला ऐकू जाईल अशा स्वरांत स्नेहलता पुटपुटली, "स्वतःचा भांग काढायचीदेखील आठवण करावी लागते कीं काय ?"

तें ऐकूं गेल्यामुळें बंडूनें जोरजोरांत पाय आपटले आणि पाडलेलला भांग सगळा विसकटून टाकूत तो बागुलबुवासारखा दिसूं लागला.

नवऱ्याच्या संतापाची अशी परमावधि झालेली पाहून व्यथित होण्याऐवजीं स्नेहलता खुसूखुसू हसूं लागली,

"असेच जा ऑफिसांत !" तिने सल्ला दिला. त्यामुळें अधिकच चिडून बंडूनें स्वतःचा भांग पाडला. आणि कंगवा फेकून देऊन तो बाहेर पडला.

ह्या एकंदर प्रकारामुळे बंडूचा आत्मविश्वास बराच खचला होता. पण अजूनहि आपण चाकाखालीं चिरडलेलें झुरळ आहों असें त्याला वाटत नव्हतें. आणि बस-स्टॅंडजवळ उभी राहिलेली एक बस पाहून तर त्याच्या अंगात उत्साह संचारला. एक बूट पायातून बाहेर पडत असतानादेखील तो धावला आणि एक सफाईदार उडी मारून त्यानें सुरू झालेल्या बसमध्यें प्रवेश केला. विजयी मुद्रेनें तो बसमध्यें जागा आहे का तें न्याहाळून पाहूं लागला.

तेढ्यांत कंडक्टरची दुष्ट नजर त्याच्याकडे वळली. त्यानें ताबडतोब घंटीची दोरी खेचली आणि हिसक्यासरशीं बस उभी राहिली.

"चलो. निकल जाव." कंडक्टरनें हुकुम केला.

खवलेल्या खोबऱ्यासारखें हास्य चेहऱ्यावर पसरीत बंडू म्हणाला, "अरे भाई! जाने दो! हम एकेलाही आदमी है."

"चलो! गाडीकी खोटी मत करो." कंडक्टरनें पुन्हा आपलें कर्तव्य बजावलें.

स्टॅण्डवरचे उतारू म्हणूं लागले कीं, आम्ही सगळे एकेकटेच आहोत आणि आणि अखेर बंडूला बसमधून उतरावें लागलें व रांगेच्या टोकाच्या शोधात तो नागमोडी वळणें घेत हिंडूं लागला. अखेर जेव्हा एका बोळात गेलेलें तें टोक त्याला सापडलें तेव्हा शांतपणें त्याच्या पुढच्या दोन पारशी बायानी आणखी आठ पारशी माणसांना त्याच्यापुढें जागा दिली. आणि येणाऱ्या-जाणाऱ्या पारशी माणसांना त्या उत्साहानें बोलावूं लागल्या. ऑफिसमध्यें जायला उशीर होत असूनहि तो कायदेभंग बंडूला मुकाट्यानें सहन करावा लागला. कारण फार जुना आणि जाणीता मुंबईकर असल्यामुळें पारशी बायका आणि कोळणी ह्यांच्याशीं भांडणें करणें केवळ अशक्य आहे हें त्याला अनुभवानें कळून चुकलें होतें.

अखेर बंडूची बसमध्यें बसायची जेव्हां पाळी आली तेव्हां त्याला पुन्हा आपण चाकाखालीं चिरडलेलें झुरळ आहोंत असें वाटूं लागलें होतें. त्यानें काढलेल्या भांगाचा जसा आतां त्याच्या डोक्यावर मागमूसहि राहिला नव्हता त्याचप्रमाणें आत्मविश्वासाचा कैफहि त्याच्या डोक्यातून साफ उतरला होता. त्याच्या कपड्यांची इस्तरी जशी बिघडली होती तशीच त्याची ऐटहि पार चुरगळून गेली होती. मुंबईची बस कंपनी आपल्या भारी किमतीच्या गाड्यांत आपल्याला पाऊल ठेवूं देते ही आपल्यावर मोठीच मेहरबानी आहे हें त्याला पटलें होतें.

मनांत आलें तर कोणीहि बस-कंडक्टर आपल्याला इमर्जेन्सी एक्झिटमधून बाहेर फेकून देऊं शकेल हें त्याला सपशेल मान्य होतें.

अंग चोरूनच तो बसमध्यें एका जागेवर बसला. आपल्या शेजारीं बसलेल्या लठ्ठ पारशाला आपला उपद्रव होऊ नये म्हणून कोपरें वाकडीं-तिकडीं करून त्यानें अंग चोरण्याचा प्रयत्न केला. त्यामुळें अर्थातच त्याचीं कोपरें त्या पारशाला टोचलीं आणि त्यानें आपल्या अर्ध्या चष्म्यातून बंड्ूला भेदून पलीकडे पाहिलें. बंडू म्हणाला, "Sorry! Sorry!" आणि पुन्हा कोपरें वाकडीतिकडीं करून त्यानें अंग चोरलें.

मग बंडूनें खिशातून चवलीचें नाणें काढलें आणि तें हातांत घट्ट धरून तो कंडक्टरची मार्गप्रतीक्षा वल्लभाच्या आतुरतेनें करूं लागला. कंडक्टर पुढच्या टोकाला तिकीट देत होता. एका उतारूनें त्याला पाच रुपयाची नोट दिली. तेव्हा कंडक्टरनें त्याच्याशीं दोन मिनिटें हुज्जत घालून मोड देण्याबद्दल कंपनीचा कानून काय आहे तें पटवून दिलें आणि मग आपल्या कोटाचा वरचा खिसा उघडून त्यानें ती मूल्यवान् मोड बाहेर काढली. मोड अपुरी आहे असें पाहून तो घाईघाईनें मागें जाऊन खालच्या कंडक्टरकडून मोड घेऊन पुन्हा घाईनें पुढें गेला. दोन्ही वेळेला बंडूच्या खांद्याला त्यानें चांगलाच धक्का दिला. पण एकदाहि बंडूनें आदरपूर्वक व अजीजीनें पुढें केलेली चवली घ्यायला त्याला फुरसत झाली नाहीं.

त्यानंतर एका मुलीचें तिकीट अर्धे का सगळें ह्याची चर्चा होत असतांना बसचा स्टॉप आला तशीं तिकीट देण्याचें काम अर्धवट टाकून कंडक्टर पुन्हा घाईघाईने मागें गेला त्यानें किती माणसें हवींत तें ओरडून सांगितलें. पुन्हापुन्हा घंटी वाजविली, हुज्जत घातली आणि पुन्हा बंडूच्या खांद्याला एक धक्का देऊन पुढें तिकिटें देण्याकरितां गेला.

ह्या वेळींदेखील बंडूनें मोठ्या अजीजीनें आपली चवली पुढें केली आणि कंडक्टरच्या कोटाचें टोक पकडण्याचा प्रयत्न केला, पण त्याच्या हातांतली चवली उडून गेली आणि खाली बसून रांगेत ती शोधण्याचा त्याच्यावर प्रसंग आला.

त्याच्या शेजारचा पारशी म्हणाला, "सबूर! सबूर! एटली धमाल शा माटे करो छो?"

पुढें बसलेल्या तरुण जोडप्यातला नवरा बायकोला म्हणाला, "नुकताच भाऊच्या धक्क्यावर उतरलेला दिसतोय्."

बायको नाकाला सुरकुत्या पाडून हसली. नवऱ्याविषयीं तिला अधिकच आदर वाटूं लागला. आणि मग चटकन् मागे फिरून तिनें बंडूला पाहून घेतले.

बंडू ओशाळला. पण तिकीट काढण्याची त्याची उत्सुकता मात्र अणुमात्र कमी झाली नाही. आता त्यानं गनीमी काव्याचा उपयोग करण्याचें ठरवलें. चवली मुठींत धरून त्यानं आपले हात बगलात धरून ठेवले आणि निष्काळजीपणें तो खिडकीबाहेर पाहूं लागला. पण एका डोळ्यानें मात्र कंडक्टरच्या हालचालीवर त्यानें सक्त नजर ठेवली होती. हळुहळू तिकिटें देत-देत कंडक्टर त्याच्याकडे येत होता आणि बंडूच्या मनोलतेवर आशेचे भोपळे धरूं लागले होते.

पण इतक्यात पुढचा स्टॉप आला. कंडक्टर पुन्हा लगबगीनें मागे गेला. किती जागा आहेत तें तो ओरडला. त्यानं घंटी वाजवली. हुज्जत घातली. आणि पुन्हा नवीन आलेले दोन उतारू अगदी पुढच्या बाजूला बसले होते त्यांना तिकिटें द्यायला तो घाईघाईनें पुढें निघून गेला.

बंडूचा धीर सुटूं लागला. त्याचा जीव नुसता खालीं-वर होऊं लागला. चेहऱ्यावर निष्काळजीपणा ठेवणें त्याला अशक्य झालें. पुढें बसलेल्या उतारू-विषयीं त्याच्या मनात फार वाईट विचार येऊं लागले. आपल्याला एकट्यालाच कोणी तरी बिनमुदत कोठडींत कोंडून ठेवलें आहे असें त्याला वाटूं लागलें. बस-कंडक्टरचें यंत्र फिरवून तिकिटाचीं भेंडोळींच्या भेंडोळीं तो काढूं लागला आणि आम जनतेला मोफत वाटूं लागला.

त्याचा उतरावयाचा स्टॉप यायला थोडाच वेळ उरलेला असतांना अखेर एकदाचा कंडक्टर त्याच्या बाकापर्यंत येऊन ठेपला. उंच धरलेली वस्तु उडी मारून मिळवल्यावर जसा एखाद्या कुत्र्याला आनंद होतो तसा त्याला आनंद झाला. आपलें हसूं त्याला आवरेना.

पण त्याच्या बाकाजवळ आलेला कंडक्टर दुसऱ्या बाजूच्या बाकावरील माणसाजवळ तिकिटाचे पैसे मागूं लागला. आणि तो माणूस कुठच्या स्टॉपला बसमध्यें चढला ह्याबद्दल त्या दोघामध्यें तीव्र मतभेद झाला आणि खडाजंगीची चर्चा सुरू झाली.

बंडूच्या कपाळावरची शीर तटकन् फुगली. आपल्या मुटींतली चवली तो चावून खाईल अशी जबरदस्त शक्यता निर्माण झाली. आपल्या मतानें मोठ्यानें तो त्या माणसाच्या विरुद्ध बोलला. पण तें कोणालाच ऐकूं गेलें नाहीं.

अखेर अपरिहार्यपणें त्या भाडणांत कंडक्टरचा विजय झाला. आणि विजयी मुद्रेनें जेव्हा हसून तो काहींसें म्हणाला व संमतीच्या अपेक्षेनें जेव्हां त्यानें इतर उतारूंकडे पाहिलें तेव्हां बंडूनें रुद हास्य केलें आणि मुठींत फार वेळ राहून गरम झालेली चवली त्याला देऊ केली.

पण कंडक्टरचें त्या पुढें केलेल्या चवलीकडे लक्ष गेलेंच नाही. "देखो, कैसा आदमी है!" असें पुटपुटत तो दोन बाके मागे गेला. आणि त्यानें तिकिटें द्यायला सुरुवात केली.

बंडू हताश झाला. त्यानें उघडउघड बंड पुकारायचें ठरवलें. तो चक्क उभा राहिला आणि 'शुत्-शुत्' करून कंडक्टरला बोलावूं लागला. तो कोणाला बोलावतो आहे ते कळावें म्हणून बसमधले सगळे उतारू माना वळवून मागे पाहूं लागले. कंडक्टर देखील मान फिरवून तेंच करूं लागला. मग सगळे आश्चर्यानें बंडूकडे पाहू लागले. कंडक्टरनेंहि तेंच केलें. त्या सगळ्यांच्या नजरा अशा आपल्यावर लागलेल्या पाहून बंडूचा धीर खचला आणि तो मटकन् खालीं बसला. समोरचें जोडपे परस्परांकडे पाहून गालांतल्या गालांत हसलें.

तेवढ्यांत स्टॉप् आला. कंडक्टर मागच्या बाजूला धावला. त्यानें किती जागा आहेत तें ओरडून सागितलें. घंटी वाजवली. हुज्जत घातली. आणि बस् सुरू झाल्यावर त्यानें 'तिकीट-तिकीट' असें म्हणत आणि कट्कट् असा आवाज करीत घाईघाईनें दोन फेऱ्या घातल्या. आणि दोन्ही वेळेला बंडूच्या हालचालींचा त्यानें तिकिट काढलें आहे असा अर्थ घेतला. कामगिरी बजावल्याच्या आनंदांत कंडक्टर मागें गेला आणि उभा राहून प्रवास करणाऱ्या मित्राशीं बोलूं लागला.

बंडूनें तिकीट काढण्याची सारी आशा सोडून दिली. मुटींत ठेवून गरम झालेली चवली त्यानें खिशांत टाकली. आणि चाकाखालीं चिरडलेल्या झुरळासारखा तो स्वस्थ बसून राहिला. तेवढ्यांत त्याचा उतरायचा स्टॉप आला.

आदल्या दिवशींच्या आठवणीनें बंडूच्या मनाची विलक्षण त्रेधा उडाली.

काय करावें तें त्याला कळेना. संभाषणांत मग्न असलेल्या कंडक्टरकडे त्यानें पाहिलें आणि एक निराशेचा सुस्कारा सोडला. मग एक चलाख कल्पना त्याला सुचली. शेजारच्या पारश्याच्या शरीरस्वास्थ्याची यत्किंचितहि पर्वा न करतां त्यानें खिडकींतून डोकें बाहेर खुपसून पाहिलें. आणि इन्स्पेक्टर दाराशीं नाहीं असें पाहून जागेवरून उठून पळ काढला.

इतका वेळ संभाषणांत गर्क असलेल्या कंडक्टरचें पळणाऱ्या बंड्ूकडे लक्ष गेलें. आणि तो त्याच्या मागोमाग धावत म्हणाला, "क्या! तिकीट लिया?"

बंडू भांबावून म्हणाला, "नही."

कंडक्टरनें त्याच्याकडे निर्भत्सनेचा दृष्टिक्षेप टाकला आणि दोन आण्यांकरितां खोटें बोलणाऱ्या सूटबूटवाल्या लोकांची खरडपट्टी काढायला सुरुवात केली.

एक म्हातारे गृहस्थ म्हणाले, "काय हल्लीचीं माणसें तरी बुवा!"

एक धोतरवाला गृहस्थ दुसऱ्या समानधर्म्याला म्हणाला, "अहो! तुम्ही-आम्ही बरे, पण ही बूटसूटवालीं माणसेंच मोठीं लफंगीं असतात."

देशाच्या खालावणाऱ्या नैतिक पातळीविषयीं एकंदर हळहळ व्यक्त झाली.

बंडू रडकुंडीला आला. त्यानें आपली बाजू मांडण्याचा एक दुबळा प्रयत्न केला. आपण चवली किती वेळां पुढें केली तें त्यानें सागितलें.

पण कंडक्टरनें त्याला धुडकावून लावलें. आपल्या नजरेंतून कधींहि बिन-तिकीटवाला उतारू निसटत नाही असें त्यानें मोठ्या अभिमानानानें सांगितलें. आपण इतक्या फेऱ्या घातल्या तरी एकदांसुद्धा बंडूची चवली आपल्याला कशी दिसली नाहीं असा प्रश्न जनतेपुढें टाकला.

बंडूनें आपला पराभव मुकाट्यानें मान्य केला. आपल्या खिशांतली चवली त्याच्या हातात दिली. तिकीट मागण्याचें नैतिक धैर्य अर्थातच त्याला झालें नाहीं. आणि दोन आणे खिशांत टाकायचा हा 'चान्स' कंडक्टर कसा सोडील बरें? मोठमोठ्यानें बडबडत त्यानें ते दोन आणे खिशात टाकले, आणि घाईनें तो मागल्या बाजूला गेला.

इकडे बंडू कसाबसा बसमधून उतरतो न उतरतो तोंच त्याचें बकोट पकडलें गेलें आणि मग इन्स्पेक्टर शांतपणें म्हणाला, "Ticket please."

★★★

## बंडू मजा करतो! ३

एक तारीख नुकतीच झाली होती. त्यामुळें मुंबईकरांच्या चेहऱ्यावरच्या उत्साहाच्या पावडरीचा थर दाट झाला होता. थिएटराना फुटलेली क्यूची शेपटें वेडीवाकडी लांबवर पसरून अखेर कुठल्या तरी बोळाच्या कानात शिरून गुदगुल्या करीत होतीं. हॉटेलवाल्याच्या गल्ल्यांत नाण्याचा पाऊस पडत होता आणि कापडदुकानात गेलेल्या नारीवृंदाच्या नजरेसमोर पातळाचीं इंद्रधनुष्यें उलगडत होतीं. बिलवाल्यांना चुकवणारे लोक आता बिलें चुकवीत होते आणि धर्मराजाच्या प्रजाजनांप्रमाणें, हॉटेलचें बिल आपणच देणार म्हणून मित्रमंडळी आपआपसांत नैतिक उत्साहानें भांडत होती.

ह्या सार्वत्रिक उत्साहाचा परिणाम बंडूच्या तरुण मनावर होणें अपरिहार्य होतें. शिवाय परिस्थितीही फार अनुकूल होती. आपल्याला न पेलणारी पागडी घरमालकाच्या डोक्यावर ठेवून आपण कफल्लक झालो आहोत हें तो आतां विसरला होता; आणि संसारवृक्षाला येणारें फळ ठेवायला उबदार नोटांनीं आच्छादिलेली बॅंक अकाउंटची करंडी पाहिजे ह्याची जाणीव होण्यासारखी परिस्थिति अजून निर्माण झाली नव्हती. नुकताच त्यानें विमा उतरला होता, त्यामुळें बचत करायची आतां आवश्यकता नाहीं हें तो स्वतःला सहज पटवून देऊं शकत होता. पुढच्या महिन्याचा पगार ह्या महिन्यांत खर्च करण्यास कांहीं हरकत असली, तर ती त्याच्या संसाराच्या भावगीतांत अजून येऊं शकली नव्हती, आणि अजून त्याच्या संसारसुखाची रेकॉर्ड पुन्हापुन्हा वाजून खरखरूं लागली नव्हती.

त्यामुळें सकाळीं चहाचा घुटका घेत तो म्हणाला, " छे बुवा ! आपण फार दिवसात मजा केली नाहीं. काहीं तरी केलंच पाहिजे, नाहीं का ?"

खरेंच होतं तें. कारण गेल्याच आठवड्यांत महिन्याच्या शेवटीं ओढघस्त फार होतें, असे म्हणत त्यानें पंचवीस रुपये काढून आणले होते, आणि मग महिना संपला म्हणजे पैसेही संपलेच पाहिजेत अशा काटेकोर हिशेबीपणानें सिनेमा पहाण्यात संपवून टाकले होते.

स्नेहलता म्हणाली, " चहा ढवळून घ्या. तळाला साखर आहे. "

बंडूनें आज्ञाधारकपणें चमचा कपांतून काढून ठेवला आणि तो म्हणाला, " मग ? काय करायचं आज ? "

स्नेहलता आवाज चढवून म्हणाली, " मीं म्हटलं, चहा ढवळून घ्या."

बंडू कपाकडे पहात म्हणाला, " ढवळून ? पण कशानें ढवळूं ? चमचा ठेवत नाहीस, मग चहा कसा ढवळायचा ?"

स्नेहलतेनें चमचा त्याच्या कपांत ठेवला, आणि ती म्हणाली, " मीं चांगला चमचा कपांत ठेवला होता, तो तुम्ही काढून टाकलात आणि म्हणे, च्यमच्या कुठ्ये आह्ये ! "

" मुळींच नाहीं. नॉन्सेन्स !" बंडूनें मूठ आपटली.

" किंचाळूं नका. " स्नेहलता पुटपुटली.

" नॉ–न–से–न्स–!" एकेक अक्षर तोडून बंडू तारस्वरांत किंचाळला.

" आणखी मोठ्यानें. " स्नेहलतेनें चहाचीं भाडीं आपटून साथ दिली.

" नाहीं ओरडणार! तुझ्या काकाचं चार चव्वल देणं लागतो कीं काय मी ?" बंडूनें गर्जना केली आणि इतक्या जोरानें मूठ आपटली कीं चहा हिंदकळून त्याच्या अंगावर सांडला.

त्यानंतर घरांत जाऊन खरवडल्या जाणाऱ्या नारळाची फकी मारतांना बंडू पुन्हा म्हणाला, " ऑपण ऑज मॉजॉ कॉरुं यॉ ऑसं म्हटलं नॉ ? "

त्याच्या दोन्ही गालांवर मुटके मारीत स्नेहलता म्हणाली, " बॉरं बॉरं, कॉरूं यॉ. "

त्याबरोबर आपण मुष्टियुद्ध खेळत आहोंत अशा आवेशांत मुठी हलवीत

तिच्याभोवतीं नाचत बंडू वीरश्रीनें म्हणाला, " मग बोल तर! दुर्दैवी स्त्रिये, बोल. ह्या माझ्या मुठीनें तुझं तोंड कायमचं बंद व्हायच्या आत काय तें बोलून टाक. "

" चालते होतां कीं नाहीं बाहेर ? नाहीं तर जेवण तयार व्हायचं नाहीं हं. सांगून ठेवतें आहें. " स्नेहलतेनें कालथ्याच्या टोकानें दार दाखवलें.

" नका नका बाईसाहेब, पाठीवर मारा, पण अशा पोटावर मारूं नका ! " असें मेळ्यांतल्या एखाद्या अभिनयसपन्न मुलाप्रमाणें रडवेपणानें म्हणून बंडू बाहेर पळाला.

अखेर सुपारीचा बकाणा भरीत दाराकडे धूम टोकताना बंडू म्हणाला, " चर्च-गेटला भेट बरोबर सहा वाजता. "

" कशाला ? " स्नेहलतेनें निरागसपणें विचारलें.

" अग आजची इव्हिनिग एंजॉय् करायची आहे ना आपण ? " बंडू त्रासिकपणें दारांत थबकून म्हणाला.

" कांहीं नको गडे ! आज कीं नाहीं मला—"

" माहेरीं जायचं आहे, असंच ना ? रोज माहेरीं जा तूं. चालू द्या. चैन ! मजा ! तें कांही नाहीं. आज आपण संध्याकाळीं एंजॉय करायचंच ! तूं आलंच पाहिजे. समजलीस ना ? " बंडू आवाज चढवीत म्हणाला.

" पण गडे, कशाला उगीच पैसे खर्च करायचे. आपला गडे फारच खर्च होतो. " पुन्हा स्नेहलता अगदीं सावकाशपणें म्हणाली.

" हें पहा, आतां चर्चा करूं नका. मला उशीर होतोय्. संध्याकाळीं ये. " असें म्हणून बंडू धाडकन् दार बंद करून जिना उतरूं लागला.

स्नेहलता त्याच्यामागून धावत जात म्हणाली, " पण कुठें भेटायचं तें नाहीं सांगितलंत. "

" चर्चगेटला, चर्चगेटला ! " बंडू जिना उतरतांना हातवारे करीत म्हणाला.

" बोरीबंदर कां नको ? तिथंच भेटूं या गडे. " स्नेहलतेनें आपलें स्वतंत्र मत व्यक्त केलें.

बंडू त्रासिकपणें म्हणाला, " बरं बरं, चर्चगेटला—" पण मग तो एकदम

गरकन मागे फिरला आणि गाडी चुकली तरी हरकत नाहीं, पण ह्या प्रश्नाचा एकदां सोक्षमोक्ष लावायचाच अशा घोर निश्चयानें ओरडला, " बोरीबंदरला नाहीं. चर्चगेटलाच भेटायचं आपण. च-र्चु-गे-ट."

" बर बाई, चर्चुगेट!" स्नेहलता थट्टेच्या स्वरांत म्हणाली.

" चर्चुगेट नव्हे, चर्चगेट." बंडू आतां खरोखरीच कावला होता.

" हे बघा, आतां भांडत बसूं नका. चर्चगेट तर चर्चगेट; पण आतां तुम्ही लवकर जा कसे! नाहीं तर गाडी चुकेल." स्नेहलता अत्यंत समंजसपणानें म्हणाली.

बंडूला तें पटलें. आपल्या असमंजसपणाचं हसूं आलें. तो जायला वळला-देखील आणि मग एकदम खऱ्या परिस्थितीची जाणीव होऊन तो पुन्हा मागे फिरून म्हणाला,

" वा! म्हणजे भांडण तूं सुरू केलस आणि शहाणपणा मला शिकवतेस?"

लहान मुलाची समजूत काढावी तशा थाटात स्नेहलता म्हणाली, " बरं बाई, मींच केलं भांडण; पण जा आता तुम्ही!"

" नाही जाणार! तूंच भांडण सुरू केलंस असं तुला सिद्ध करून दिल्या-शिवाय मुळींच जाणार नाहीं मी!" बंडू आता इरेला पेटला.

त्याचा लाल झालेला चेहरा पाहून स्नेहलता आर्जवीपणानें म्हणाली, " असं काय गडे करायचं! रागवूं नका ना."

मग बंडूच्या चेहऱ्यावर हास्य फुललें आणि तो म्हणाला, " बरं बुवा, बोरी-बंदरला भेटूं आपण. होऊं दे तुझ्या मनासारखं!"

" इश्श! तसं कशाला? चर्चगेट काय वाईट आहे!" स्नेहलता त्या क्षणीं समंजसपणाची पुतळीच झाली होती.

" बोरीबंदर म्हणजे बोरीबंदर!" बंडू पुन्हा करडेपणानें म्हणाला आणि तिला पुढें बोलायला मिळूं नये, म्हणून पळत सुटला.

लगबगीनें चालतांना त्यानें मुठी वळून स्वतःला असें पटवून दिलें कीं, बायकांना असेंच दाबांत ठेवलें पाहिजे. आणि मग थोड्या वेळानें तिचाच तर विजय झाला नाहीं ना, अशी शंका त्याचें मन कुरतडूं लागली.

संध्याकाळ झाली तशीं आपण चर्चगेटला भेटायचें ठरवलें होतें कीं बोरी बंदरला तें त्याला नीटसें आठवेना. त्याला ठामपणें वाटलें कीं आपण बोरीबंदर-लाच जायचें ठरवलें आहे. आणि तो ठामपणें बोरीबंदरच्या दिशेला जाऊं लागला, तेव्हां त्याला तितक्याच ठामपणें वाटूं लागलें कीं आपण चर्चगेटला भेटायचें ठरवलें आहे. मग त्याच्या मनांत असा चाणाक्ष विचार आला कीं आपण चर्चगेटला भेटावयाचें ठरवलें असलें तरी स्नेहलता नेमकी बोरीबंदरला येईल; आणि आपल्या चाणाक्षपणावर खूष होत तो बोरीबंदरला गेला.

तेथें एक छान पोरगी पाठमोरी दिसली म्हणून तो सहजपणें वळसा घेऊन तिच्यासमोर गेला आणि मग ती स्नेहलताच आहे, असें दिसतांच आनंदानें पुढें झाला. त्याला म्हणायचें होतें, 'इतकी छान दिसतेस तूं!'

पण तो बोलायच्या आधींच ती घड्याळाकडे पाहून म्हणाली, "माझं घड्याळ बंद पडलय्, कीं तुम्ही वेळेवर आलांत ?"

बंडू म्हणाला, "मी कदाचित् उशिरां येत असेन, पण निदान ठरलेल्या ठिकाणींच तरी येतों. तूं मात्र चर्चगेटला यायचं असं ठरलं असतांना बोरीबंदरला आलीस !"

"हॅ. हें मात्र मी चालूं देणार नाहीं हं. बोरीबंदरला यायचं ठरलं होतं आपलं." स्नेहलता कठोरपणानें म्हणाली.

"वा ! म्हणजे—"

"मी एक शब्ददेखील ऐकून घेणार नाहीं !"

"बरं ! बरं ! बरं ! बरं ! कृपा करून त्या विषयावर आतां बोलूं नको." बंडू डोकें गच्च दाबून म्हणाला.

"तुम्हींच काढलात तो विषय." स्नेहलतेनें विषारी पुटपुट केली.

"होय. होय. होय. मीच गाढव आहें ! झालं ?" बंडू केस उपटीत म्हणाला.

"इश्श ! लोक हसताहेत." स्नेहलतेच्या तोंडांत हास्याची एक छोटीशी कुपी फुटली.

आणि तेवढयांत दुसरी एक स्नेहलता तोंडावर रुमाल ठेवून आपल्याकडे पहात हसतांना बंडूला दिसली.

बंडू हसून म्हणाला, "रिअली, आय् एम ए परफेक्ट ॲस!"

"नाहीं तर काय!" स्नेहलता मतभेद टाळण्याच्या चांगल्या उद्देशानें म्हणाली.

त्यानंतर त्या दोघांना कांहीं वेळ संभाषण करणें अशक्य झालें. कारण स्टेशनांत शिरणाऱ्या माणसांच्या लोंढ्यांतून आदळत-आपटत त्यांना बाहेर पडावें लागलें. बंडू स्वतःची ढाल करून स्नेहलतेला सांभाळीत बाहेर पडत होता. त्या गर्दीत एका हमालानें डोक्यावरच्या सामानासकट मान वळवली आणि एका बॅगेचा अणकुचिदार कोपरा बंडूच्या डोक्यावर आपटला.

बंडू विव्हळला आणि त्या हमालाला ओरडला, "ए! क्या है?"

हमाल त्याला उत्तर देण्याकरितां पुन्हा वळला आणि पुन्हा बॅगेचा कोपरा बंडूच्या डोक्याला लागला. स्नेहलता हसली.

बंडू हातानें डोकें दाबीत मऊपणानें म्हणाला, "जा, जा बाबा!" आणि तो पुन्हा वळूं लागला तेव्हां एक पाऊल मागे सरकला. तों स्नेहलता विव्हळूं लागली, "आई ग! पाय चिरडला माझा!"

तेव्हां बंडू दांत विचकून हसूं लागला, "हीः हीः हीः! हीः हीः हीः! आम्हांला जसं काहीं हंसतां येतच नाहीं!"

मग एका माणसानें सलाम करायला वर केलेल्या हाताची चापटी स्नेहलतेच्या डोक्यावर बसली आणि दुसऱ्या माणसाच्या हातांतल्या सिगरेटचा चटका बंडूच्या हाताला बसला. त्यानंतर स्नेहलतेची हरवलेली चप्पल शोधण्याकरितां बंडूला खालीं वाकावें लागलें आणि सगळ्या शरीराला बसणारे धक्के आणि डोक्यावर कोसळणाऱ्या शिव्या सहन करीत जेव्हां त्यानें चप्पल हुडकून काढली, तेव्हां स्नेहलता हरवली होती. आणि स्नेहलता सांपडली तेव्हां बंडूचें डोकें ठिकाणावर राहिलें नव्हतें. गाडी सुटत नसून जणुं आपला प्राणच चालला आहे अशा कल्पनेनें चपला फटफटावीत धावणारा एक किरकोळ गृहस्थ जेव्हां त्याच्या अंगावर आदळला, तेव्हां बंडूनें त्याला घट्ट आपल्या पोटाशीं धरून ठेवलें. तो गृहस्थ बंडूच्या पोटाशीं वळवळत हात हलवीत सुटण्याचा प्रयत्न करीत होता, 'अरे! अरे! गाडी सुटली...' असें डोळे पांढरे करून ओरडत होता; पण

बंडूनें त्याला सोडलें नाहीं. अखेर गाडीची शिट्टी होऊन ती सुटली, तेव्हां त्यानें त्या माणसाला सोडलें.

तो गृहस्थ सुरक्षित अंतरावर जाऊन शिव्या देऊं लागला, "साला...हराम-खोर...बदमाष..."

तेव्हां बंडू त्याला हसत म्हणाला, "शिव्या देण्यांत वेळ घालवूं नको. नाहीं तर दुसरी गाडी चुकेल!"

त्या माणसानें चटकन् इंडिकेटरकडे पाहिलें आणि पुन्हा तो चपला फट-फटावीत पळत सुटला.

इतका वेळ त्रस्त झालेला बंडू संतुष्टपणें हसला आणि स्नेहलतादेखील जेव्हा हसत सुटली, तेव्हां बंडूची छाती अर्धा इंच अधिकच फुगली.

गर्दीतून सुटून एव्हांना तीं दोघे मोकळेपणानें चालूं लागलीं होतीं. तेव्हां स्नेहलता म्हणाली, "आतां पिक्चरला जायचं ना आपण?"

नेमका हाच प्रश्न बंडूला हवा होता. आणि ह्याला पल्लेदार आणि बाणेदार उत्तर त्याच्या डोक्यात तयार होतं. म्हणजे त्यानें नुकत्याच वाचलेल्या एका लेखांत त्याला तें सांपडलें होतें. तो घसा साफ करून म्हणाला, "हेंच, हेंच तें नेमकं चुकत तुम्हां लोकाचं. चुकतं कसलं म्हणा! इमॅजिनेशनच नाहीं तुम्हां लोकांना! (लेख वाचला असल्यामुळें बंडू ह्या लोकांतून बाहेर पडला होता. उच्च पातळींवर गेला होता.) तुमच्या दृष्टीनें एंजॉयमेंट म्हणजे नुसतं पॅसिव्हली पहायचं, आपण कांहीं करायचं नाहीं. कांहीं तरी करा. त्यांत खरी मजा आहे!"

"तुमचे पायमोजे फाटले आहेत ना? तो बघा तिथें पायमोजे विकायला बसला आहे." स्नेहलता त्या दिशेनें चालूं देखील लागली.

बंडू तरातरा तिच्या मागोमाग जात म्हणाला, "म्हणजे मी काय हवेशीं बोलतोंय् कीं काय?"

"बरं, नको बघूं या सिनेमा. ठरवा तुम्ही काय करायचं तें." स्नेहलता त्या फेरीवाल्याच्या मालावरची नजर न काढतां म्हणाली.

"च्र्-च्र्! हा सिनेमा पहाण्याचा प्रश्न नाहीं. ॲटिट्यूडचा आहे!" बंडू

विद्वत्तापूर्ण खुलासा करीत म्हणाला आणि मग त्यानें चिडून विचारलें, "मीं काय सांगितलं तें समजलं का?"

"हो ना, प्रश्न ॲटिट्यूडचा आहे! ते नारिंगी पायमोजे गडे बरे दिसताहेत. त्यांची किमत विचारा ना!" स्नेहलतेला आपण विशेष कांहीं गुन्हा करीत आहोत असें मुळींच वाटत नव्हतें.

तेवढ्यांत फेरीवाल्यानें उत्साहानें किमत सांगितली. स्नेहलतेनें त्याच्याशीं घासाघीस केली आणि अखेर ती बंडूला म्हणाली, "बघता काय? पैसे द्या ना त्याचे."

आपण पूर्णपणें बावळट ठरत आहोत, हें समजत असूनदेखील बंडूला कांही करतां येत नव्हतें. त्यानें ठरवलें कीं, आता आपण काहींच करायचें नाहीं आणि बोलायचें पण नाहीं. नुसतें मुकाट्यानें चालत रहायचें.

पांच मिनिटें तो फ्लोराफाउटनच्या दिशेनें चालला होता. आणि बरोबर स्नेहलतादेखील चालत होती. दुकानाच्या शोकेसेस्‌मधल्या सुंदर वस्तू बघतांना ती भान विसरली होती.

अखेर बंडू कावून म्हणाला, "आपण एंजॉय् करायला आलों आहोत, कीं सुतकी चेहऱ्यानं हिंडायला आलों आहोंत?"

स्नेहलता एका शोकेसमध्यें पहात म्हणाली, "तुम्हीच नाहीं का म्हणालांत, कीं आपण सिनेमा पहायचा नाहीं म्हणून?"

"पण सुतकी चेहऱ्यानं चालायचं, असं मीं म्हटलं नव्हतं." बंडू भांडखोर-पणानें म्हणाला.

"तुम्हीच तर मघांपासून हुप्प झालेले आहांत!" स्नेहलता शांतपणें म्हणाली.

शोकेसच्या कांचेवर टाळकें आपटून ती फोडून टाकावी, असे हिंसक विचार बंडूच्या डोक्यांत येत होते. तो वैतागानें म्हणाला, "चला एकदां सिनेमा पाहूं या आपण. कुठ जायचं? रीगलला? बोलावूं टॅक्सी?"

बंडूला वाटलें कीं, स्नेहलता 'हो' म्हणेल, मग आपला नैतिक विजय पण होईल आणि काय करायचें तो प्रश्नदेखील सुटेल. कारण काय करावें तें त्याला सुचत नव्हतें व चालायला पाय फारसे उत्सुक नव्हते.

पण स्नेहलता समजुतीच्या स्वरांत म्हणाली, "असं काय तें? तुम्हांला अपोलो बंदरला जायला आवडतं ना? मग आपण तिकडेच जाऊं हळूहळू फिरत फिरत."

म्हणजे आतां इच्छा नसतांना फिरावें लागणार होतें, सिनेमा चुकणार होता, आणि शिवाय स्नेहलतेला आपण हें सगळें ह्याच्याकरितां करणार आहोत असें वाटणार होतें. बंडू शीळ वाजवूं लागला. फ्लोरा फाउंटनच्या कारंज्याच्या धारेवर आपण उडत आहोंत, अशी कल्पना करून आपलें मनोरंजन करण्याचा तो प्रयत्न करूं लागला. चेहऱ्यावर बेफिकीरपणा आणूं लागला आणि मग एकदम स्नेहलतेकडे पाहून म्हणाला, "तुला आइस्क्रीम घ्यायचं आहे का ग?"

स्नेहलता त्याच्याकडे पहात म्हणाली, "कां? तुम्हांला खावंसं वाटतंय्?"

स्नेहलतेनें आपल्या मनांतलें अचूक ओळखावें ह्याची बंडूला चीड आली. तो शक्य तितका निरागस चेहरा करीत म्हणाला, "नाहीं ग, तुला आपलं हवं असलं तर विचारलं."

स्नेहलता आपल्या चिमुकल्या रुमालांत तोंड दाबीत म्हणाली, "नको बाई! कसलं तें पावडरच्या दुधाचं आइस्क्रीम!"

अधिकच हसरा चेहरा करून बंडू चालूं लागला. आपलें बेटें सगळेंच कसें फसतें, असा विनोदी विचार डोक्यांत घोळवण्याचा यत्न करूं लागला. पण थोड्या वेळानें दुसरें हॉटेल दिसलें, तेव्हां हा सगळा गिलावा उडून गेला आणि भुकेचीं पिल्लें त्याचें पोट कुरतुडूं लागलीं. कुठच्याहि एंजॉयमेंटला खाण्यापिण्याचा भरभक्कम पाया असावा, अशी त्याची मूलभूत भूमिका होती. त्याशिवाय मनुष्य आनंदांत कसा असूं शकतो ह्याचें त्याला सखेद आश्चर्य वाटत असे. गांधीजींनीं चौसष्ट दिवस उपास केल्यामुळें त्याचें त्यांच्याविषयींचें मत तितकेंसें साफ नव्हतें आणि आतां तर उन्हाळ्याच्या दिवसांत आइस्क्रीम नको, असें बायका कसें म्हणूं शकतात, हें समजणें त्याच्या आवाक्यांबाहेर गेलें होतें.

शक्य तितकें शांत डोकें ठेवून बंडू हसत म्हणाला, "काय ग? इथं डोसा चांगला मिळतो, हें तुला माहीत आहे कीं नाहीं? तूं फार दिवसांत डोसा खाल्लेला नाहींस. बघ बुवा! खायचा आहे का?"

"चक्!" स्नेहलता म्हणाली आणि मग मोठ्या दयाळूपणें तिनें सुचवलें, "अपोलो बंदरवर जाऊन गडे मग आपण गरम चणे खाऊं!"

आता मात्र बङ्कूच्या अंगाचा तिळपापड झाला. तो ओरडला, "चक् करायला काय झालं ग? खायचं म्हटलं म्हणजे कसला नाजुकपणा भरतो तुझ्या अंगांत? म्हणूनच तर तूं अशी ॲनिमिया झाल्यासारखी फिकुटलेली दिसतेस. मग भरताहेत डॉक्टरचीं बिलं, घेताहेत इंजेक्शनं! चांगल खावं, मजा करावी; तर नुसते नखरे करीत कसली बसतेस?"

"चला बाई, खाऊं या. तुम्ही काय सांगाल तें खातें!" स्नेहलता नरमाईनें म्हणाली. मग बंडूनें विजयोन्मादानें हॉटेलात प्रवेश केला आणि टेबल भरून जाईपर्यंत तो ऑर्डरी देत राहिला.

बंडूचें पोट भरू लागलें तशी आजूबाजूच्या जगावर गहिरी गुलाबी छटा चढूं लागली. त्याच्या वृत्तींतला भांडखोरपणा विरघळून गेला. त्याच्या हृदयांतून औदार्य ओसंडूं लागलें. आपल्या देशात भुकेपायीं अर्धपोटीं रहाणारे असंख्य बांधव आहेत, ह्याची त्याला दुःखद जाणीव झाली. त्याना आपल्या जवळचे सर्व पैसे दिले, तरी प्रत्येकाच्या वांटणीला एकेक पैसादेखील येणार नाहीं, ह्याचें त्याला दुःख झालें. मग आपले पैसे त्यांना देण्यांत तरी काय अर्थ होता? तसें पाहिलें तर कशांतच काय अर्थ होता? व्हॉट इज् लाइफ?

आपण इतका खोल विचार करूं शकतों ह्याचें बंडूला कौतुक वाटलें. विचारांच्या ह्या उंचीवर सिगरेटच्या मदतीशिवाय श्वसन करणें अशक्य होतें. त्याचा हात खिशात गेला आणि त्यानें सिगरेट काढली.

सिगरेट ओढताना त्याच्या डोक्यांत विचार आला कीं, स्नेहलतेच्या अंगांत अन्नसत्त्वें जावीं म्हणून आपण खूपसें खायला मागवलें खरें; पण त्यांतलें आपणच पुष्कळसें खाल्लें कीं! त्या क्षुद्र विसंगतीची त्याला गमत वाटली. जीवन हें विसंगतींनींच भरलेलें नाही का बरें? उच्च विचारांत सिगरेटचा धूर मिसळत होता. जगाचीं कोडीं उलगडत होतीं. सुख नुसतें अंगांत हुळहुळत होतें.

सिगरेटच्या धुरांतून स्नेहलता त्याला एखाद्या परीसारखी दिसली. इतरांच्याच बायका नव्हे, तर आपली बायकोदेखील सुंदर दिसते, हें कधीं काळीं प्रत्येक नवऱ्याला समजत असतें. ह्या वेळी तें बंडूला पटलें. आपलें तिच्याशीं लग्न

झालें आहे, ह्याचें त्याला वाईट वाटलें. परत पहिल्यापासून तिच्यावर प्रेम करावें अशी त्याला इच्छा झाली. तो नाजुक घोगरा आवाज काढीत म्हणाला, "सिगरेटच्या धुरांतून किती सुंदर दिसतेस ग तूं!"

ह्यावर ती लाजेल आणि मग आपण...असें त्याला वाटलें होतें. पण उलट तिनें नाक फेंदारलें आणि ती म्हणाली, "तुम्ही मात्र सिगरेटच्या धुरांतून मला राक्षस दिसतां. हज्जार वेळां सांगितलंय कीं सिगरेट ओढूं नका. पण पुन्हा आपले निर्लज्जपणें ओढीत असतात. आणि आता तर खिशांत पाकीट बाळगताहेत सरळ. हसतां काय आणखी वर?"

बंडू ऐटींत सिगरेटचा धूर सोडीत म्हणाला, "क्वाइट इंटरेस्टिंग. गो ऑन!" क्षणभर त्याला वाटलें कीं आपण अमेरिकन स्टंट चित्रपटांतले नायक आहोंत आणि आपल्यावर पिस्तूल रोखणाऱ्या खलनायकाच्या तोंडावर धूर सोडीत तुच्छतेनें हसत आहोत.

आणि मग त्या स्टंट चित्रपटांतल्या नायकाच्या हनुवटीवर टोसा बसला.

म्हणजे स्नेहलतेनें अनपेक्षितपणें चढाई केली. काय होतंय तें कळण्यापूर्वींच त्याच्या ओटातली सिगरेट हिसकावली गेली आणि हवेंतून उडत खिडकीबाहेर पडली आणि 'अग अगऽ' असें गोंधळलेल्या स्वरांत बंडू म्हणत असतांनाच त्याच्या पुढ्यांतली सिगरेटची पेटीदेखील खिडकीबाहेर उड्डाण करून अदृश्य झाली. काड्याची पेटी मात्र त्या गृहिणीनें व्यवस्थितपणें आपल्या पर्समध्यें ठेवली आणि पर्सनें बंद होतांना 'फट्ट' असा खवचट आवाज केला.

बंडू बोलण्याच्या अवस्थेंत आल्यावर म्हणाला, "ह्या–ह्याचा अर्थ काय?"

"ह्याचा अर्थ तोच!" आणि आपलें दुष्ट हास्य लपविण्याकरितां आपल्या इवल्याशा अपुऱ्या रुमालानें तिनें आपलें तोंड झाकलें.

त्या चतकोर रेशमी रुमालाविषयीं बंडूच्या मनात नेहमींच राग धुमसत असे. त्या रुमालांत कांहींच बांधतां येत नसल्याकारणानें स्नेहलतेनें केलेली खरेदी त्याला आपल्या रुमालांत बांधून घ्यावी लागत असे, आणि घाम कपाळावर ओघळत असतां, खिशांत नसलेला रुमाल हुडकीत अस्वस्थपणें चालावें लागत असे. दिवसाढवळ्या जिथें बघायचीदेखील चोरी तिथें तो नेहमीं राजरोसपणें जाऊन बसत असे. स्नेहलतेला कसलेहि वाईट हात पुसायचे असले, म्हणजे

त्याला आपला रुमाल पुढें करावा लागत असे आणि तो बेटा स्नेहलतेच्या गालाभोंवतीं नाजुकपणें घोटाळत आणि तिचें दुष्ट हास्य अर्धवट लपवीत मोठ्या ऐटींत वावरत असे.

क्षणार्धांत बंडूनें त्या रुमालावर झडप घातली. आणि त्यासरशीं स्नेहलता मोठ्यानें किंचाळली, "क्यॅक् !"

झटक्यासारखा बंडूनें हात मागे घेतला आणि आपला घामाघूम होणारा चेहरा आपल्या मोठ्या रुमालानें पुसत तो घाबऱ्याघुबऱ्या म्हणाला, "अग! अशी ओरडतेस काय मूर्खासारखी? लोक काय म्हणतील?"

"मी काय करूं? मला भीति वाटली म्हणजे मी ओरडतें!" स्नेहलतेनें नेहमींप्रमाणें आपलें निरपराधित्व सिद्ध केलें.

तेवढ्यांत बंडूच्या अपेक्षेप्रमाणें वेटर तेथें येऊन पोंचला आणि संशयी मुद्रेनें बंडूकडे पहात म्हणाला, "यस् सर?"

मग बंडूनें चतुराईनें त्याला सांगितलें कीं, झुरळ पाहिल्यामुळें स्नेहलता ओरडली; पण वेटरला तें पटेना. आपल्या सुंदर फॅमिली-रूममध्यें झुरळ असेल हें त्याला खरेंच वाटूं शकत नव्हतें. त्यानें पुन्हा एकदा शोधक दृष्टीनें सर्वत्र पाहिलें. आणि मग बंडूकडेच, जणुं तोच झुरळ आहे अशा नजरेनें तो पाहूं लागला. त्यामुळें बंडू अस्वस्थ झाला आणि वेटरचा संशय दुणावला. बंडूला त्यानें विचारलें, "आणखी काहीं पाहिजे का?"

आपण आतां जावें अशी ही आडवळणानें दिलेली सूचना आहे, हें बंडूनें जाणलें आणि त्यानें सागितलें, "काहीं नको. बिल आण."

तो गेल्यावर बंडू स्नेहलतेकडे पहात मुठी आवळून म्हणाला, "काय अडाणी आहेस तूं? त्याला वाटलें असेल कीं तूं दुसऱ्या कोणाची तरी बायको आहेस, आणि मीं तुझ्याशीं चावटपणा करण्याचा प्रयत्न केला, म्हणून तूं ओरडलीस!"

"मग आतां मीं काय करूं? मीं पाहिजे तर त्याला सांगतें कीं मी तुमची बायको आहें म्हणून!" स्नेहलता रडक्या आवाजांत म्हणाली. तिच्या डोळ्यांतला चोवीस तास पाणी असलेला टाकीचा नळ वाहूं लागला आणि ती छोटा रुमाल पाजळून काजळ बिघडणार नाहीं अशा बेतानें डोळ्यांच्या कडा पुसूं लागली.

"अग अग! रडूं नकोस; नाहीं तर पुन्हा तो पाहील!" बंडू चोरलेल्या आवाजांत ओरडला.

"तुम्ही आधीं ओरडूं नका माझ्यावर." हुंदका देत स्नेहलता म्हणाली. काय करावें आणि काय बोलावें तें बंडूला समजेना. त्यानें आपला भला मोठा रुमाल आपल्याच तोंडांत कोंबला आणि तो म्हणाला, "गॉप गॉप!"

पण तेवढ्यांत वेटर बिल घेऊन आला. त्यानें स्नेहलतेला डोळे पुसतांना पाहिलें. आणि बंडू जेव्हां त्याला आठ आणे टिप ठेवून लगबगीनें बाहेर पडला तेव्हां त्याचा संशय अधिकच दुणावला; निदान बंडूला तरी तसें वाटलें! त्यामुळें बंडू थोडा वेळ लगबगीनेंच चालला. आपल्या पातळात अडखळत आणि उंच टांचांच्या चपलामुळे पाय ठिकठिकाणीं मुरगळून घेत स्नेहलता त्याच्याबरोबर धावत होती. तिला असें धावावें लागत आहे हें बंडूला बरें वाटलें. खाशी जिरत होती! आणि म्हणून तो अधिकच तावातावानें चालत होता.

पण मध्येंच बंडूनें मागे वळून पाहिलें, तो मागे स्नेहलता नव्हती. माणसांचा एक घोळका मात्र जमला होता. बंडू घाईनें मागें जाऊन पहातो तों, रस्त्यांत पडलेली स्नेहलता कशीबशी उभी रहात होती आणि लोक अत्यंत सहानुभूतीपूर्वक तिला मदत करीत होते. कोणी तिची पर्स उचलून झटकीत होता, तर कोणी तिचा रुमाल तिच्यापुढें करीत होता. बंडू गर्दीत घुसून, 'काय झालं ग?' असें जेव्हां विचारूं लागला, तेव्हा लोक त्याच्यावर रागावले. त्याला उपदेशाचे डोस पाजूं लागले. एक म्हातारा पार्शी संतापून म्हणाला, "अरे काय? तमे बाईमाणसची पर्वा नाय करते? असा कसा तमे मानस?"

एका महाराष्ट्रीय जोडप्यातला कुर्रेबाज नवरा आपल्या गिरेंबाज बायकोला म्हणाला, "शहाणाच दिसतोय गृहस्थ मोटा!"

आणि एक अडाणी माणूस चुटपुटला, "हीं शिकलेलीं मानसं...!"

त्यानंतर स्नेहलतेला सावरीत बंडू रेक्लमेशनवर जाऊन पोंचला. तिथें पोंचेपर्यंत स्नेहलता सारखी बडबडत होती, "ही कसली मेली एंजॉयमेंट? मला असं छळायचं होतं, तर आणलं तरी कशाला? एंजॉयमेंट म्हणजे काय, असं तंगड्या तोडीत धावायचं?"

शक्य तों लाचार चेहरा करून बंडू हें सगळें ऐकून घेत होता आणि स्वतः-

शींच असा विचार करीत होता कीं, प्रत्येक प्रसंगांत पुरुषानेंच चूक ठरावें आणि त्याच्याच डोक्यावर दोषाचें सगळें खापर फुटावें, अशी काय चतुर योजना त्या बाईलवेड्या परमेश्वरानें करून ठेवली आहे ?

रेक्लमेशनच्या कट्ट्यावर बसल्यावर थोड्या वेळानें, नवऱ्याकडून आपण पुरेसें कौतुक करून घेतलें, असें स्नेहलतेला वाटलें आणि क्षमायाचनेच्या कर्तव्यातून बंडूची मुक्तता झाली. रेक्लमेशनवर वारा चांगला येत होता आणि संधिप्रकाशांत लठ्ठ पारशी बाया आणि काळ्या कुळकुळीत आयादेखील डोळ्यांत खुपत नव्हत्या. शिवाय आपण दुःखात आहोत अशी कल्पना झाल्याकारणानें स्नेहलतादेखील त्याला प्रश्न विचारून भंडावीत नव्हती. 'अमेरिकेंत तो धब-धबा आहे त्याचें नाव काय हो ?' असें निरागसपणें विचारत नव्हती आणि 'नायगारा' असें म्हटल्यावर 'मुळींच नाहीं. गिरसप्पा !' असें प्रतिपादन करीत नव्हती. त्यामुळें बंडूचें मन प्रसन्न होऊं लागलें. आपण एंजॉय करीत आहोत अशी शंकादेखील त्याला पुन्हा येऊं लागली.

तेवढ्यांत स्नेहलता तोंडावर हात ठेवून म्हणाली, "अय्या ऽऽ !" तो 'अय्या' बराच लांबला आणि तो संपला तरी स्नेहलतेचा हात तसाच तोंडावर होता आणि डोळे मोठाले होऊन आभाळांत जाऊन राहिले होते.

बंडू घाबरून म्हणाला, "ऑ ? काय झालं ?"

स्नेहलतेनें पुन्हा तोंडावर हात ठेवून म्हटलें, "अय्या ऽऽ !—अहो ! सांगू का ?"

"अग तेंच म्हणतोंय मी ! सांग मला काय तें." बंडू नवऱ्याच्या शांततेनें म्हणाला.

"पण गडे रागावणार नाहीं ना ?"

"हीः हीः हीः ! नवरा कधीं बायकोवर रागावूं शकतो का, लाडके ?— हीः हीः हीः !" बंडू हिस्टेरिकल झाला.

"अहो ! इकडे बघा—ऐका तरी !"

प्राणाचा धडा करून बंडू ओठ आवळून आणि हिंसा करण्याकरितां शिव-शिवणारे हात काखांत मुडपून गप्प बसून राहिला.

"अहो ! मीं किनई, येतांना इस्तरीचं बटन बंद करायचं विसरलें कीं काय असं वाटतंय्. आता काय होईल हो ? आग लागेल का घराला ?"

"एव्हांना बहुधा जळून खाक झालं असेल तें !" बंड्र शांतपणें म्हणाला. त्या क्षणीं आपल्या डोक्यावर पेट्रोल ओतून बंड्रनें अगदीं सहजपणें स्वतःच्या अंगाला काडी लावून टाकली असती. पण त्यानें नुसतं मंद हास्य केलें.

आणि मग ठेंचकळत, अडखळत, लगबग करणाऱ्या आणि रणकुंडीला आलेल्या स्नेहलतेला सावरीत, मजा करायला बाहेर पडलेला बंड्र स्टेशनकडे घामाघूम होत पळूं लागला.

* * *

# दोन चाकें ४

सकाळच्या चहाची वेळ. सर्व नवऱ्यांप्रमाणें बंडूदेखील त्या वेळीं गाफील मनःस्थितींत होता. नवऱ्याच्या दृष्टींतील ती कावेबाज चमक त्या वेळीं त्याच्या नजरेंत नव्हती आणि विशेष हुषार नवऱ्यांच्या चेहेऱ्यावरचा खोटा भोळा भाव देखील त्याच्या चेहेऱ्यावर नव्हता. त्याचें लक्ष हातातल्या ताज्या वर्तमानपत्राकडे होतें. यांत्रिकपणें तो गरम चहाचे घुटके घेत होता. आणि त्याचा हात बिस्किटाच्या डब्याकडे गेला होता तो केवळ अभावितपणें!

स्नेहलतेनें झटक्यानें त्याचा हात डब्यांतून काढून टाकला. आणि आव्हानपूर्वक डब्याचें झांकण फट्दिशीं लावलें. असें आव्हान दिल्यावर बंडू सर्वसाधारणपणें संतापानें ताडकन् उभा रहात असे आणि डबा उघडून त्यांतली बिस्किटें भराभर स्वतःच्या तोंडांत कोंबत असे. स्वतःचें तोंड भरल्यावर स्नेहलतेच्या तोंडांत कोंबत असे आणि डब्यांतली बिस्किटें संपेपर्यंत हा प्रकार चालू रहात असे.

पण ह्या वेळीं बंडूनें तें आव्हान स्वीकारलें नाहीं. त्याचा हात मागें सरकून बिस्किटांच्या रिकाम्या बशींत फिरला आणि मग चहाच्या कपाकडे वळला.

"नीट धरा कप; चहा सांडेल ना!" स्नेहलतेनें आणखी एक आव्हान दिलें.

"आं?" बंडू म्हणाला आणि त्यानें चहाचा कप तिच्या हातांत दिला.

"डोंबल तुमचें."

"हां हां!" बंडू म्हणाला आणि तिच्या हातांतला कप घेऊन त्यानें तोंडाला लावला.

नवरा इतका गाफील असतांना त्याचा फायदा न घेणाऱ्या बाईला पुरुष म्हटलें पाहिजे. स्नेहलतेच्या डोक्यातील मागण्यांच्या डब्याचें झाकण फट्दिशीं उघडलें. तिला आठवण झाली कीं, आपल्याला सायकलीवर बसायला शिकायचें आहे. तिची मैत्रीण कुमुद नुकतीच सायकलवर बसायला शिकत होती आणि सायकल शिकतांना ती आणि तिची सायकल नवऱ्याच्या अंगावर कशी पडली त्याचें रसभरीत वर्णन ऐकून आपणहि सायकलवर बसायला शिकावें असें स्नेहलतेला वाटूं लागलें होतें. आपल्या नवऱ्याचा पाय चेनमध्यें कसा अडकला आणि आपण तो कसा सोडवला तें इतरांना सांगायला ती उत्सुक झाली होती. म्हणून ती शक्य तितक्या निष्काळजीपणें म्हणाली, "सायकल चालवणें फार कठीण असतें का हो ?"

तेवढ्यात बंडू किंचाळला, "बाप रे! ठार झालो! रशियाजवळ अडीचशें ॲटम बॉम्ब ! मला वाटत होतें कीं, त्याच्याजवळ फक्त पन्नासच आहेत म्हणून. पण अडीचशें !—जस्ट इमॅजिन् !"

बंडूच्या चेहऱ्यावरच्या वेदना जरा कमी झाल्यावर स्नेहलता म्हणाली, "साय-कलवर बसण्यांत कठीण तें काय मेलें—दोन दिवसात येईल !"

तेवढ्यात बंडू खो खो करून हसूं लागला.

स्नेहलता चिडून म्हणाली, "खी खी करायला काय झालें ?"

"अग, ह्या पॉपला दारू प्यायल्यामुळें एका बायकोच्या ठिकाणीं दोन बायका दिसायला लागल्या आणि त्यामुळें तो आत्महत्या करायला निघाला आहे." आणि स्नेहलतेच्या पाठीवर थाप मारून अधिकच खो खो करीत बंडू बाहेर निघून गेला.

ह्यानंतर स्नेहलतेनें आपला संभाषण करण्याचा यत्न थांबवला आणि हातांत वर्तमानपत्र आल्यावर पुरुष असें कां वागतात त्याबद्दल मोठ्यानें आश्चर्य व्यक्त करीत ती घरांत गेली.

बंडू घरांत आल्यावर त्याच्यावर कसा हल्ला करावचा ह्याचा बेत स्नेहलतेनें करून ठेवला होता. पण बंडू घरांत आला तोंच मुळीं दाणदाण पाय आपटीत. आणि तिच्या तोंडांतून शब्द बाहेर पडण्यापूर्वींच दाढीचें भांडें तिच्या नाकासमोर धरलें गेलें आणि बंडू तिच्या कानांत ओरडला, "गरम पाऽणीऽऽ !"

ह्यावर कुठचीहि बाणेदार गृहिणी जे करील तेंच तिनें केलें. आपल्या नाकाजवळचें भाडें तिनें दूर भिरकावून दिलें आणि आपल्या कानाजवळच्या नवऱ्यावर हातानें प्रहार करून ती ओरडली, "चालते व्हा आधीं येथून !"

बंडूनें मुकाट्यानें तें भांडें उचललें, थंड पाण्यानें भरलें आणि मग जातां जातां त्यातलें अर्धे पाणी स्नेहलतेच्या डोक्यावर ओतून तो बाहेर सटकला. आणि त्याच वेळीं भसाड्या आवाजांत त्याचे गाणें सुरू झालें, 'धिःकार मन साहिना...'

स्नेहलता त्याच्या मागोमाग तणतणतच बाहेर गेली. आणि तणतणतांना सायकलीवर बसण्याचा विषय सफाईनें काढण्याचा तिचा विचार होता. पण ती बाहेर जाताच "धिःकार, धिःकार, धिःकार..." असें म्हणत मुठी वळून बंडूनें तिच्यावर चाल केली आणि मग आत पळून जाऊन दार लावून घेण्याशिवाय तिला मार्गच शिल्लक राहिला नाहीं.

पण सायकलीचा हा विषय तिच्या मनात इतका मळमळत होता कीं, थोड्याच वेळानें तिनें बाहेर डोकावलें. त्या वेळीं बंडू आपल्या नाकाची बोडी नाजुकपणें उचलून नाकाच्या कडेवर असलेल्या मिशीच्या केसाची सफाई करीत होता. नवऱ्याला भीति वाटेल अशा मागण्या करायची ती खात्रीनें वेळ नव्हती. आणि नंतर बंडू आंघोळ करीत असताना जेव्हा तिनें बाहेरून त्याच्याशीं बोलण्याचा प्रयत्न केला तेव्हा तो चक्क म्हणाला, "आंघोळ करतांना माझ्याशीं बोलूं नको. मला लाज वाटते!"

आतां काय म्हणावें ह्या निर्लज्ज माणसाला!

निदान जेवतांना तरी पुरुष पुष्कळसा नम्र आणि आज्ञाधारक मनःस्थितींत असतो. ताटाकडे बघताना त्याची मान आपोआपच लवलेली असते आणि एकीकडे सफाईनें पोळीं परतीत असतांना, बायका तितक्याच सफाईनें नवऱ्याच्या हृदयाची उलथापालथ करीत असतात. त्या वेळीं बायकोनें सायकलीवरच काय पण उंटावर बसायची जरी इच्छा व्यक्त केली तरी ती पुरी करायची नवरा तयारी दाखवितो. नव्हे, तिनें सुचवायच्या आधीच हाकलल्या जाणाऱ्या शेळीची भूमिका स्वतःकडे घ्यायला तयार असतो. कारण बायकोनें रांधलेलें अन्न ज्या क्षणीं पुरुष खात असतो, तो त्याच्या मोठ्या पराभवाचा क्षण असतो !

पण पुरुषाच्या लाचारीला देखील मर्यादा असते. बंडूच्या पानांत जेव्हा मटक्यांची उसळ पडली तेव्हा बंडू बिथरला. बंडू तसा सहनशील होता. त्यानें कच्च्या केळ्यांची भाजी, आपण पिकलेल्या वेलची केळ्यांचा घड खातो आहोंत अशा थाटांत खाल्ली होती. तांबडा भोपळा या नावाखाली बायकोनें खरेदी केलेल्या पांढऱ्या भोपळ्याशीं त्यानें मैत्रीचे संबंध ठेवलेले होते. कारल्याची भाजी पानांत पडल्यावरदेखील त्यानें घटस्फोट घेण्याची मनीषा व्यक्त केली नव्हती. पण मटक्याची उसळ पाहून त्याचें पित्त खवळलें. तो तारस्वरांत ओरडूं लागला, "मटक्यांची उसळ? म्हणजे मांडलें आहेस काय तूं हें? मग चिचोक्यांची भाजी कां नाहीं करीत? प्लायवुडचे पापड कां नाहीं तळून काढीत? भुशाची चटणी ती ह्याहून काय वाईट लागणार आहे? मी म्हणतों, मग जेवायचें तरी कशाला माणसानें? पेंड आणि सरकी खाऊन का राहूं नये?"

बंडूनें त्या दिवशीं जितकें अस्खलित व परिणामकारक वक्तृत्व गाजवलें तितकें त्यानें आयुष्यात आधीं कधीं गाजवलें नव्हतें. नंतर कधीं गाजवलें नाही. त्याचें वक्तृत्व ऐकून खुद्द त्याच्या बायकोला देखील आपलें कदाचित् चुकलें असेल अशी पुसट शका आली. आणि आपण चवळ्या अगर डाळिंब्या कां नाहीं झालो असा प्रश्न प्रत्येक मटकी दुसऱ्या मटकीला विचारूं लागली. आमटीच्या वाटींत बुडून आपण जीव द्यावा असें त्या सगळ्यांना प्रामणिकपणें वाटूं लागलें.

बंडू असा नैतिक विजय मिळवीत असता, सायकलवर बसण्याचा प्रश्न उपस्थित करण्याइतकी कांहीं स्नेहलता दूधखुळी नव्हती. तिनें त्या विषयाला अजिबात बगल देऊन बंडूच्या पुढें साखर घातलेली साय ठेवली. आणि थोड्याच वेळांत बंडूच्या वृत्ती ओषट झाल्या. पण त्या पुरेशा ओषट होण्यापूर्वीच बंडूनें घड्याळाकडे पाहिलें. आणि नेहमींप्रमाणेंच त्याच्या ध्यानांत आलें कीं आपल्याला ऑफिसांत जायला उशीर होतो आहे. मग घरात नेहमींप्रमाणें एक छोटेंसें वादळ झालें. उडी मारून बडू पानावरून उठला. साहजिकच त्या वेळीं त्याच्या पायाखालचा पाट घसरला आणि बंडूच्या हाताला आधार शोधण्याच्या प्रयत्नांत भिंतीवर लटकलेलीं सुपें, रोवळ्या, टोपल्या वगैरे वस्तू बंडूच्या डोक्यावर कोसळल्या. मग तपेलीचा मोरींत कपाळमोक्ष झाला. बंडू तसाच

तिरिमिरीनें धांवला आणि त्यानें किल्ली केलेल्या कपाटाच्या दाराशीं झोंबी केली आणि स्नेहलतेनें किल्ली लावून कपाट उघडल्यावर, शिंप्याकडे देण्याकरितां वरच ठेवलेली फाटकी पॅट त्यानें आवेशपूर्वक पायात चढवली. आपल्या फाटक्या गंजिफ्राकाकडे पहात त्यानें करुण रसानें भरलेलें एक भाषण केलें. अलम पुरुष जातीचे गंजिफ्राक नेहमीं फाटलेलेच असतात असें धाडसी विधान स्नेहलतेनें केल्यावर त्यानें आवेशाच्या भरात तिचा एक जंपर फाडण्याचा यत्न केला. आणि अखेर स्नेहलतेनें हातात दिलेला रुमाल 'काय बुवा ही कटकट' म्हणून तिच्या हातांत परत देत तो दौडत घराबाहेर पडला.

तो गेल्यावर स्नेहलतेनें चिडून कपाटाचें दार धाडदिशीं लावलें आणि भाड्याचे नादनिनाद मग बराच वेळ घरात होत राहिले. काम उरकून एक रहस्यकथा वाचल्यावर तिला उत्साह वाटूं लागला. त्या रहस्यकथेंत एकाऐवजीं चार खून झाले होते. त्यामुळें आता रात्रीं आपल्याला भयकर स्वप्नें पडतील व आपण किंचाळत जाग्या होऊं अशी स्नेहलतेला खात्री वाटूं लागली. साहजिकच तिला उत्साह वाटूं लागला. ती उठून कुमुदकडे गेली आणि दोघींनीं नवऱ्यांच्या भरपूर कागाळ्या एकमेकींना सागितल्या. अखेर सायकलवर बसण्याचा आपला निश्चय अधिकच बळकट करून स्नेहलता घरीं परतली.

संध्याकाळीं तिनें बंडूकरितां शिरा तयार करून ठेवला आणि बंडूला आवडणारी फुलांची वेणी आणून मुद्दाम केसात घातली. भकास मुद्रेनें घरीं आलेल्या बंडूकडे पाहून तिनें नुकत्याच पाहिलेल्या एका सिनेमांतला दृष्टिक्षेप टाकला आणि हृदयाला चीर पाडणारें हास्य तिनें केलें.

पण बंडूच्या भकास मुद्रेवर त्या अभिनयाचा व हास्याचा कांहींच परिणाम झाला नाहीं. सरळ मुद्द्याला हात घालीत तो म्हणाला, "खायला काय केलें आहेस? कीं सकाळची मटक्यांची उसळ ठेवणार आहेस माझ्यापुढें? आणि हें पहा, अलीकडे पुरुष आपला शर्ट पाटलोणींत खोवतात. त्यामुळें शर्टाला तोंड पुसतां येत नाहीं. म्हणून रुमाल ह्या संस्थेला आजकाल विशेष महत्त्व चढलें आहे. तरी—"

ह्यावर अतिशय झणझणीत उत्तर स्नेहलतेला सुचलें होतें. नव्हे, झणझणीत उत्तरें देण्याच्या बाबतींत बंडू तिच्यापुढें अगदींच क्षुल्लक ठरत असे. पातळ

कागदावर मशीनगनची फैर झडली तर त्याची जी अवस्था होईल तीच बंड्डूची तिच्यासमोर होत असे. पण स्नेहलतेनें आपली झणझणीत उत्तरें त्या वेळीं तशींच गिळली आणि बंड्डूपुढें गोड शिऱ्याची बशी ठेवली. थोड्याच वेळांत बशींतला शिरा संपला आणि त्याचा ओषटपणा बंड्डूच्या समाधानी चेहऱ्यावरून ओघळूं लागला. मग तो बोटें चाटीत म्हणाला, "लाडके! मघाशीं हसलीस तशी आता हस पाहूं."

स्नेहलता म्हणाली, "इश्श!" तिला खुदकन् हसूं आलें. आधींच्या सिनेमातल्या साचेबंद हास्यापेक्षा हें हास्य पुष्कळच सुंदर होतें. त्यामुळें बंड्डू खूष झाला. आवेगानें उठून त्यानें तिचीं दोन तीन डझन चुंबनें घेतलीं. तिचे केस विसकटून टाकले आणि तिच्याबरोबर काहीं वेळ इंग्रजी पद्धतीचें नृत्य केलें. म्हणजे तिच्या पायावर बऱ्याच वेळां पाय देत त्यानें तिला इकडून तिकडे फरफटत नेलें. ह्यामुळें स्नेहलता इतकी खूप झाली कीं तिचा सायकलचा विषय तसाच राहिला. बंड्डूच्या हातातून निसटून घरांत पळत जात ती म्हणाली, "इश्श! हात तरी धुवायचे होतेत आधीं."

आणि तेवढ्यांत त्या दक्ष गृहिणीनें चुलीवरच्या भाताकडे पाहिलें आणि त्यावरची पेज मोरींत काढून टाकली.

त्याच वेळीं बंड्डू घरांत आला आणि हात धुण्याकरितां त्यानें मोरींत प्रवेश केला. त्यानंतर काय झालें तें स्नेहलतेनें पाहिलें नाहीं. पण गुळाची ढेप फोडतांना जसे आवाज होतात तसे आवाज होऊन जमीन थरथरली. मग बालड्या व तपेल्या कडाक्याचें भांडण करीत आहेत असें वाटूं लागलें, आणि त्याचवेळीं पाण्याचे सपकारे सबंध स्वयंपाकघरांत उडाले.

स्नेहलता घाबरून गेली आणि "धावा! धावा! आग!" अशा किंचाळ्या मारीत बाहेर पडली. नंतर त्या पतिव्रतेच्या ध्यानांत आलें कीं आपल्या पति-देवाला मदत करण्याकरितां आपण मोरीपाशीं हजर राहिलें पाहिजे, आणि धावतच ती मोरीजवळ गेली. त्या वेळीं बंड्डूची एक तंगडी नळाच्या गळ्यांत अडकलेली होती आणि दुसरी कोपऱ्यांत मुडपलेली होती. त्याच्या पोटावर मोरी घासायचा ब्रश पडला होता. एका हातांत त्यानें तपेली तशीच घट्ट धरलेली होती. आणि कलंडलेल्या बालडींत त्याचें डोकें विसावलें होतें.

स्नेहलता म्हणाली, "अगबाई !"

बंड्डू बालडींतून निनादला, "डोंबल तुझें ! आधीं बालडींतून डोचकें बाहेर काढ माझें !"

स्नेहलता म्हणाली, "पण गडे, तुम्ही उठल्याशिवाय बालडी कशी काढतां येईल ?"

"अग गाढवे, मला उठतां आलें असतें तर तुला बालडी काढायला कशाला सांगितलें असतें ?"

बंड्डूला आणखी खूपच परिणामकारक वक्तव्य करायचें होतें. पण बालडींत डोकें अडकलेलें असलें, तंगडी नळाच्या गळ्यांत अडकलेली असली आणि पोटावर मोरी घासायचा ब्रश असला म्हणजे तितकेंसें परिणामकारक वक्तव्य करतां येत नाहीं.

बऱ्याचशा शंकाकुशंका घेतल्यावर, स्नेहलतेनें त्याला इष्ट ती मदत केली आणि ठिकठिकाणीं वाकलेलें आपलें शरीर सरळ करण्याचा प्रयत्न करीत तो मोरीच्या बाहेर पडला.

आणि तेवढ्यांत स्नेहलता कळवळून म्हणाली, "अग आई ग ! केवढा पोचा आला तपेलीला !"

ह्या दुर्दैवी उद्गारानंतर घरांत छोटेंसें वादळ होणें अपरिहार्य होतें. पण त्याच वेळीं सुदैवानें शेजारच्या बिऱ्हाडांतल्या कुटुंबवत्सल गृहस्थानें आपल्या सहा मुलांना फुगे घेऊन दिले आणि तीं मुलें फुग्यांवरून प्रेमानें हात फिरवूं लागलीं. बंड्डू कितीहि सामर्थ्यवान् असला तरी हातांत फुगे असलेल्या सहा मुलांच्याहून मोठा आवाज करणें त्याच्या आवाक्याबाहेरचें होतें. त्यामुळें शक्य तेवढे (कारण त्याचा हात मुरगळला होता) हातवारे करून त्याला आपल्या भावना व्यक्त कराव्या लागल्या.

आणि रात्रीं नऊ वाजतां तीं मुलें झोपेपर्यंत त्या दोघांना आपलें संभाषण खाणाखुणांच्या मदतीनेंच करावें लागलें.

रात्रीं तीं मुलें झोपलीं तेव्हां बंड्डू व स्नेहलता ह्यांना त्यांच्याविषयीं इतकें शत्रुत्व वाटूं लागलें होतें कीं, तीं आपापसांतील किरकोळ धुसफुस विसरून गेलीं होतीं.

आणि जेवण चालू असतांना कडेलोट, हत्तीच्या पायीं देणें, हातपाय तोडणें वगैरे जुन्या काळच्या शिक्षा मुळींच क्रूर कशा नव्हत्या आणि आजच्या युगांत त्या कशा उपयुक्त ठरतील तें बंडू स्नेहलतेला आवेशानें समजावून सांगत होता. त्याच्या आवेशाशीं समरस होणें स्नेहलतेला जितकें अशक्य होतें तितकेंच सायकलीचा विषय काढणेंहि शक्यतेच्या पलीकडचें होतें. मटक्यांची उसळ खात तिनें तें वक्तृत्व ऐकून घेतलें.

जेवून उठल्यावर स्नेहलता घरातलें काम आवरीत असतां बंडू रहस्यकथा चाळीत बिछान्यांत पडला. रहस्यकथाचे अनेक लोकांवर अनेक परिणाम होतात. बंडूवर त्यांचा परिणाम होत असे तो गाढ झोप येण्याचा. रहस्यकथेंतला पहिला खून होईपर्यंत बंडू जेमतेम तग धरीत असे. पण खुनी इसमानें गाफीलपणें झोपलेल्या माणसाच्या मस्तकांत रिव्हॉल्व्हरची गोळी झाडली कीं बंडू समाधानानें झोपीं जात असे. बंडूच्या हातांतल्या रहस्यकथेंत पहिल्याच पानावर खून झालेला होता. त्यामुळें बंडूनें लवकरच समाधानाचा सुस्कारा सोडला आणि तो निश्चिंतपणें गाढ झोपीं गेला. जगांत ज्याअर्थी खून, मारामाऱ्या चालल्या आहेत त्याअर्थी तें सुरळितपणें चाललेलें आहे असा बहुधा त्यानें निष्कर्ष काढला असावा.

स्नेहलता काम उरकून लगबगीनें जेव्हां त्याच्याजवळ आली तेव्हां त्यानें झोपेच्या स्कायस्क्रेपरच्या एकावन्नाव्या मजल्यावर प्रवेश केला होता. आणि स्नेहलतेनें हलक्या आणि गोड आवाजांत "गडे! इकडे बघा ना! झोप लागली वाटतें! इश्श! असें काय?" वगैरे जे उद्गार काढले ते त्याच्यावर कांहींच परिणाम करूं शकले नाहींत. त्यानंतर "जळ्ळी मेली ती झोप!" असें जेव्हां स्नेहलता जळफळूं लागली तेव्हां बंडू ह्या कुशीवरून त्या कुशीवर वळला, आणि स्नेहलता जेव्हां त्याच्या कानांत ओरडून त्याला चिमटे काढूं लागली, तेव्हां बंडू झोपेंतच म्हणाला, "अग! किंचाळूं नको. तुझा कांहीं खरोखर खून झालेला नाहीं. तुला स्वप्न पडतंय् तें!" आणि तो तिला थोपटूं लागला. कारण रहस्यकथांच्या वाचनामुळें स्नेहलतेला रोज रात्रीं आपला खून होत आहे असें स्वप्न पडत असे आणि बंडूला तिची अशी समजूत काढावी लागत असे. साहजिकच सराईतपणें हे उद्गार त्याच्या तोंडांतून निघाले.

अखेर अनेक प्रयत्नांनंतर बंडू जागा झाला. स्नेहलता रागारागानें त्याच्या

अंगावरचें पांघरूण ओढीत म्हणाली, "हें हो काय?"

बंडू सरळपणें म्हणाला, "हें ना? हें पांघरूण."

"मी सांगून ठेवतें. तुम्हीं मला सायकलवर बसायला शिकवलें पाहिजे."

"बरें बरें हं!" बंडू म्हणाला आणि कूस बदलून झोपला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं जेव्हां स्नेहलतेनें बंडूला उठवलें आणि त्याच्या रात्रीच्या कबुलीजबाबाची त्याला आठवण दिली तेव्हां बंडूनें बंड पुकारलें.

"झोपेंत असलों म्हणून काय झालें? इतका मूर्खपणा करायला मी म्हणजे तूं आहे कीं काय?" त्यानें बिछान्यांत पाय आपटले.

स्नेहलतेनें पुन्हा त्याला समजावून सांगण्याचा प्रयत्न केला, तेव्हां तो हसून म्हणाला, "अग, तुझा गैरसमज झालेला दिसतो आहे. स्वप्न पडलें असलें पाहिजे तुला तें." त्यानें पांघरूण ओढून घेतलें आणि अखेर "सध्या तूं धुण्याची काठी घेऊन घोडा घोडा करीत धावायची प्रॅक्टिस कर," असा स्नेहलतेला सल्ला देऊन तो गाढ झोपीं गेला आणि आठ वाजतां जागा झाला.

दुसरा सबंध दिवस मग अर्थातच धुसफुशींत आणि भांडणात गेला. त्या दोघांनीं एकमेकांशीं प्राण गेला तरी शब्द न काढण्याचा घोर निश्चय त्या दिवसांत सात वेळां केला आणि तीन वेळां आपला एकमेकांशीं कांहींहि संबंध नसल्याचें जाहीर केलें. बंडू स्वतः वाढून घेऊन जेवला आणि आपल्या आयुष्यांतला स्वावलंबनाचा त्यानें उच्च बिंदु गांठला आणि बाजारांत खरेदी करायची वेळ आली तेव्हां बंडूच्या खिशांतले पैसे न घेतां स्नेहलतेनें स्वतःच्या पर्समधले पैसे खर्च केले आणि बाणेदारपणाच्या उंच उडीचा विक्रम केला.

तरुण नवराबायकोंच्या सर्व भांडणांप्रमाणें तें भांडण रात्रीं मिटलें. आपण किती दुष्ट व नीच आहोंत तें बंडूनें वक्तृत्वपूर्ण पद्धतीनें सांगितलें आणि स्नेहलतेनें उदारपणें तें सगळें कबूल करून त्याला क्षमा केली. आपण किती सहनशील व प्रेमळ आहोंत तें स्नेहलतेनें तितक्याच परिणामकारकपणें सांगितलें आणि भोळ्या बंडूनें तें उदारपणें कबूल केलें.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं बंडूला स्नेहलतेच्या औदार्याविषयीं तितकीशी खात्री वाटत नव्हती. पण युगानुयुगें पुरुषाला स्त्रीविषयीं भीति वाटत आली आहे. त्या

भीतीनें तो टरल्याप्रमाणें आज्ञाधारकपणें उठला. मग नट्टापट्टा करणाऱ्या स्नेहलतेला पाहून त्यानें भोळेपणानें प्रश्न विचारला, "तुझे सायकल चालवणें बघायला तूं इष्टमित्रांना व त्यांच्या लेकीसुनाना आमंत्रण दिलें आहेस कीं काय? कीं आपण आज एखाद्या लग्नाला चाललों आहो?"

त्यावर स्नेहलतेनें खेकसून विचारलें, "तुम्ही शिकविणार आहात कीं नाहीं मला सायकल फिरवायला?"

बंडूनें पुन्हा मूग नव्हे मटक्या गिळल्या. आणि आज्ञाधारकपणें तिच्या मागोमाग बाहेर पडून तो सायकल भाड्यानें देणाऱ्या दुकानात गेला. त्याला पाहून दुकानदारानें एक चागल्यापैकी सायकल पुढें करून म्हटलें, "घ्या साहेब, आज काय सकाळींच ट्रिप मारायचा विचार आहे कीं काय?"

बंडूनें सरळपणें उत्तर दिलें, "नाही. आमच्या ह्यांना सायकलवर बसायला शिकायचें आहे."

दुकानदारानें स्नेहलतेकडे पाहिलें आणि घाईनें ती नवी सायकल मागें घेत तो म्हणाला, "मग लेडीज् सायकल दिली पाहिजे ह्यांना."

आणि एक जुनाट सायकल फडका मारून त्यानें पुढें केली. बंडूनें ती तपासून पाहिली आणि तो ती घेणार इतक्यात स्नेहलता नाक मुरडून म्हणाली, "ती नको. तिला घंटा नाहीं. ती पलीकडची घ्या."

दुकानदार म्हणाला, "पण तिला मागचें चाक नाहीं आहे."

बंडूला हसूं आल्याचा स्नेहलतेला भास झाला. तेव्हां स्त्रीसुलभ सयुक्तिकपणानें ती म्हणाली, "मग पहिलीचें मागचें चाक काढून हिला लावा."

दुकानदार ह्या सूचनेनें बुचकळ्यांत पडला. तेवढ्यांत बंडू म्हणाला, "त्यापेक्षां त्या सायकलीची घंटा काढून ह्या सायकलला लावणें, मला वाटतें, अधिक सोपें जाईल."

दुकानदारानें ही सूचना तावडतोब अंमलांत आणली. पण स्नेहलतेला तें तितकेंसें पटलें नाहीं. आणि सायकलींचींच काय पण मोटारींचीं चाकेंदेखील लोक पटापट काढतात अशा अर्थाचें कांहीं तरी ती पुटपुटत राहिली. त्यानंतर तिनें बंडूला विचारलें, "आपण मैदानापर्यंत सायकल नुसतीच नेणार. तिच्यावर

कांहीं बसणार नाहीं. मग तेवढ्या वेळाचे ह्या दुकानदारानें कमी पैसे कां नये घेऊं?"

ह्यावर "बरें, बरें. पुढें चल." असें तोकडें उत्तर देऊन बंडू घाईनें चालायला लागला.

थोड्या वेळानें स्नेहलता म्हणाली, "मी धरतें गडे सायकल. म्हणजे मला प्रॅक्टिस होईल."

आणि सायकल हातांत धरून ती चालायला लागली. थोडा वेळ चालल्यावर तिची सायकल एकदम एका चहाच्या दुकानाच्या दिशेनें जाऊं लागली आणि बंडू आश्चर्यचकित होऊन त्या दृश्याकडे पहात असतांना सायकलनें एकदम मोर्चा फिरवला आणि ती एका गटाराच्या दिशेनें स्नेहलतेसकट धावूं लागली.

बंडू ओरडला, "अग! अग! थांब."

स्नेहलता किंचाळली, "अग थांब! थांबतच नाहीं मेली."

बंडू स्तंभित झाला आणि मग तीरासारखे धावत जाऊन त्यानें गटारांत कोसळणाऱ्या सायकलला बचावलें, आणि त्यामुळें स्नेहलतादेखील आपोआप बचावली.

आपल्या वीतभर रुमालानें घामाघूम झालेला चेहरा पुसत स्नेहलता म्हणाली, "तरी मी सांगत होतें कीं ही सायकल नको म्हणून. तिला मेलीला सरळ चालतांच येत नाहीं. ती मुळीं अशी वाकडी वाकडी चालते."

बंडूनें हातांत धरल्यावर सायकलीनें आपला द्वाडपणा टाकला आणि ती सरळ चालूं लागली. पण तरी पलीकडून चालणाऱ्या स्नेहलतेच्या पायाच्या नडगीवर तिनें आपल्या पॅडलनें आघात केलाच. स्नेहलता मटकन् खालीं बसली.

बंडूच्या मनांत आशा पालवली. त्याला वाटलें कीं स्नेहलता आतां सायकलवर बसायचा हट्ट सोडून देईल. पण स्नेहलता तशी कच्च्या दिलाची नव्हती. लंगडत लंगडत ती बंडूच्या मागोमाग चालूं लागली आणि "सायकलीला पॅडल हवींतच कशाला? पायाला लागतील अशा ठिकाणीं तीं कशाला चिकटवलेलीं असतात?" वगैरे मूलभूत प्रश्नांवर ती बंडूशीं चर्चा करूं लागली.

मैदानांत पोहोंचल्यावर बंडूनें सायकल घट्ट धरून ठेवली आणि स्नेहलतेला

सायकलवर चढायला सांगितलें. स्नेहलतेनें पदर खोंवला. आपल्या उडणाऱ्या बटा वेणींत खोंवल्या. हातांतल्या बागड्या व घड्याळ काढून बंडूच्या खिशांत ठेवलें. चेहऱ्यावर करारी भाव आणला आणि सायकलचें हॅंडल पकडून जागच्या जागींच पाय हलवले. बंडूला ती म्हणाली, "नीट धरून ठेवा हं."

आणि मग तिनें पुन्हा जागच्या जागीं हातपाय हलवले.

बंडू कंटाळून म्हणाला, "अग! चढ ना!"

स्नेहलतेनें पुन्हा पदर सोडून खोवला. पुन्हा आपले केस बंदिस्त केले अणि मग एकदम ती धडपडूं लागली. बंडू व सायकल लटलटां हलूं लागलीं. कांहीं वेळ बंडूनें धीरोदात्तपणें तें सगळें सहन केलें, आणि मग त्यानें विचारलें, "अग, तूं सायकलवर बसायचा प्रयत्न करते आहेस कीं माझ्या कडेवर बसण्याचा तुझा बेत आहे?"

तशी स्नेहलता जमिनीपासून जी दोनचार इंच वर उचलली गेली होती ती पुनः जमिनीवर आली आणि म्हणाली, "जा गडे! तुम्ही मला नर्व्हस् करतां."

आणि बंडू नेहमींप्रमाणेंच निरुत्तर झाला.

अखेर बंडूनें सायकल एका कठड्याला टेकून उमी केली आणि काय होतें आहे ते कळण्यापूर्वींच त्यानें स्नेहलतेला उचलून सीटवर बसवलें. सायकल नीट धरून तिचा एक पाय पलीकडे टाकला आणि तिचे दोन्ही हात हॅंडलवर ठेवले. इतकें झाल्यावर स्नेहलता किंचाळणें थांबवून व डोळे किलकिले करून म्हणाली, "अय्या! सायकलवर बसलें का हो मी? कुमुद तरी हवी होती बघायला."

तिनें हसण्याचा पुसटसा प्रयत्न केला. पण तेवढ्यांत बंडूनें सायकल चालवायला सुरुवात केली. त्यासरशीं तिनें डोळे घट्ट मिटले. अंग लाकडासारखें ताठ केलें आणि ती किंचाळूं लागली. बंडू घामाघूम होऊन सायकल ढकलीत होता. स्नेहलतेनें हॅंडल घट्ट धरून ठेवलें होतें आणि तिच्या लोंबत्या तंगड्या पॅडलवर पुन्हा पुन्हा आपटत होत्या.

'दोनतीन मिनिटें असा प्रकार झाल्यावर बंडू थकला आणि स्नेहलता सायकलीवरून खालीं उतरली—म्हणजे बंडूच्या अंगावर कोसळली.

बंडू म्हणाला, "केवढयानें किंचाळतेस ग तूं!"

स्नेहलता म्हणाली, "पण गडे तुम्ही चांगलें केलेंत. असें केल्याशिवाय माझी भीति कमी व्हायची नाहीं."

बंडू म्हणाला, "बरें, चढ पुन्हा वर."

आपली सुटलेली वेणी बांधीत स्नेहलता म्हणाली, "आतां गडे, तुम्ही एकदा बसून दाखवा सायकलवर. म्हणजे मला त्यातलें टेक्निक समजेल."

बंडू चटकन् सायकलवर स्वार झाला. तें पाहून स्नेहलता आश्चर्यानें म्हणाली, "अय्या! इतकें सोपें आहे सायकलवर बसणें? पाय हवेंत उडवून पलीकडे टाकायचा आणि पॅडल फिरवायचें? फुस्! हें काय मला सहज येईल. उगीच भेडसावलेंत तुम्ही मला."

सायकलवर बसल्यावर बंडूला अर्थातच रहावेना. तो पाच मिनिटांची एक लहानशी चक्कर मारून आला.

त्यानंतर स्नेहलता म्हणाली, "आतां तुम्ही नको गडे, मीच शिकते एकटी."

आणि कांहीं अंतरापर्यंत तिनें सायकल हातानें चालवत नेली. ती परत वळवून आणतां न आल्यामुळे तेथेंच उभी रहात ती म्हणाली, "आतां गडे तुम्ही पुन्हा एकदां फिरवा सायकल."

बंडूनें पुन्हा एकदां पंधरा मिनिटांची चक्कर मारली. मग स्नेहलतेनें एकदां सायकलची घंटी वाजवली आणि ती लाडिकपणें म्हणाली, "आतां पुरे गडे. उशीर होईल तुम्हाला ऑफिसांत जायला.—पण उद्यांपासून अगदीं सीरियस्ली हं."

दुसऱ्या दिवशीं—दुसऱ्या दिवशीं हा कार्यक्रम झालाच नाहीं. कारण सायकल पुष्कळ दिवसानीं हातांत आल्यामुळे बंडूचें डोकें भडकलें होतें. आपले कॉलेजचे दिवस त्याला आठवले. पुण्यांत बुधवारांत आपल्याला पोलिसानें कसें पकडलें होतें तें त्याला स्मरलें. आणि तो प्रसंग आतां तरी त्याला फार गंमतीदार वाटला. त्यानें दोनचार इतर मित्रांचीं डोकीं अशींच भडकवली आणि सुटी असल्यामुळें दुसऱ्या दिवशीं सगळेजण सायकलवरून ट्रिपला गेले स्नेहलतेनें शिरा बनवला आणि त्याचा डबा सायकलच्या हँडलला बांधला.

बंडू सायकलवर बसून संध्याकाळीं परत यायचा होता. पण तो सायकलचें कलेवर घेऊन रात्रीं परतला. त्याच्या अंगाला आयोडिन लावून मग त्याला गरम पाण्याच्या बाटलीनें शेकत असता स्नेहलतेनें उत्सुकतेनें विचारलें, "काय झालें?"

बंडू म्हणाला, "काहीं नाहीं ग. सगळें कसें परफेक्ट चाललें होतें. सायकल इतकी छान हॅंडल करीत होतों मी? पण येताना एकाएकीं मागून लॉरी आली आणि पुढून म्हशीचा कळप आला."

"अय्या! आणि मग?" स्नेहलतेचे डोळे वाटीएवढे झाले.

"मग काय? घंटा वाजवली तरी म्हशी ऐकेनात. तेव्हां मी कन्फ्यूज झालों. म्हटलें, इथें डेंजर आहे. डेंजर असला म्हणजे झाडावर चढायचें ही माझी फार जुनी संवय आहे. आई मारायला लागली म्हणजे—"

"मग झाडावर चढलांत तुम्ही?" सासूला संभाषणांतदेखील प्रवेश करायला न देणारी ती आधुनिक तरुणी म्हणाली.

"हो ना! मी ताबडतोब झाडावर चढायला धावलों. पण त्या भानगडींत सायकलवरून उतरायचें राहून गेलें." बंडू सरळपणें म्हणाला.

"अय्या! म्हणजे सायकलसकट झाडावर चढत होतां तुम्ही?" आणि स्नेहलता गडबडां लोळून हसूं लागली.

त्यानंतर स्नेहलतेला सायकलवर बसायला शिकण्याची जरुरी भासली नाहीं. कारण कुमुदच्या गोष्टीहून किती तरी खुमासदार हकीकत सांगण्याची संधि आतां तिला मिळाली होती.

★★★

# बंडूचें संभाषणचातुर्य ५

"ऐकलं का? चहा झालाय्." स्वयंपाकघर निनादलें.

"हां." बाहेरच्या खोलीत वर्तमानपत्र फडफडलें.

मग दोन मिनिटें स्वयंपाकघरांत स्फोटक आणि बाहेरच्या खोलींत गाफील स्तब्धता.

"'हां' काय डोंबलं तुमचं? चहा प्यायला घरांत नाहीं का यायचं?" स्वयंपाकघरांतून मशीनगनची एक फैर झडली.

"घरांतलं डोंबलं संपलंय् म्हणतेस? बरं बरं! ऑफिसांत जातांना सांगेन वाण्याला!" बाहेरून बावळटपणें विमानविरोधी तोफ डागली गेली.

"आत्तां काय म्हणायचं यांना!" उपहासगर्भ उद्गारचिन्हांच्या हँड-ग्रेनेड्स् बाहेरच्या खोलीच्या दिशेनें भिरकावल्या गेल्या.

"'त्ताक्काय्?' त्ताक्काय नाहीं मिळत वाण्याकडे. डोंबलं मिळेल." विमानविरोधी तोफेची दिशा बदलली.

दाण्दाण् पाय वाजवीत स्वयंपाकघरांतला रणगाडा बाहेरच्या खोलींत आला. वर्तमानपत्राखालून बाहेर पडून टी-पॉयवर विसावलेल्या दोन तंगड्या जमिनीवर आदळल्या गेल्या.

"माय गॉड! विनू मानकडनें अगदीं कमाल करून टाकली! तरी मी काल मन्याला म्हणत होतों..." पाय पुन्हा टी-पॉय शोधूं लागले, घरांतल्या रणगाड्यावर विसावले. स्वतःच्या सोईकरितां ह्या टी-पॉयला जवळ ओढूं लागले.

"पण हे बाकीचे यूसलेस लोक गेले कशाला तिकडे? भोपळेच काढायचे होते तर आमच्या ऑफिसच्या टीमनें काढले असते. फास्ट बोलिंगला घाबरतात लेकाचे! लगोऱ्या खेळा म्हणावं!" हिंदी क्रिकेट टीम आपल्याच पैशानं इंग्लंडला गेली आहे अशा थाटांत बाहेरची खोली बडबडत होती. आणि मग—

"ओय् ओय्! ऑं ऑ—हू हु हू ऽऽऽ चिमटा कशाला काढलास मला?"

"कान फुटले म्हणून."

"सांगितलं ना तुला कीं ऑफिसांत जातांना जिन्नाकडून वाण-सामान पाठवीन म्हणून!" तोंडानून आवेशानें बाहेर पडलेले शब्द तंगड्यांत तंगड्या अडकून पडले. त्यामुळें वक्तृत्व कुंठित झालें. शिगें उभारून धावणाऱ्या म्हशीला आपल्या डोक्यावरचीं शिगे कोणी तरी काढून नेली आहेत असें आढळून यावें तसें झालें.

"'जिन्नाकडून वाण-सामान' म्हणजे 'डोंबलं'च आणणार होतां ना?" स्वयंपाकघरांतल्या माणसानें वेडावलें.

वर्तमानपत्र फडफडलें, टी-पॉय कोलमडला, इलेक्ट्रिकच्या दिव्यानें एक झोका खाल्ला. तोंड नुसतेंच हललें आणि मग तटबंदींतला कमकुवत भाग सांपडला. बंडूनें गडगडाट केला, "आणि चहा कुठं आहे? व्हॉट अबाउट टी? चहा नाहीं झाला अजून? सकाळीं आठ वाजले तरी चहा नाहीं म्हणजे आहे काय? ग्रॉस इनेफशन्सी! इन्कॉम्पेटन्स! अशा गुणानीं स्वराज्य कसलं टिकविणार तुम्ही? चहा पाहिजे ताबडतोब. इमिजिएटली! अर्जंटली! जस्ट नौ!"

"किंचाळतां कशाला? चहा तयार आहे." स्वयंपाकघरांतलं माणूस गांगरून गेलें होतें.

"मग? तयार आहे तर सांगायला काय झालं? इतर इतकी वायफळ बड-बड करतेस, आणि चहा झाल्याचं नाहीं सांगतां येत? चहा कशाला करायचा असतो? प्यायला कीं झाकून ठेवायला?"

स्वयंपाकघरांतल्या माणसानें झडप घालून बाहेरच्या खोलींतल्या गृहस्थाचा कान पकडला आणि त्याला आंत नेऊन बसवलें.

"घ्या आतां चहा. कपभर पुरे कीं पातेलंच ठेवूं पुढ्यांत!"

बंडूनें कप बशींतून काढला आणि पुन्हा बशींत ठेवला. कपाचा कान पकडला आणि मग गळा धरला. आणि मग अपराधी मुद्रेनें म्हणाला, "जरा पेपर आणूं बाहेरून? आत्तां आणतो."

"नाहीं." स्वयंपाकघरांतल्या माणसानें पळणाऱ्या बंडूचा लेंगा पकडण्याचा प्रयत्न केला आणि त्या भानगडींत तें बोचक्यासारखें जमिनीवर पडलें.

"बरं, नाही—नाहीं." बंडू पेपर घेऊन आंत येत म्हणाला. पेपर उघडला गेला आणि चहाचा कप त्याच्याआड अदृश्य झाला.

"माय गॉड! सोनें ऐशीं रुपये तोळा?...पंडित नेहरूंनीं पार्शी बाईचा गळा दाबून खून? ऑ? हा हा! 'पं. नेहरू' निराळ्या कॉलमात आहेत."

इकडे स्नेहलतेचे डोळे अश्रूंनीं चिंब झाले होते. एक थेंब नाकाच्या शेंड्यावरून लोंबत होता. दुसरा ओठाच्या कोपऱ्यातून तोंडात प्रवेश करूं पहात होता. हुंदक्यांनीं खांदे हलत होते. नाकपुड्या फुरफुरत होत्या.

आपण हुंदके ऐकत आहोत असा बंडूला भास झाला. "ऑं? कोण रडतंय् ग? शेजारच्या माणसाची बायको का? बायकोला फार निग्लेक्ट करतो बुवा तो! तुला नाहीं वाटत?...'मिठाईतून विष चारलं...पित्तपापडा तेल...स्त्रीला वश करणारा ताईत!—"

मग एकदम डोक्यात शंकेचें उद्गारचिन्ह. भुंवयांचा कंस. चेहऱ्याचें प्रश्नचिन्ह.

"तूं? तूं रडतेस? काय झालं ग? बोट भाजलं वाटतं?"

स्वयंपाकघरांतल्या माणसानें मान उजवीकडून डावीकडे वळवली.

"ऑ?"

डावीकडची मान पुन्हा उजवीकडे गेली.

"रडायला काय झालं?"

हुंदका.

"काय झालं बुवा?" चहाच्या कपांत ते मौल्यवान् अश्रू पडूं नयेत म्हणून बंडूनें तो बाजूला केला.

डबल हुंदका.

"माझं चुकलं का कांहीं ?"

गद्‌गदून हुंदका.

"असं काय करतेस ?"

हुंदक्याची एक सर. अश्रूंचा पूर.

खांद्यावर प्रेमळ हात.

झुरळाला झिडकारावें तशी त्या हातावर एक थप्पड.

"पण बोलल्याशिवाय समजणार कसं बुवा आम्हांला ?" चिडका आवाज.

हातांनीं तोंड झाकून ओक्साबोक्शीला सुरुवात. झटक्यानें घरात निघून जाणें.

तंगड्या पसरून आणि दोन्ही हात पाठीमागे टेकून बाहेरच्या खोलींतला मनुष्य अजागळपणें बसला. शून्य दृष्टीनें खुंटीवर लोंबणाऱ्या शर्टकडे पाहूं लागला. आपण फार दुःखी आहोत आणि आपल्यावर फार अन्याय झाला आहे, असा स्वतःचा समज करून घेऊं लागला.

"आय ॲम फेडप् !" असें करवादून ओरडला. चेहरा रडवा करून हुंदका देण्याचा प्रयत्न झाला. पण परमेश्वरानें पुरुष–जातीला अश्रूंचा पुरवठा जवळजवळ केलेलाच नाहीं ह्या गोष्टीचा खेदकारक प्रत्यय आला. आणि दुःखी मनःस्थितीशीं पूर्णपणें विसंगत अशी, समोरचा चहा पिण्याची इच्छा झाली.

स्वयंपाकघराकडे चोरटा दृष्टिक्षेप टाकून चहाचा कप उचलला गेला. एक गरम स्वादिष्ट घुटका.

मग चहा पिण्याच्या अनिष्ट परिणामांची बेचव जाणीव झाली. हा घुटका हृदयहीनतेचा ठसा आपल्यावर कायमचा वठविणार ह्याची भयप्रद खात्री पटली. सुखी संसारांतल्या पुढील अनेक वर्षांतील भांडणात हा चहाचा घुटका आपल्याला कसे चटके देईल ह्याचें भीषण चित्र नजरेसमोर उभे राहिलें. मागें एकदां सात्त्विक संतापानें उभयतांनीं उपोषण केलें असतां आपण खाल्लेला लाडू अजून आपल्याला कसा पचलेला नाहीं त्याची आठवण झाली.

पण गरम चहाचा मोह सोडवेना. नेमकीं चहाच्या वेळेलाच भांडणें करण्यांत काय कुटिल चतुराई असते या बाबतींत डोक्यांत लख्ख प्रकाश पडला. मग एक धूर्त विचार सुचला. चहाचे घुटके घेऊन बंडू ओरडला, "हड्डुत् ! काय बुवा

मांजर तरी ! सरळ चहा पिऊन टाकतंय. हॅट् ! चले जाव !"

चहाचे घुटके घेतल्याचें ऐकूं जाण्याइतके स्वयंपाकघरांतल्या माणसाचे कान तीक्ष्ण आहेत हें त्या बापड्याला माहीत नव्हतें. मांजरानें पलीकडच्या छपरावर उडी घेतली कीं काय तें स्नेहलतेनें खिडकींतून निरखून पाहिल्याचेंहि त्याला समजलें नाहीं.

त्यानंतर विनू मानकडच्या पानभर पसरलेल्या कर्तबगारींत बंड्ू मश्गुल झाला. शाळेच्या ज्यूनिअर टीममध्यें तो बारावा गडी होता आणि ऑफिसच्या टीमचा 'गुगली बोलर' होता हें तो विसरूं शकत नव्हता. चेंडू फेकतांना तो चेहऱ्यावर जो चाणाक्ष भाव आणीत असे त्यामुळेंच तो 'गुगली बोलर' समजला गेला होता; आणि म्हणून तो विनू मानकडशीं स्वतःचें फार जवळचें नातें जोडीत असे.

पेपर वाचून झाल्यावर बंडूला आपल्या अपराधाची जाणीव झाली. समजूत घालण्याचें आपलें कर्तव्य आपण इतका वेळ कसें विसरलों, ह्याचें त्याला आश्चर्य वाटलें. वाचून झालेला पेपर आता मुळींच वाचायचा नाहीं अशा कठोर निश्चयानें त्यानें बंद केला.

स्नेहलतेचा चहाचा कप घेऊन बंडू अपराधी मुद्रेनें घरांत गेला. डोकें डाव्या बाजूला कलतें केलें आणि खालचा ओठ पुढें काढला कीं चेहरा अपराधी होतो अशी त्याची कल्पना होती.

"चहा घे ना."

"दाढीला पाणी काढून ठेवलं आहे. दाढी करा. नाहीं तर ऑफिसांत जायला उशीर होईल." कर्तव्यतत्पर गृहिणी मोजके शब्द बोलली.

"पण चहा घे ना तूं. नाहीं तर मला फार वाईट वाटेल." आपले गाल फुगीर असल्यामुळें आपल्याला चेहरा पाडतां येत नाहीं हें बंडूला जाणवलें.

"दाढी–अंघोळ लवकर उरका. आत्तां गडी येईल."

"असं काय बरं !—" बंडू तिचे दंड पकडायचा प्रयत्न करीत म्हणाला.

"विळीवर पाय पडेल."

"पडूं दे." आतां खरोखरच पडलेल्या आपल्या चेहऱ्यावर उसनें अवसान आणीत बंडू म्हणाला.

विळी पटकन् बंद करून बाजूला ठेवण्यांत आली.

कट्टयावरच्या पाट्यावर कर्तव्यदक्ष गृहिणी वाटण करूं लागली. बंडू प्रेमानें तिला मागून कवटाळूं लागला. पण तेवढ्यांत एक कोपर त्याच्या पोटांत खुपसलें गेलें. आणि त्यामुळें प्रियतमेऐवजीं स्वतःचें पोटच कवटाळून धरणें त्याला थोडा वेळ तरी अवश्य वाटलें.

जिभेवर आलेले अधिक्षेपाचे शब्द परतवून त्यानें प्रेमळपणानें वागण्याचा अखेरचा निकराचा प्रयत्न केला. तिच्या हातातला वरवंटा काढून घेऊन त्यानें बाजूला ठेवला आणि तिचें तोंड आपल्याकडे फिरवलें.

वाटणानें जिचे हात भरले आहेत अशा प्रियेला आलिंगन कसें द्यावें हा बिकट प्रश्न त्याच्यापुढें पडला. पण क्षणभरच. पुढच्याच क्षणीं वरवंटा कट्टयावरून घरंगळून खालीं पडला.

आणि एक तंगडी हातांत पकडून बंडू स्वयंपाकघरभर 'लंगडी' घालूं लागला. दरवाज्यावर त्याचें डोकें आपटलें तेव्हांच तो थांबला आणि सणकणारें डोकें व चेचलेला पाय एकाच वेळीं दोन्ही हातांनीं पकडण्याचा प्रयत्न करूं लागला.

स्नेहलता धावत पुढें आली. बंडूला बिछान्यावर पाडण्यांत आलें. वीज-कपातीच्या काळांतदेखील त्याच्याकरितां पंखा सुरू करण्यांत आला. मऊ हातांनीं त्याचें डोकें घट्ट दाबून धरलें गेलें; त्याच्या पायाची सुखकारक तपासणी झाली. अलम् जगांतल्या नवऱ्यांचें सुखस्वप्न बंडू चार क्षण प्रत्यक्ष जगला!

पण हाय! तेवढयांत दार वाजलें आणि त्याच्यांतून फारच अधिक महत्त्वाचा मनुष्य—धुणीं-भाड्यांचा गडी—घरांत आला. बंडूचें डोकें चेपणारे मऊ हात गड्याला धुणीं देऊं लागले. अंगांतले कपडे काढून गड्याला देण्याचा हुकूम सुटला.

लंगडणाऱ्या बंडूकडे पाहून गड्यानें स्नेहलतेला विचारलें, "काय झालं?"

गड्याला बंडूशीं बोलणें कमीपणाचें वाटत असे. आणि त्यानें सांगितलेलें काम तो कधींच करीत नसे.

स्नेहलता म्हणाली, "होणार काय? वरवंटा घेतला पाडून पायावर."

राणीच्या बागेंतल्या करकोच्याकडे पहावें तशा दृष्टीनें गड्यानें बंडूकडे पाहिलें.

बंडूनें सूडबुद्धीनें म्हटलें, "माझे शर्ट काय रे फाडतोस हल्लीं?"

गड्यानें तुच्छतेनें बंडूकडे पाहिले आणि मग धुण्याची बादली उचलून खेकसल्यासारखे तो म्हणाला, "दूर व्हा."

गडी गेल्यावर बंडू दबलेल्या आवाजांत म्हणाला, "हा गडी फार उर्मट झाला आहे."

"उर्मट कसचा आलाय? कामाला चांगला आहे. तुम्ही मात्र उगीच त्याला बोलूं नका हं. गडी गेला तर काम करून माझं कंबरडं मोडेल."

"मी करीन काम. त्यांत काय आहे मोठंसं!" बंडू वीरश्रीनें म्हणाला.

बंडूच्या ह्या उद्गारांना प्रत्युत्तर मिळालें नाहीं. पण स्वयंपाकघरांतल्या माणसानें मान उडवली असावी अशी दुःखद शंका त्याला आल्यावांचून राहिली नाहीं.

अखेर आमटी वाढतांना स्नेहलतेच्या हृदयातील व्यथा बंडूच्या कानांवर पडली. तिची तक्रार अशी होती :

बंडू अलीकडे तिच्याकडे अजिबात लक्ष देत नव्हता. घरकामांत तो मदत करील ही आशा तिनें सोडलेली होती. ती आजारी पडली तर घोटभर पाणी देखील तिला कोणीं द्यायचें नाहीं ह्याची तिला खात्री होती. आणि म्हणूनच निरनिराळ्या नातेवाईक बायांना महिना दोन महिने घरीं रहायला बोलावून ती माणसें जोडीत होती.

"माणसें जोडण्यावर जेवढा पैसा खर्च होतोय् तेवढ्यांत तुझ्या आजारीपणांत तुला हॉस्पिटलमध्यें मी नक्की ठेवूं शकेन." बंडूला बोलल्यावांचून राहवलें नाहीं.

"म्हणजे? मीं आजारी पडावं आणि एकदांची ब्याद घरांतून हॉस्पिटल-मध्यें जावी अशीच ना तुमची इच्छा?"—डोळे वटारले गेले. आवाज कापरा झाला.

बंडू शक्य तितक्या मेंगळटपणें लोंबत्या शर्टाकडे पाहूं लागला. थबकलेलें वाढणें आणि बोलणें पुढें सुरू झालें :

तिच्या मामेभावासारखा तो ( म्हणजे बंडू ) इंग्लंडला जाईल अशीहि तिची उच्च कल्पना नव्हती. अगर तिच्या मामाप्रमाणें त्यानें मोटार ठेवावी असाहि तिचा वेडा आग्रह नव्हता. पण नुसते चार गोड शब्द बोलायला काय जातें

माणसाचें! सकाळीं पेपरांत डोकें खुपसून बसायचें (आणि तरीहि कुठच्या थिएटरांत कुठचा सिनेमा आहे तें माहीत नसायचें!) मग दाढी-अंघोळींची धांदल. एका पायांत बूट चढवीतच जेवायला बसायचें. संध्याकाळीं ऑफिस सुटल्यावर मित्रांबरोबर हुंदडायचें आणि रात्रीं कांहीं बोलायला बघावें तर ह्यांना झोपा येतात! लग्नाच्या आधीं तासन्तास बडबडत असायचे. घरीं म्हणून जाऊंच द्यायचे नाहींत. अजूनसुद्धां मित्राशीं ह्याःह्याः करतां येतें, मग बायकोशीं बोलायचें म्हटलें म्हणजे कां दांतखीळ बसते? का बायको डसते, का चावते, का मारते?...

भांड्यांच्या अनुरूप आवाजाच्या पार्श्वभूमीवर चाललेलें हें भाषण भाताच्या भांड्यांत नाट्यपूर्णपणें कालथा टाकीत असतांना संपलें.

आपल्या बायकोचे सगळे नातेवाईक आपल्याहून श्रेष्ठ आहेत हें बंडूला पटलें. आपली बायको औदार्याची आणि सहनशीलतेची पुतळी आहे हें त्याला कबूल करावें लागलें. आणि आपण अत्यंत दुष्ट व उलट्या काळजाचे आहोंत अशी तर त्याची खात्रीच झाली. ह्यापुढें चांगलें वागायचा त्यानें निश्चय केला. नम्रपणानें आणि चांगुलपणानें त्यानें बूट पायांत घातले; कोट अंगांत चढवला. आणि स्नेहलतेचें त्यानें चुंबन घेतलें तें देखील नम्रपणानें.

बसच्या क्यूमध्येंदेखील तो नम्रपणानेंच उभा राहिला. नेहमीं दहा-पंधरा मिनिटें टिकणारा बंडूचा चांगुलपणा त्या दिवशीं संध्याकाळपर्यंत टिकून राहिला. ऑफिस सुटल्यावर मित्रांनीं चहा देऊं केला, तेव्हां त्यानें सस्मित नको म्हटलें. सिनेमाला यायचें आमंत्रण नाजुकपणें पंजा हलवून नाकारलें. रमतगमत जाणाऱ्या ऑफिसांतल्या मुलींच्या घोळक्यात अडकण्याचें निर्धारानें टाळलें. वाटेनें तो घरीं गेल्यावर कसें वागायचें याची उजळणी करीत होता. मध्येंच त्यानें छत्रीचें चुंबन घेतलें आणि तिच्या दांडीला नाजुकपणें चापटी मारली, दिव्याच्या खांबाजवळ उभा राहून तो सस्मित म्हणाला, 'बरं का, आज ऑफिसात काय गंमत झाली...' आणि तो स्वतःच मोठ्यानें हसला.

तें पाहून समोरच्या फूटपाथवरून एक अडाणी मनुष्य लगबगीनें त्याच्याकडे आला आणि म्हणाला, "काय भय्यासाहेब, इंदूरहून केव्हां आलां इकडे? अक्का बऱ्या आहेत ना?"

बंडूनें कापलेल्या कलिंगडासारखा चेहरा केला आणि त्याच्याकडे नीट निरखून पाहिल्यावर वरमलेल्या चेहऱ्यानें तो इंदूरचा असामी गडबडीनें गर्दीत अदृश्य झाला.

त्यानंतर रस्त्यांतील कुठल्याहि दिव्याशीं संभाषण न करतां बंडू घरीं पोंचला. नेहमींप्रमाणें त्यानें दणकन् कडी वाजवली नाहीं. कमरेंत वाकून त्यानें दारावर टकटक केलें. टकटक करून दहाहि बोटाचे सांधे दुखूं लागल्यावर घरांत कांहीं तरी हालचाल झाली आणि दाराची कडी निघाली.

बंडू दोन्ही हात पसरून आंत प्रवेश करीत म्हणाला, "हलो डार्लिंग !"

दार उघडायला आलेली वयस्क स्त्री चटका बसल्यासारखी मागे सरली आणि मग 'हा मेल्यांनो' असें पुटपुटत तुरुतुरु चालत घरांत गेली.

कांहीं वेळ बंडूचे हात तसेच पसरलेले राहिले. त्याच्या चांगुलपणाचा पारा एकदम खालीं घसरला. नेहमींप्रमाणें छत्री कोपऱ्यांत आदळावी आणि 'भूक भूक' असें ओरडून सारें घर डोक्यावर घ्यावें असें त्याला वाटूं लागलें. स्नेह-लतेच्या माणसें जोडण्याच्या सवयीवर एक लांबलचक व्याख्यान त्याच्या मनांत रचलें जाऊं लागलें. दुष्टपणें बोलण्याकरितां त्यानें डोळे आकुंचित केले आणि ओठांचा एक कोपरा कानाला भिडवला.

पण चांगुलपणानें अखेर विजय मिळविला. सात्त्विकतेच्या सोनेरी कागदांत चेहरा गुंडाळीत तो खद्खदून हसून म्हणाला, "ह्यः ह्यः ! मावशी आल्या आहेत वाटतं ? गुड ! व्हेरी गुड !"

पण त्यामुळें मावशींच्या चेहऱ्यावरचा संशयी भाव मुळींच पालटला नाहीं. तेव्हां समझौत्याचा आणखी एक प्रयत्न करीत बंडू स्नेहलतेला म्हणाला, "कसा काय आहे मावशींचा मुलगा ? काय करतो आतां ?"

पण अपेक्षेप्रमाणें ह्या प्रश्नानें वातावरण खेळीमेळीचें न होतां गंभीर झालें. स्नेहलता बंडूच्या दंडाला चिमटा काढीत कुजबुजली, "असं काय करता ? गेल्या महिन्यातच मावशींचा मुलगा गेला नाहीं का ?"

मावशींनीं डोळ्यांना पदर लावला.

झालेली चूक सावरून घेण्याचा चाणाक्ष प्रयत्न करीत बंडू म्हणाला, "म्हणजे, मुलगी गेली ना त्यांची ! तूंच नाहीं का सांगितलंस ?"

स्नेहलता दरडावणीच्या स्वरांत म्हणाली, "त्यांच्या मुलीची तब्येत चांगली आहे. तिला काहींहि झालेलं नाहीं."

"वाः! तिला टी. बी. झालाय असं तूंच नव्हतीस का सांगत?"

इथें मावशींना गद्‍गदून हुंदका आला आणि स्नेहलता त्यांची समजूत काढायला धावली.

बंडू हतबुद्धपणें बाहेरच्या खोलीत परतला, आणि घरांत उच्चारले जाणारे काही कडक शब्द न ऐकण्याचा पद्धतशीर प्रयत्न करूं लागला.

थोड्या वेळानें मावशी निघून गेल्या. आणि स्नेहलतेनें बंडूसमोर उभे राहून हात ओवाळले.

खरें म्हटलें म्हणजे ह्यानंतर कुठल्याहि पुरुषाला सामोपचारानें वागणें अशक्य व्हावें. पण बंडूला चागुलपणानें इतके झपाटलें होतें कीं, तो फक्त मंदपणें हसला आणि दोन्ही हात पसरून म्हणाला, "लाडके!"

"अहाहा!"

"तूं मला फार फार आवडतेस! तूं फार चागली आहेस! छान आहेस!"

"बाता मारूं नका! तुम्हाला असं वाटत असतं तर माझ्याशीं बोलावंसं तुम्हांला वाटलं असतं. काल सबंध दिवसात तुम्हीं मला फक्त 'शूत्' केलंत आणि वाटी आपटून आमटी मागितलीत."

"म्हणूनच म्हणतों कीं आता खूप खूप बोलूं या आपण."

"आपण नाहीं. तुम्ही बोललं पाहिजे. नाहीं तर मीं बोलत रहातें आणि तुम्हीं तोंड उघडं टाकून झोंपतां."

"खरंच, मी स्वार्थी आहें."

"इश्श! तसं नाहीं मला म्हणायचं. पण तुम्हांला माझी मुळींच पर्वा वाटत नाहीं."

"मी तुझ्याकरितां कांहींहि करीत नाहीं."

"तसं नाहीं कांहीं. पण—निदान सकाळीं तुम्हीं एकट्यानें चहा प्यायला नको होता."

पाठींत सोटा बसलेल्या बोक्यासारखा बंडूचा चेहरा झाला. स्वतःवर करायला

आणखी आरोप शिल्लक नाहींत असें त्याच्या ध्यानांत आलें आणि ह्या पतिव्रतेचा पति होण्याचा आपल्याला काय अधिकार आहे असा त्याला प्रश्न पडला. 'न्यू थिएटर्स'च्या चित्रपटांतल्या नायकाप्रमाणें पाठीवर बोचकें घेऊन आपण दूर निघून जावें असें त्याला वाटूं लागलें, आणि त्या वेळीं एका भिकाऱ्यानें म्हटलेलें एक गाणें तो अभावितपणें गुणगुणूं लागला.

"काय म्हणालांत?"

"काहीं नाहीं." बंडूनें चपापून जीभ चावली.

"इश्श! मग बोला ना."

बंडू एकदम ताठ बसला. आणि मघांशीं दिव्याच्या खांबाला सांगितलेली गोष्ट स्नेहलतेला सांगण्याकरिता त्यानें घसा खांकरला. चेहरा सस्मित करून तो म्हणाला, "बरं का, आमच्या ऑफिसांतले ते हेगडे हेडक्लार्क आहेत ना?"

"हेगडे म्हणजे मराठा ना हो?"

"हो. मराठींत बोलतात ते."

"कर्म तुमचं! अहो, मराठा म्हणजे ते मराठे आहेत का, असं विचारलं मीं!"

"नाहीं नाहीं. मराठे नाहींत ते. त्याचं नांव हेगडे!"

"कम्माल झाली बाई तुमची! अहो, हेगडे म्हणजे ते उंच आणि काटकोळे आहेत, तेच ना?"

"नाहीं. ते ठेंगू आणि लठ्ठ आहेत."

"म्हणजे ते चष्मा लावतात ते ना?"

"हो."

"मग ते उंच आणि काटकोळेच आहेत."

"अग पण—"

"चांगले तुमच्याइतके उंच नाहींत का ते?"

"हो, पण—"

"आणि तुमच्याहून बारीक नाहींत का?"

"नाहीं."

"नाहीं कसं? हो, तुम्ही चांगले लठ्ठोबा झालां आहांत अलीकडे! पण तुम्हांला आपलं वाटतं, आपण बारीकच!"

येथें बंडूभोवतीं विळखा घालून त्याच्या लठ्ठपणाचें मोजमाप करण्यांत आलें. आणि दोघांच्याहि तोंडांना बोलायला फुरसत राहिली नाहीं. मग दोन चुंबनांच्या मध्यन्तरांत स्नेहलता म्हणाली, "मग त्या हेगड्यांचं पुढं काय झालं?"

बंडू शून्य दृष्टीनें म्हणाला, "हेगडे? त्याचं कुठं काय झाल? लठ्ठ आणि बुटक्या मराठ्यांविषयीं तूंच कांही तरी सांगत होतीस ना?"

"अस्सं तुम्ही करतां नेहमीं! माझ्याशीं बोलण्यांत 'इंटरेस्ट'च नाहीं तुम्हांला." फणकाऱ्यासरशीं बंडू दूर ढकलला गेला.

बंडूची मुद्रा बराच वेळ विचारमग्न राहिली आणि मग एकदम सावरून बसत तो सस्मित मुद्रेनें म्हणाला, "बरं का, आमच्या ऑफिसांत ते हेगडे आहेत ना! त्यांची काय गंमत झाली परवां—"

"गेल्या वर्षींच त्यांची बायको वारली ना हो?"

"बायको नाहीं ग, कुटुंब वारलं त्यांचं."

"सगळं कुटुंब कसं मरेल हो?"

"कां मरणार नाहीं? मी म्हणतों, कां मरणार नाहीं? कधीं कधीं गंगेत होडी उलटून एकदम दोन-चार कुटुंबंदेखील मरतात. 'टाइम्स'मध्यें चक्क छापून येतं ना!" बंडू आवेशानें म्हणाला. विचारांतले तार्किक घोटाळे त्याला मुळींच आवडत नसत.

"बावळट आहांत तुम्ही! तुम्हांला कांहीं माहीत नाहीं. त्यांची बायकोच वारली. क्षय झाला बिचारीला. चार लहानलहान मुलं आहेत तिचीं. माझ्या चुलत बहिणीचंहि अस्संच झालं. काय झालं..."

ह्यानंतर त्या खोलींत निरनिराळ्या रोगांनीं इतके करुण मृत्यू झाले कीं, आपण कुठचाहि रोग होऊन अजून मेलों नाहीं हा आपण मोठाच अपराध केला आहे असें बंडूला वाटूं लागलें. तो अगदीं शरमिंधा झाला.

शेवटीं बंडू दुःखानें झोपीं जाणार होता. इतक्यांत त्याच्या कुशींत बोट खुपसलें गेलें. "बघा! मीच आपली पुन्हा बोलतें आहें. आणि तुम्ही आपले गप्पच. तें कांहीं नाहीं, तुम्हीं बोललंच पाहिजे आतां."

"अं–आं? यस्–यस्! हां हां." मग बंडूनें पुन्हा सस्मित मुद्रा केली आणि तो म्हणाला, "बरं का, आमच्या ऑफिसांतले हेडक्लार्क हेगडे आहेत ना—"

"एक, दोन, तीन, चार, पांच सहा..."

"ऑ? हें काय?"

"तुमचं चालूं द्या. मी विणकामांतले टाके मोजतें आहें माझ्या. पण माझं चांगलं लक्ष आहे. काय झालं त्या हेगडे हेडक्लार्कचं?" एकाग्रतेनें सुया हलवीत स्नेहलता म्हणाली.

त्यानतर बंडूची मनोमन खात्री पटली कीं, हेगडे हेडक्लार्कच्या आयुष्यांत— नव्हे, त्याच्या ऑफिसांतल्या सगळ्या माणसाच्या आयुष्यांत—सस्मित सांगण्यासारखी एकहि गोष्ट झालेली नाहीं. नव्हे, हेगडे हेडक्लार्कविषयीं बोलतांना स्मित करणें हा मोठा गुन्हा आहे अशी त्याची पूर्ण खात्री पटली.

"मग काय झालं हेगडे हेडक्लार्कचं?"

बंडूनें जीव मुटींत धरला. आणि एक–एक अक्षर उच्चारण्यांत आपण फार मोठा गुन्हा करीत आहोत ह्या जाणीवेनें तो म्हणाला, "तर काय झालं, आमचे हेगडे हेडक्लार्क जिन्यावरून असे दाणकन् पडले आहेत म्हणतेस. माय गॉड!" आणि बंडूनें हास्याचा फार मोठा स्फोट केला.

बंडूच्या सगळ्या विनोदी गोष्टींत माणसें पडत असत. आणि त्या पडण्याच्या नुसत्या आठवणीनें हसूनहसून बंडू लोळण घेत असे.

"सतरा, अठरा, एकोणीस...अय्या! एक टाका जास्त पडला!"

बंडू दचकून अपराधी मुद्रेनें म्हणाला, "ऑ? काय म्हणालीस?"

"ते बिचारे पडले. आणि तुम्हांला खो खो करून हसायला काय झालं? तुम्ही पडलां असतां म्हणजे? पडून माणसांचीं हाडंदिखील मोडतात हो. माझा मावसभाऊ कीं नाहीं—ही सुई धरा जरा, नीट धरा, अशी बावळटासारखी नको,—असाच जिन्यांतून पडला..."

ह्यानंतर जगांतलीं असंख्य माणसें जिन्यांतून, आगगाडींतून, फूटपाथवरून, मोरींत, पडत होतीं.

आणि बंडू मागें मान टेकून व तोंड उघडें टाकून गाफीलपणें झोपला होता!

★ ★ ★

# बंडूची आइसबॅग ६

"काय बंडोपंऽऽत!" अशी मोकळ्या आवाजांत हाक मारून राजानें दिल-खुलास हसत घरांत प्रवेश केला.

ती हाक ऐकून बंडू दचकला आणि मग त्यानें भेदरट हास्य केलें. कारण राजाच्या दिलखुलास वृत्तीचा बंडूला लहानपणापासून अनुभव होता. रोज राजा शाळेंत पेन्सिल न्यायला विसरत असे आणि मास्तरांनीं "वह्या उघडा, पेन्सिली काढा" असें म्हटल्यावर, तो इतक्या लाघवीपणामुळें बंडूजवळ पेन्सिल मागत असे, कीं बंडू मुकाट्यानें आपली पेन्सिल त्याला द्यायचा आणि मग पेन्सिल न आणल्याबद्दल मास्तरांचा मार खायचा; इतकेंच नव्हे तर तो मार खात असतां राजा 'खी–खी' करून हसायचा.

"ऑं ? अगदीं बेफिकीरपणें ताणून दिली आहेस कीं रे! नो वरी ! ऑं! चंगळ आहे बेट्या तुझी. ऑफिसात फारसं काम नाहीं आणि घरांतलं सगळं वहिनी पाहतात. इतकं भाग्य नसतं बेट्या सगळ्यांचं!" राजा बंडूकडे पहात स्वयंपाकघरांत शरसंधान करीत होता.

बंडू बावळटपणें हसला. आपल्या कॉलरच्या आंत कोणी बर्फाचा खडा टाकला आहे, असें त्याला वाटत होतें.

मग राजा स्वयंपाकघराकडे वळला. दारांत उभा राहात तो म्हणाला, 'काय वहिनी ! काय म्हणते आहे तब्येत ? अं हं ! बरी दिसत नाहीं. माहेरून आलांत तेव्हां होती ती तुकतुकी आतां चेहऱ्यावर दिसत नाहीं ! काम फार पडतं कीं काय ?"

"काम कसलं आलंय्? पण सकाळीं कीं नाहीं अगदीं उठवत नाहीं! एकदां उठलें म्हणजे कांहीं नाहीं. पण..."

"कांहीं नाहीं कसलं? तुम्ही आपल्या उठतां झाल. काय रे बंडू? वहिनींच्या तब्येतीची जरा काळजी घेत जा. डॉक्टरना दाखव. टॉनिकबिनिक आण. अगदींच घरांत लक्ष घालायचं नाहीं म्हणजे काय! ऑ!" एव्हांना आपण लंगड्या कुत्र्याची जमिनीवर फटफटणारी तंगडी आहोंत, असें बंडूला वाटूं लागलें होते.

"आतां तुम्हीच असं म्हणताय् म्हणून बरं. मी बोललें असतें म्हणजे वाटलं असतं बायको कांगावा करते आहे!" स्नेहलता एव्हांना सद्गदित झाली होती. आपल्या प्रकृतीचा विषय निघाल्यावर कुठली बाई तशी होत नाहीं बरें!

"तें कांहीं नाहीं, वहिनी तुम्ही जितकं जास्त सहन कराल तितका हा शेफारेल! तुम्ही ह्याला नीट वठणीवर आणा."

"असं बोलूं नये, भावजी. पण आपण किती केलं तरी त्याची किंमत होत नाहीं या घरात." स्नेहलता मखमली स्वरांत म्हणाली.

आपल्या शेपटीला कोणी लांब इलेक्ट्रिक फटाक्यांची माळ बांधून ती पेटवली आहे अशी दाहक जाणीव आतां बंडूला होत होती.

"तें कांहीं नाहीं, वहिनी, हा आमचा बंडू आहे जरा वांडच. अजून ह्याला तितकीशी समज आलेली नाहीं––"

"आपल्या कामापुरती भरपूर समज आली आहे त्यांना! बायकोनं कांहीं सांगितलं म्हणजे मात्र—" स्नेहलता हें आपल्याशींच पुटपुटली होती; पण बंडू व राजा ह्या दोघांनाहि तें चुकून ऐकायला गेलें!

"हा! हा! हा! वहिनी बाकी फारशा बोलत नाहींत; पण बोलल्या म्हणजे अगदीं मर्मावर बोट ठेवतात!" राजाला इतकें हसूं आलें, कीं त्याचा तोल गेला.

एव्हांना बंडू दाराच्या फटींत लपून राहणाऱ्या झुरळांच्या गर्दींत सामील होऊं पाहात होता; पण तीं त्याला तुच्छतेनें झिडकारत होतीं.

स्नेहलतेनें विनयानें मान खालीं घातली होती.

"बाकी काय तुमचं असेल तें तुम्ही पाहा. नवरा-बायकोंच्या भानगडींत आम्हीं कशाला बाबा पडायचं? पण वहिनी, तुम्ही तब्येतीला मात्र जपा. हें

पहा बंडू...पण नको, मीच घेऊन जाईन वहिनी तुम्हांला. ते डॉ. कोल्हटकर एम्. डी. आहेत ना? माझी त्यांच्याशीं चांगली ओळख आहे. मीच घेऊन जाईन एकदां तुम्हाला त्यांच्याकडे."

एव्हांना बंडूला झुरळ हा आपल्यापेक्षां किती तरी आदरणीय प्राणी आहे हें पटलें होतें.

"फारच करतां तुम्ही, भावजी. तसं काहीं होत नाहीं मला." स्नेहलतेनें कौतुकानें मान वेळावली.

"हो, वहिनी! डॉक्टरची, गोष्ट निघाली त्यावरून आठवण झाली. आमचे ते क्षीरसागर झाले आहेत आजारी."

"काय, टायफॉइड झाला आहे का?" बंडूनें संभाषणांत भाग घेण्याचा दुबळा प्रयत्न केला.

"ख्वाय तरी तुमचं बोलणं! लोकांना टायफॉइड व्हावा असली कसली ती मेली इच्छा!" स्नेहलतेनं नापसंतीदर्शक नाक मुरडलें.

"अग, इच्छा नव्हे; लोकांनीं आजारी पडून मला काय त्याचा फायदा? आणि आजारी पडायचंच तर आपला हार्टफेल व्हावा! म्हणजे उगीच त्रास नको!" बंडूनें बाजू सावरण्याकरितां आपलें औदार्य दाखवलें.

"घ्या! लोकांनी आजारी पडूनहि ह्यांचं समाधान नाहीं. त्यांनीं हार्टफेल होऊन मरावं असं हवंय् ह्यांना!"

"च्! च्! उगीच गैरसमज करून घेऊं नको. मी म्हणतों, कीं हार्टफेल झाला म्हणजे त्रास नाहीं. आतां तुझ्या मावशीचंच बघ ना! ती इतकी जलोदरानं आजारी आहे; आपल्याकडेसुद्धां दोन महिने राहून ट्रीटमेंट घेऊन गेली. पण आहे का कांहीं फायदा? त्यापेक्षां—"

"झाऽऽलं! पाहिलंत भावजी? जरा कुठं माझी मावशी दोन महिने येऊन राहिली, तर त्याचा ह्यांना त्रास झाला. तिला मारायला कीं हो निघाले हे आतां! आम्ही म्हणतोंय कीं जितके दिवस जगेल तितके दिवस जगवायची आणि ह्यांचं मेलं भलतंच!"

"अग, तसा नव्हता माझ्या बोलण्याचा अर्थ!"

"पुरे करा आतां; मुलखाचे अजागळ आहांत तुम्ही!"

बंडू जें झुरळ झाला होता तें केव्हांच दाराच्या फटींत चेंगरून मेलें होतें.

"जाऊं दे हो वहिनी. ह्या बंडूला कीं नाहीं, अजून पोंच आली नाहीं—तर मी काय म्हणत होतों, आमचे ते क्षीरसागर झाले आहेत आजारी."

"कोण हे क्षीरसागर?"

"क्षीरसागर म्हणजे आमच्या मामांचे साडू."

"असं असं!" कुणाचें तरी कुणाशीं तरी नातें आहे असें कळल्यावर स्त्रीला जें खोल समाधान होतें तें स्नेहलतेच्या चेहऱ्यावरून ओसंडत होतें.

"त्यांना नाहीं आहे बरं. म्हणून त्यांच्या घरचीं माणसं आइसबॅग आणायला निघालीं होतीं. तेव्हां मीं म्हटलं, उगीच कशाला विकत घेतां? आमच्या वहिनींच्याकडे आहे तसली बॅग. आणि त्या काहीं मला नाहीं म्हणायच्या नाहींत; तेव्हां हवी तर मी आणून देतों त्यांच्याकडून."

"हं." स्नेहलता गाफीलपणें म्हणाली.

"माझा स्वभाव बुवा असा आहे, कीं कुणी अडचणींत असलं कीं त्याला आपली मदत करावीशी वाटते. वाटतं, कीं आपल्या हातून होईल तेवढं करावं!"

"नाहीं तर काय हो! आपल्या माणसाला आपण मदत नाहीं करायची, तर कुणीं करायची? पण जरा कुणीं माझ्या माहेरचं माणूस आलं कीं ह्यांना वाटतं, आपल्याला लुटूनच नेताहेत!"

"एकेकाचा स्वभाव असतो, वहिनी. पण तुमचा आणि माझा स्वभाव जुळतो पाहा! आपल्या घरांत एखादी वस्तु पडून आहे आणि ती दुसऱ्याच्या उपयोगीं पडण्यासारखी आहे असं कळलं, तर तुम्ही स्वतः उचलून ती वस्तु दुसऱ्याला द्याल."

"मला नाहीं बाई जमत कुणाला नाहीं म्हणायचं!" असें म्हणतांना आपलें कांहीं तरी चुकतें आहे अशी शंका स्नेहलतेच्या मनाला चाटून गेली. आपलें थर्मामीटर, एनिमा, दोन ब्लँकेटें, कपबशांचा एक सेट वगैरे नाहींशा झालेल्या गोष्टींची तिला आठवण झाली. तिच्या मनाला चुटपुट लागली; पण आतां फार उशीर झाला होता!

तेवढ्यांत तिचें लक्ष बंड्रूकडे वेधलें. तो तोंड वेडेंवाकडें करून हाताचे पंजे डोक्याजवळ हलवीत होता. त्याचा चेहरा फार क्रूर दिसत होता.

स्नेहलतेला वाटलें, कीं बंड्रूला फिट् येते आहे. ती किंचाळली, "अग बाई! हे पहा कसं करताहेत ते!"

तिचे हे शब्द ऐकून, बेबंदशाही नाटकांत कब्जीला मारायला धावणारा खंडोबल्लाळ जसा संभाजीच्या ओरडण्यामुळें जागच्या जागीं अंग चोरून उभा राहतो, तसा बंड्रू त्याच पोजमध्यें उभा राहिला.

बंड्रू स्नेहलतेला आइसबॅग देऊं नको म्हणून खुणवत होता हें राजानें ओळखलें; आणि ही गोष्ट राजानें ओळखल्याचें बंड्रूच्याहि ध्यानांत आलें. त्यामुळें तो फारच खजील झाला आणि बावळटपणें म्हणाला,

"हॅं! हॅं! मी आपली गंमत करीत होतो."

"गंमत! कर्म माझं! अहो, मला वाटलं, कीं तुम्हांला फिट् येते आहे!"

"हॅं, हॅं, हॅं, हॅं!" बंड्रूनें हसण्यावर घालवण्याचा प्रयत्न केला.

पण त्यामुळें स्नेहलता दचकून मागे सरली आणि म्हणाली, "असं काय करताहेत हे वेड्यासारखं!"

"काय बुवा कळत नाहीं कांहीं." राजानें वेड पांघरलें.

आपण डिसेक्शन टेबलावरचा बेडूक आहोंत आणि त्या दोघांच्या धारदार नजरा आपली आतडीं बाहेर काढून तपासत आहेत असें बंड्रूला वाटूं लागलें. त्याचे खादे लोंबूं लागले, चेहरा लांब झाला आणि बेशुद्ध पडलेल्या बेडकाची कळा त्याच्या चेहऱ्यावर आली. आइसबॅगच काय, पण आपलें सर्वस्व राजाला द्यावें आणि एकदां त्याला घरांतून बाहेर काढावें, एवढीच इच्छा त्याच्या मनांत शिल्लक राहिली.

"बरं, चला वहिनी! ती आइसबॅग तेवढी द्या मला. मी काय, आणखी चार तास बोलत बसेन. पण पेशंटची गरज पहायला हवी ना!" राजा इतक्या साळसूदपणें बोलला, कीं त्याचे कान मेंढीच्या कानांसारखे लांब होऊन निरागस-पणें लोंबूं लागले.

स्नेहलता निरुपायानें जागची उठूं लागली. आपली सारी गफलत तिच्या

पूर्णपणें ध्यानांत आली होती; पण आतां फार उशीर झाला होता.

तेवढ्यांत बंडूनें आइसबॅग वांचवण्याचा अखेरचा प्रयत्न केला. तो म्हणाला, "अग ! पण आपली आइसबॅग ताम्हनकरांनीं नेली आहे ना ?"

बंडूचें हें विधान अर्धसत्याच्या स्वरूपाचें होतें. ताम्हनकरांनीं आइसबॅग नेली होती खरी; पण आदल्या दिवशीं त्यांनीं ती परत केली होती. म्हणजे बंडूनें बरेच खेटे घालून आणि बरीचशी निर्भर्त्सना सहन करून ती वसूल केली होती.

बंडूचे हे सूचक उद्‌गार ऐकून स्नेहलता म्हणणार होती, 'हो बाई !'

पण तेवढ्यांत राजा म्हणाला, "अरे, ही गोष्ट मला का माहीत नाहीं ? मी मुळीं आधीं ताम्हनकरांच्याकडेच गेलों होतों. म्हटलं त्यांच्याकडून ती सरळ घेऊन जावं आणि मग वहिनींना कळवावं, कीं बुवा मीं ती नेली आहे. पण ते म्हणाले कीं कालच तूं ती घेऊन गेलास."

हें ऐकून बंडूचा पार चुराडा झाला. खोलीभर विखुरलेल्या आपल्या शरीराच्या तुकड्यांकडे तो नुसता पहात राहिला; ते एका टोपलींत गोळा करून उकिरड्याच्या ढिगाऱ्यावर नेऊन टाकायचे एवढेंदेखील भान त्याला राहिलें नाहीं.

"त्यांनीं नाहीं हो, मींच आणली ती." स्नेहलतेनें त्याची बाजू सावरली आणि आइसबॅग राजाच्या स्वाधीन केली. मग त्या दोघांनीं दुःखानें माना फिरवल्या. तिची आणि आपली ही अखेरची भेट हें त्यांना जाणवत होतें.

बंडूनेंहि अश्रुपूर्ण नजरेनें आइसबॅगकडे एकदां पाहून घेतलें. आणि मग त्याला विलक्षण चेव आला. जिवाच्या शर्थीनें राजाशीं झुंज द्यायची असा त्यानें निर्धार केला.

शक्य तितका निर्विकार चेहरा करून तो म्हणाला, "बरं, मग परत कधीं येणार ही आइसबॅग?"

"परत म्हणजे? माझ्या घरीं ठेवून तिची पूजा करणार आहें कीं काय मी? आणि माझ्याकरितां थोडीच नेतों आहें ही मी? त्या क्षीरसागरांचं अडलं म्हणून म्हटलं कीं आपल्याकडून त्यांच्याकरितां कांहीं होणार असेल तर करावं!"

"तें खरंच आहे; पण वस्तु परत येईल अशी खात्री हवी." स्नेहलतेनें मऊपणें सूचना केली.

"परत यायची खात्री म्हणजे? मग मी मध्यें कशाला आहें? त्याची काळजी करूं नका तुम्ही, वहिनी. मी स्वतः घरीं आणून पोंचवतों. तुमची वस्तु मोडली-तुटली तर मी भरून देईन—स्वतः पदरचे पैसे मोडून देईन! आतां झालं ना? कीं आहे कांहीं संशयाला जागा?"

"तसा नाहीं हो माझ्या म्हणण्याचा अर्थ! पण आपला—" स्नेहलता घाबरटपणें म्हणाली.

"तुमच्या मनांत तसलं कांहीं नसेल हो! नसेल कसलं?—नाहींच. मला माहीत आहे ना तुमचा स्वभाव! पण आपण आपलं सगळं स्पष्ट केलेलं बरं. दोनचार रुपयांची का असेना वस्तु!—आणि तीसुद्धां चार वर्षं वापरलेली का असेना, ती आपली ज्याची त्याला परत केलेली बरी!"

"आमची आइसबॅग आपली आहे देशीच." स्नेहलता शरमिंदी होऊन म्हणाली. हलक्या दर्जाच्या वस्तू घेतल्याबद्दल तिला बंडूचा विलक्षण राग आला.

"अहो! ही दोनचार रुपयाची तरी वस्तु आहे—"

"सहा रुपयांची!" बंडू चिकाटीनें म्हणाला.

"बरं बाबा, सहा रुपयाची! मोठी किमतवान् आइसबॅग आहे तुझी. झालं?" इथें राजानें तुच्छतेचें हास्य मोठ्या कष्टानें आवरलें.

बंडूचा क्षुद्रपणा पाहून स्नेहलतेला तर अगदी मेल्याहून मेल्यासारखे झालें!

राजा पुढें म्हणाला, "तर काय म्हणत होतो मी?—बरं का, मागें एकदां मीं ऑफिसांतल्या माणसाची पेन्सिल घेतली होती. पेन्सिल म्हणजे चार आण्यांची वस्तु, काहीं अगदीं सहा रुपयांची नव्हे!" इथें पुन्हा राजानें आपलें तोकडें हास्य केलें. आणि बंडूनें खिडकींतून उडी मारून सातव्यादा जीव दिला! "—तर बुवा ती परत करायची राहिली माझ्या हातून! सहसा असं होत नाहीं; पण त्या दिवशी झालं खरं. सांगायची गंमत काय, कीं देणेदारासारखा गृहस्थ मागें लागला माझ्या! रोज आपलं ऑफिसांत गेलं कीं पेन्सिलीबद्दल विचारायचा! अखेर कमाल म्हणजे खुद्द घरीं आला एक दिवशीं माझ्या. बोला

आतां!" माणसाच्या क्षुद्रपणाविषयीं वाटणाऱ्या आश्चर्यानें राजाचा चेहरा उद्‌गारचिन्हासारखा झाला होता.

स्नेहलतेनें एक ओशाळलेलें हास्य केलें. तो गृहस्थ बंडू तर नसेल ना, अशी तिला शंका आली.

"तेव्हां सागायचं काय, कीं तुमची आइसबॅग परत मिळेल. त्याची तुम्ही जरासुद्धां काळजी करूं नका!" आणि असें भरघोस आश्वासन देऊन व आइसबॅग खाकोटीला मारून राजा जायला निघाला.

बंडूची चिकाटी एव्हांना बहुतेक संपुष्टात आली होती. तरी पण जीव मुठींत धरून तो म्हणाला, "तसं नाहीं. पण मागं गेलेल्या काही गोष्टी परत आलेल्या नाहींत, म्हणून विचारलं."

राजा मागे वळला. त्याचा चेहरा आतां प्रश्नचिन्हासारखा झाला होता. ह्या प्रश्नचिन्हांतून उद्विग्नतेच्या नुसत्या ज्वाला निघत होत्या. "कुठची रे बाबा वस्तु परत आली नाहीं तुझी?—हां! तें थर्मामीटर म्हणतोस होय?"

'थर्मामीटर' हा शब्द राजानें असा कांहीं उच्चारला, कीं बंडूला वाटलें, मुंबईंत हल्लीं थर्मामिटरें रस्तोरस्तीं फुकट वांटली जातात; लोक गयावया करून म्हणतात, 'अरे बाबानो, नको थर्मामिटरं! घरं भरून गेलीं त्यांनीं! ठेवायचीं तरी कुठें आतां तीं!' तरी आपले थर्मामीटर कंपन्यांचे चालक थर्मामिटरें लोकांच्या हातांत कोंबतच असतात!

बंडू कांहींच बोलेना तेव्हां राजा पुढें म्हणाला, "तुझं थर्मामीटर परत करायला मीं त्रिंबकरावांना दहा वेळां सागितलं. पाहिजे तर समक्ष विचार तूं त्यांना. अखेर मी तें घेऊन मुलीच्या हातीं तुझ्याकडे पाठवून देत होतों. पण वाटेंत मुलगी पडली आणि थर्मामीटर फुटलं. तुझी साडेतीन रुपयांची वस्तु नाहींशी झाली; पण मला डॉक्टरला दहा रुपये द्यावे लागले! पण म्हणून तुझं थर्मामीटर गेलं असं समजूं नको! तुझे साडेतीन रुपये मी देणार आहें; तसं कशाला, आत्तां हा रुपया खिशात आहे तो घेऊन ठेव; बाकीचे अडीच रुपये घरीं जाऊन मुलीच्या हातीं देतों. हो! आणि शिवाय ह्या आइसबॅगचे सहा रुपयेदेखील डिपॉझिट म्हणून पाठवून देतों. हं, घे हा रुपया!"

रुपया घेण्याकरितां बंडू हात पुढें करणार होता; पण तेवढयांत स्नेहलता

म्हणाली, "असं काय करतां भावजी? ठेवा तो रुपया. ही आइसब्रॅग तेवढी व्यवस्थित परत येऊं दे म्हणजे झालं."

राजा निष्काळजीपणानें नोट खिशांत कोंबत म्हणाला, "पण नकोच! आमच्या बंडूचं समाधान होऊं दे. मी आता घरीं जाऊन साडेनऊ रुपये पाठवूनच देतों!" आणि सात्त्विक संतापाच्या भरांत तो आइसब्रॅग घेऊन निघून गेला.

राजा दूर गेला अशी खात्री झाल्यावर बंडू आवाज चढवून म्हणाला, "महा-मूर्ख आहेस तूं! इतक्या वस्तू त्यानं परत केलेल्या नाहींत आणि तरी त्याला आइसबॅग देऊन टाकलीस ना तूं?"

आपलें चुकलें असें स्नेहलतेला वाटत होते; पण बंडूनें तसा आरोप केल्यावर मात्र तिचें मन पालटलें. क्षणार्धांत सारी चूक बंडूचीच आहे असें तिला पटलें. आणि निष्पाप चेहऱ्यानें ती म्हणाली, "म्हणे मीं दिलं! मी कोण बाई देणार? घर तुमचं, घरांतल्या वस्तू तुमच्या आणि मित्रहि तुमचाच!"

स्नेहलतेच्या सोयीप्रमाणें घराची मालकी बंडूकडे अगर तिच्याकडे जात असे.

बंडू आणखीनच चिडून म्हणाला, "म्हणजे मीं आइसब्रॅग दे म्हणून सांगितलं कीं काय तुला? उलट, मी तुला खुणवत होतो कीं आइसब्रॅग देऊं नको, तर तूंच मला खुळ्यात काढलंस! मला फिट येते आहे असं म्हणालीस."

"अय्या! आपल्या नाकांत कुणीं गिरमिट फिरवलं आहे असा चेहरा केला आणि हत्तीच्या कानांसारखे हात हलवले म्हणजे आइसबॅग देऊं नको असं समजायचं वाटतं?" स्नेहलतेनें बंडूची नक्कल करून दाखविली आणि बिछान्यांत लोळत ती हसूं लागली.

संतापानें कांपत बंडू ओरडला, "असा विषय पालटूं नको. आणि गाढवा-सारखी हसूं नको."

"गाढव हसतं वाटतं? खु–खि–खि–खु!" स्नेहलतेनें पुन्हा एक लोळण-फुगडी घेतली.

"गाढव हसत नसलं तर नसलं. मला काय करायचं आहे त्याच्या हस-ण्याशीं? काय अडणार आहे माझं गाढव हसलं नाहीं तर? पहिल्या तारखेला

गाढव हसलं नाहीं तर काय मला पगार मिळायचा राहणार आहे, का गाढव हसलं म्हणून सरकार बॅंक-हॉलिडे देणार आहे? गाढवाचा इथें संबंध आलाच कुठं?"

"तुम्हीच तर म्हणालांत मला, 'गाढवासारखी हसतेस' म्हणून." स्नेहलता हसूं आवरत म्हणाली.

"मीच म्हणालों ना? तूं नाहीं ना म्हणालीस? होय ना? असंच ना? तर मग मी गाढव आहें. एकच का शंभर, हजार गाढवं आहें मी!" बंडू मुठी आवळून थयथया नाचत होता.

"बरं बाई! आहांत तुम्ही हजार गाढवं. झालं ना समाधान? आतां उगीच किंचाळूं नका!"

"मग हें आधींच कां नाहीं कबूल केलंस?" बंडू शांत होत म्हणाला. पण आइसबॅगची आठवण होऊन तो पुन्हा नाचला आणि किंचाळला, "पण आइस-बॅग कां दिलीस तूं त्याला? बोल, आधीं बोल!"

"उगीच आतां माझ्यावर घालूं नका हं! एवढं तुमच्या मनांतून द्यायचं नव्हतं तर सांगायचं होतंत आपल्या मित्राला कीं, 'बाबा रे, माझ्या घरीं कांहीं येत जाऊं नको आणि माझ्याकडे कांहीं वस्तु मागत जाऊं नको!'— कां नाहीं हो असं सांगितलंत? तेव्हां कशाला दांतखीळ बसली होती?"

बंडूला तोच प्रश्न पडला होता! आज सतत पंचवीस वर्षें राजापुढें आपली दांतखीळ अशी कां बसते आहे हें कोडें आज तितकींच वर्षें त्याला उलगडत नव्हतें. आणि स्नेहलतेनें नेहमींप्रमाणें अचूक त्याच्या मर्मालाच हात घातला होता; त्यामुळें तो अधिकच चिडून म्हणाला, "मीं शेण खाल्लं असेल; पण तूं कां आइसबॅग काढून दिलीस त्याला?"

"हें पहा, आतां उगीच डोकं खाऊं नका माझं! एवढीशी ती मेली आइस-बॅग ती काय आणि तिच्यावरून एवढं थैमान कसलं घालतां? इतकंच असलं तर मी आईला लिहितें, कीं 'बाई, एक आइसबॅग पाठवून दे!' एवढ्या गोष्टीला कांहीं माझी आई नाहीं म्हणायची नाहीं! मग तर होईल ना तुमचं समाधान? बायकोपेक्षां ह्यांना आइसबॅगचीच किंमत जास्त!" फणकाऱ्यानें स्नेहलता घरांत निघून गेली.

आणि बंडू दोन्ही हातांत डोकें घट्ट धरून मटकन् खालीं बसला.

त्या रात्रीं बंडूला झोप लागली नाही. जरा डोळा लागला कीं त्याला वाटायचें, दार वाजतें आहे आणि कोणी तरी म्हणतं आहे, 'दार उघडा हो बंडूकाका! बाबांनीं साडेनऊ रुपये देऊन पाठवलंय् मला.' पण बंडूनें दार उघडलें कीं ती गोड बालिका अदृश्य होत असे.

त्या दिवसानंतर बंडूला ध्यानींमनीं आइसबॅग दिसूं लागली! आपल्या स्वप्नांत तो आइसबॅगवर बसून हिमालयाच्या रम्य शिखरांवर 'ईव्हिनिंग वॉक' घ्यायला जात असे. जेवायला बसल्यावर 'एक गरमगरम आइसबॅग वाढ' असा तो स्नेहलतेला हुकूम सोडत असे. आणि एकदा तर तापलेल्या ऑफिसरला 'फाइल घरीं विसरलो' असें सागण्याऐवजीं त्यानें 'आइसबॅग घरीं विसरलों!' असें सांगून भयंकर स्फोटक परिस्थिति निर्माण केली होती.

असें असलें तरी जवळजवळ आठ दिवस प्रयत्न करूनहि राजाची आणि त्याची गांठ पडली नाहीं. त्याच्या ओळखीच्या सर्व माणसाना राजा भेटत असे. 'हा आत्ता इथें होता!" असा हवाला लोक बंडूला देत असत; पण खुद्द राजाच काय, त्याच्या शर्टाची लोंबती बाहीदेखील बंडूच्या दृष्टीस पडत नसे. नाही म्हणायला, एकदां बंडूला तो दिसल्याचा भास झाला होता; त्याबरोबर बंडूहि जिवाची तमा न बाळगता धावत सुटला होता. पण धावतांधावतां त्याला दोन्ही बाजूंनीं कर्कश आवाज ऐकूं आले आणि काय होतें आहे तें कळण्यापूर्वीच जमिनीवरून त्याचे पाय सुटले! काय होतं आहे तें कळूं लागलें तेव्हां बंडू एका मोटारीच्या पुढच्या बफरवर उभा होता, व दुसऱ्या बाजूनें एक घोडा त्याच्या कानात कांही तरी सांगत होता! प्रसंगावधान राखून बंडूनें मोटारीचें नाक थोपटलें आणि घोड्याची क्षमा मागून तो पुढें सटकला. पण तोंपावेतो राजा कुठे अदृश्य झाला होता!

नवव्या दिवशीं बंडूला राजा भाजी मार्केटांत दिसला. तेव्हां तो सटकेल ह्या भीतीनें बंडू भाजीवालीला पैसे न देतांच पुढें धावला. पण त्याच वेळेला ह्या कानापासून त्या कानापर्यंत हसत राजाच लगबगीनें सामोरा आला आणि नेहमींच्या दिलखुलासपणें म्हणाला, "काय बंडोपंत?"

"काय?" बंडू मवाळपणें म्हणाला.

"अरे बाबा! तूं आहेस कुठें? आज दोन दिवस तुला शोधतों आहें;

पण कुठें अगदीं पत्ता नाहीं तुझा?"

"नाहीं. मी इथेंच आहें." राजाच्या दृष्टीस न पडण्यांत आपण फारच मोठी चूक केली हें बंडूला एव्हांना पूर्णपणें पटलें होतें.

"अरे, ते क्षीरसागर!" राजा म्हणाला.

"कां रे, वारले कीं काय ते?" बंडूनें घाबरून विचारलें. आपल्याकडून शंभर रुपये उसने नेऊन नंतर तडकाफडकीं मरणाऱ्या गृहस्थाची बंडूला आठवण झाली.

"वाः! फार शुभ बोलतोस बुवा तूं. अरे, मी सांगत होतो, कीं त्यांची तब्येत सुधारते आहे. क्रिटिकल केस होती बघ! पण नशीब शिकंदर—"

"माझ्या आइसबॅगचा उपयोग झाला ना?" बंडू चाणाक्षपणें इष्ट मुद्द्याकडे संभाषणाची गाडी वळवूं लागला.

"कसली आइसबॅग अन् कसलं काय! तोंडचं अगदीं पाणी पळालं होतं!"

"म्हणजे! आइसबॅग हरवली कीं काय?" पायावर वरवंटा पडल्यासारखा चेहरा करीत बंडू म्हणाला.

"आइसबॅगला नाहीं रे कांहीं झालं तुझ्या! (आवाज बदलून) आँ? अशीं कशीं रे माणसं तुम्ही! तो माणूस मरणाच्या दारांत गेला होता नि तुम्हांला आइसबॅगा सुचतात! कांहीं मनाचा मोठेपणा ठेवाल कीं नाहीं? एवढी आइसबॅग मी तुझ्याकडून घेऊन गेलों, तर एकदां दोन मोसंबीं घेऊन समाचाराला तरी जायचं होतंस त्यांच्या!"

बंडू शरमिंदा होऊन ताबडतोब दोन मोसंबीं घेऊन राजाबरोबर क्षीरसागरांच्या समाचाराला निघणार होता; पण राजाला वेळ नसल्यामुळें तें तेवढ्यावरच राहिलें!

त्यानंतर एकदोनदां राजाची भेट झाली तेव्हां क्षीरसागरांच्या प्रकृतीची आस्थेनें विचारपूस करण्यापलीकडे संभाषण वाढवायची बंडूची हिंमत झाली नाहीं.

मग राजाची आणि बंडूची भेट झाली आणखी पंधरा दिवसांनीं. भेट होतांच बंडूनें क्षीरसागरांच्या तब्येतीची आस्थेवाईकपणें चौकशी केली.

"ऑ ? क्षीरसागर ? त्याना काय झालंय् ?... हा ! हा ! मध्यें ते आजारी होते खरे, पण त्या गोष्टीला आता महिना झाला गृहस्था ! टणटणीत बरे झाले कीं ते आतां. म्हणजे त्यानीं काय सारखं आजारीच राहावं अशी इच्छा आहे कीं काय तुझी ? कमाल असते बुवा माणसाची !"

"तसं नव्हे, पण माझी आइसबॅग अजून परत आली नाहीं म्हणून विचारलं!" बंडू ओशाळला होता तरी त्याच्या डोळयात आशा चमकत होती.

"ओः! अजिबात विसरलो होतो मी! तुझी आइसबॅग नाही का? सहा रुपयांची! (इथें राजाचा आवाज छद्मी झाला होता.) डोण्ट वरी! आणून देतो मी. अगदीं काळजी करूं नको. उद्याच आणून देतां, नाहीं तर निदान परवां." आणि राजा लगबगीनें निघून गेला.

इकडे बंडूच्या हृदयातल्या आशेला पालवी फुटून तिचीं पानें त्याच्या तोंडांतून बाहेर आली.

त्यानंतर एकदां बंडू रस्त्यांतून जात असतां राजानें धावत येऊन त्याच्या पाटींत थाप मारली व म्हणाला, "तूं काळजी करूं नको हं! तुझ्या आइसबॅगचं पक्कं ध्यानांत आहे माझ्या!"

दुसऱ्या एका वेळीं बंडू रस्त्यांतून चालला असतां पलीकडच्या बाजूनें 'शुक्, शुक्' असा आवाज आला, टाळ्या वाजल्या. बंडूनें पलीकडे पाहिलें तो राजा तिथें उभा होता आणि सगळा रस्ता कुतूहलानें त्याच्याकडे व बंडूकडे पहात होता. बंडू बिचारा ओशाळला आणि आणि घाईनें रस्ता ओलांडून राजाकडे जाऊं लागला.

पण राजा ओरडला, "नको, नको! काम नव्हतं तसं कांहीं जास्त. इतकंच सांगायचं होतं, कीं आइसबॅगची आठवण आहे मला. (आवाज चढवून) म्हटलं, आइसबॅग तुझी! आठवण आहे मला. देतों आणून."

बंडूनें 'समजलें' अशा अर्थी हात हलवले आणि मान खालीं घालून तो लगबगीनें चालूं लागला. आपल्या मालकीची कधींकाळीं एक आइसबॅग होती ह्या गोष्टीचें स्मरणहि त्याला त्या वेळीं दुःसह वाटत होतें.

त्यानंतर राजा भेटला तेव्हां तो म्हणाला, "काय बंडू! फार दिवसांत भेट झाली नाहीं, नाहीं रे? आतां एकदां घरींच येणार आहें मी तुझ्या—नाहीं,

काय म्हणणार आहेस तें समजलं मला! एकटा नाही येत. बायकोला घेऊन येतों. फार दिवसाचा आग्रह आहे तुझा—"

"ये ना. केव्हांहि यू आर वेलकम्! पण काय रे, आपली सहज आठवण झाली म्हणून विचारतों—माझी ती आइसबॅग! हवी आहे मला ती!"

"आइसबॅग–आइसबॅग!" राजा हनुवटीवर तर्जनी ठेवून आठवण करूं लागला. आणि मग एकदम त्याला मोठ्यांदा हसूं लोटलं. "तुझी ती आइस-बॅग नाहीं का? सहा रुपयाची!"

बंडूनें मान तुकवली. राजाच्या हसण्याला साथ करणें हें त्याला आपलें कर्तव्य वाटूं लागलें होतें.

"त्या तुझ्या बॅगची मोठीच गंमत झाली बुवा!"

बंडू अधिकच मोठ्यानें हसला.

"काय झालं, क्षीरसागराची तब्येत सुधारली तेव्हा ती बॅग पेंडश्यांनीं नेली आणि पेंडश्याकडून वाटतं ती जोश्यांच्याकडे गेली!"

बंडूच्या चेहऱ्यावरचें हास्य वितळलें आणि पोटांत कळ आल्यासारखा त्यानें चेहरा केला. त्यानें विचारलें, "आणि जोश्याकडून कुणाकडे गेली ती?"

"च् च्! ती मुद्दयाची गोष्ट नव्हे रे. त्यांतली जोक समजली नाही तुला! तर काय झालं, जोश्याचा एक छोकरा आहे चार वर्षांचा. मोठा गुड पोरगा आहे बघ."

"त्यानं ती फेकून दिली कीं काय?"

"नाहीं रे, ऐकून तर घे खरा!"

"हां, हां! मग हरकत नाही." बंडूनें चेहऱ्यावर पुन्हा हास्य आणलें.

"तर त्या पोरानं काय केलं, ब्लेड घेतली—आणि बरं का, ऐक तर खरा, ती आइसबॅग चांगली व्यवस्थित कापली, अगदीं वाटोळी बरं का! आणि कौंटी कॅप म्हणून ती डोक्यावर ठेवून ऐटींत क्रिकेट खेळायला गेला तो! घरीं आपले सगळे लोक शोधताहेत कीं आइसबॅग कुठें आहे! तर हे राजश्री आपले डोक्यावर घालून बसले आहेत! मोठा खट्याळ पोरगा बुवा!" आणि राजा पुन्हा खो खो करून हसला.

पण बंडूचा चेहरा मात्र पोटात कळ आल्यासारखा झाला होता.

त्याच्या चेहऱ्यावरचा तो भाव पाहून राजाला देखील आश्चर्य वाटलें. तो म्हणाला, "काय रे, काय झाल?"

बंडू रडक्या स्वरांत म्हणाला, "म्हणजे ह्याचा अर्थ काय? माझी आइस-बॅग नाहीशी झाली त्याचं काय? कोण पैसे भरून देणार त्याचे मला? आमची वस्तु म्हणजे काय रस्त्यावरची पडलेली असते कीं काय?"

बोलताबोलता बंडूचा आत्मविश्वास वाढला. त्याच्या मनातली भीति नष्ट झाली. आपण सहज राजाची मानगूट धरून त्याच्याकडून आइसबॅगचे पैसे वसूल करूं, अशी त्याला खात्री वाटूं लागली.

पण बंडूचा हा नूर पाहून राजानें पवित्रा बदलला. तो बंडूच्या पाठीवर थाप मारून म्हणाला, "अरे, अशी काळजी काय करतोस? तुझी आइसबॅग गेली एवढंच ना? मी तिची किंमत भरून देईन तुला. सहा रुपयांचा तर सगळा प्रश्न! अं! डोण्ट वरी."

बंडूचा भांडखोरपणा ओसरला. आपण उगीच हमरीतुमरीवर आलों असें त्याला वाटलें. राजाकडून ताबडतोब पैसे वसूल करणेंदेखील त्याला पोरकटपणाचें वाटलें. खालीं मान घालून तो घराच्या दिशेनें चालूं लागला.

त्यानंतर बरेच दिवसांत राजा बंडूच्या दृष्टीस पडलाच नाहीं. नंतर तो दिसला तेव्हां त्याची मुद्रा चिताक्रांत दिसत होती. तरी देखील बंडू धिटाईनें पुढें झाला आणि त्यानें त्याला आपल्या सहा रुपयांची भीतभीत आठवण केली.

राजानें त्याच्याकडे धड पाहिलेंच नाहीं. तो म्हणाला, "कसले सहा रुपये! माझा झालाय् केवढा तरी घोटाळा! महत्त्वाच्या कामाला म्हणून निघालोंय् मी आणि पाकीटच घरीं राहिलं. ऑ?—बंडू! तूं होय? बरा भेटलास. चटकन् रुपया दे बरं मला एक. मला आत्तां गेलंच पाहिजे. चल, चल लवकर. उशीर नको लावूं!"

ह्यानंतर आपण रुपया कधीं काढून दिला आणि राजा उडी मारून बस-मध्यें कधीं शिरला तें बंडूला कळलेंच नाहीं!

सहा रुपयांचे सात रुपये झाले आणि बंडूला अधिकच चेव चढला. आतां

राजा रस्त्यांत भेटेल ह्या अपेक्षेवर न राहतां तो राजाच्या घरीं खेटे घालूं लागला. तीन वेळां तो गेला तेव्हा राजा भेटलाच नाहीं.

चौथ्या वेळेला तो दारात येताच राजाच्या सौभाग्यवतीनें तुटकपणानें त्याला सांगितलें, "घरीं नाही आहेत."

"केव्हा येईल?"

"सांगितलं नाहीं."

"जरा बसतो मी." बंडू चिकाटीनें म्हणाला. ह्यावर कांहीच न बोलतां बंडूकडे तिरसटपणें पहात राजाची सौभाग्यवती आत निघून गेली.

कांही माणसें विनाकारण तिरसटपणानें कां वागतात ह्याविषयीं आश्चर्य करीत असता, घरातून त्याला हलक्या आवाजांतलें बडबडणें स्पष्ट ऐकूं आलें.

"काय बाई माणसं तरी! दहा वेळां नाहीं म्हटलं तरी लोचटासारखे पाच आणि दहा रुपये मागायला कशाला येतात कोण जाणे! भागत नाही तर घरच्या चैनी कमी कराव्या. आमच्या घरीं का पैशाचीं झाडं लागली आहेत?"

कोणाला उद्देशून हें बोलणें चाललें असावें ह्याचा बंडू विचार करीत असतां त्याला दारांत एक संशयी चेहरा दिसला. राजाची आई बाहेर कोण आलें आहे तें पहात होती. ती घरांत जाऊन आपल्या खड्या आवाजांत बोलली, "आणि घरीं नाहीं असं सांगितलं तर तेवढ्यावरून समज पटत नाहीं ह्या माणसाची!"

हे शब्द कानीं पडतांच बंडूला सारा उलगडा झाला. आपल्यालाच उद्देशून हें बोलणें चाललें आहे हें त्याच्या ध्यानीं आलें. म्हणजे राजानें घरीं अशी चकचकीत समजूत करून दिली होती कीं, बंडू त्याच्याकडे पैसे उसने मागायला आला होता. बंडू स्तंभित झाला. खदिरांगारासारखे लाल होऊन त्याचें समाधान होईना. आणखी कशासारखे लाल व्हावें तें त्याला समजेना.

पण तेवढ्यांत राजा आला आणि बंडू उसळून ओरडला, "काय रे राजा? तूं घरच्या माणसांची काय समजूत करून दिली आहेस कीं मी—"

"मूर्खा, हळू बोल!" असें खुणेनें बजावत राजानें त्याला बकोट धरून गॅलरींत नेलें.

"पण तूं अशी काय म्हणून समजूत करून दिलीस?" बंडू हलक्या आवाजांत चवताळून बोलण्याचा यत्न करीत होता.

"नाहीं रे बुवा! मीं कांहींच समजूत करून दिलेली नाहीं. पण माझा स्वभाव माहीतच आहे तुला. कुणीं मागितलं म्हणजे मला नाहीं म्हणवत नाहीं. त्यामुळं सारखीं माणसं माझ्याकडे पांच रुपये, दहा रुपये मागायला येत असतात. बायकोला साहजिकच राग येतो त्याचा; म्हणून मग अशी बडबडते ती!" राजानें स्पष्टीकरण केलें.

राजानें इतकी प्रचंड थाप मारली होती कीं, तिच्याबद्दल कांहीं शंका घेणें बंडूला अशक्यच झालें. तो बावळटासारखा राजाच्या चेहऱ्याकडे पहात राहिला. अखेर आपली सारी शक्ति एकवटून तो म्हणाला, "बरं, तें राहू दे सगळं. माझे सात रुपये दे बघूं!"

"त्या बाबतींत देखील हीच अडचण आहे बघ. मी असे लोकांना पैसे देतों म्हणून माझी बायको सगळा पगार आपल्या ताब्यांत घेते. आणि फक्त बसला लागतात तेवढे पैसे माझ्या हातांत देते."

बंडू पुन्हा गडबडला. राजाचा सगळा युक्तिवाद अगदीं सरळ आणि पटण्यासारखा होता; अगदीं निरुत्तर करणारा होता. त्यामुळें बंडूला बराच वेळ विचार करावा लागला आणि मग तो म्हणाला, "पण वहिनींना सांग कीं अशी-अशी आइसबॅग मीं क्षीरसागराना नेऊन दिली होती—"

राजानें भेदरल्यासारखा चेहरा केला. तो म्हणाला, "अरे बाप रे! मीं तिला असं सांगितलं तर ती मला फाडूनच खाईल! म्हणेल, कुणीं सागितले होते तुम्हांला हे नसते उद्योग करायला?"

पुन्हा बंडूला त्याचें म्हणणें पटलें; पुन्हा तो निरुत्तर झाला आणि मूर्खासारखा राजाकडे पहात राहिला!

अखेर राजा म्हणाला, "तूं घरीं आलास हें चुकलंच एकंदरींत तुझं! आतां असं कर, कीं तूं ऑफिसांत ये माझ्या. तिथें पाहू कांहीं जमलं तर!"

बंडू अपराधी मुद्रेनें घरीं गेला. त्याच्या अंगचें सारें शहाणपण त्याला सांगत होतें कीं, 'एके काळीं आपली आइसबॅग होती हें आतां कायमचें विसरून जा; त्या सात रुपयांचा नाद आंतां सोड.' पण त्याची जिद्द मोठी होती. राजाचा एकदां तरी पराभव करायचा, अशी महत्त्वाकांक्षा त्याच्या मनांत ठाण मांडून बसली होती.

म्हणून तो राजाच्या ऑफिसांत खेटे घालूं लागला. एकदा राजा ऑफिसात नव्हताच. एकदां तो फार कामांत होता आणि एकदां त्याला ऑफिसरनें बोलावणें पाठविलें. चौथ्या वेळेला मात्र तो चार मित्रासमवेत हॉटेलांत चहा पीत बसलेला बंडूला आढळला.

बंडूला पाहून तो ओरडला, "काय बंडोपंत? कितवी खेप? थांब बाबा, ओळख करून देतो तुझी. बरं का मंडळी, हा—हा माझा जानी दोस्त बंडू! मागं एकदा ह्याची एक आइसबॅग मीं आणली होती. म्हणजे माझ्याकरितां नव्हे बरं का! ह्याच्याच ओळखीच्या एका तिसऱ्या गृहस्थाकरिता. म्हणजे मीं फक्त ती नेऊन पोंचविली इतकेंच. बर, बॅगहि तशी मोठ्या किमतीची नाही; होती जपानीच. हा म्हणतो कीं ती सहा रुपयाची होती. मला वाटतं कीं पांच रुपयांच्यावर कांहीं तिची किमत नसावी. बर तीदेखील ह्यानं चार वर्षं वापरलेली. बरं का! तर ती आइसबॅग त्या तिसऱ्या गृहस्थांच्या हातून वाटतं फाटली. जुनीच होती ती; सहजच वापरताना फाटली असेल. तर तेव्हांपासून आज सहा महिने हा मनुष्य देणेदारासारखा माझ्यामागं हिंडतो आहे. म्हणतो, सहा रुपये मला परत दे! घरीं, ऑफिसात, रस्त्यात सारखा आपला हा त्रास! आतां आलाय् हा सहा रुपये मागण्यासाठींच. होय ना रे बंडू?"

सारें हॉटेल ही मशीनगनची फैर ऐकत होतें आणि बंडूकडे तुच्छतेनें आणि कुचेष्टेनें पहात होतें. बंडूला वाटलें कीं धरणीमाता आपल्याला पोटांत घेईल तर बरें होईल! तो बावळटपणें पुटपुटला, "छे! छे! तसं नाहीं कांहीं."

"उगीच खोटं कशाला बोलतोस बंडू? तुझ्या हिताचीच म्हणून गोष्ट सांगतों कीं ही वृत्ति सोडून दे तूं आतां! आणि बरं का मंडळी, मीं बॅग नेली तेव्हां हा माणूस बॅगची किमत डिपॉझिट म्हणून मागत होता! म्हणजे तिकडे तो माणूस मरतो का जगतो अशी स्थिति झाली होती आणि हा म्हणत होता कीं, 'सहा रुपये दे, नाहीं तर मिळायची नाही आइसबॅग.' शेवटीं मीं देतों असं कबूल केलं आणि बॅग घेऊन सटकलो."

"पण दिले नाहींसच ना सहा रुपये?" बंडूनें आपली बाजू सावरण्याचा आत्मघातकी प्रयत्न केला.

"म्हणजे? सहा रुपये येतील अशी वाट पहात तूं ती सबंध रात्र जागा

होतास कीं काय? धन्य आहे बुवा तुझी!" आणि राजा व त्याच्याबरोबरच सगळें हॉटेल गदगदून हसलें.

"तें काही नाहीं. ह्या तुझ्या वृत्तीबद्दल तुला शिक्षा झालीच पाहिजे! आमचं बिल झाल आहे दोन रुपये. तें देऊन टाक कसा मुकाट्यानं. ए छोकरा! आमचं बिल ह्या आइसबॅगवाल्या साहेबाच्याकडून घ्यायचं बरं का!"

आणि राजा आपल्या मित्राच्या टोळक्यासकट उठून चालूं लागला.

बंडूनें मुकाट्यानें बिल दिलें; हॉटेलभर विखुरलेले आपले तुकडे गोळा करून पिशवींत भरले आणि ती पिशवी उकिरड्यावर मोकळी करून तो मुकाट्यानें घरीं गेला.

तो गेल्यावर तिथें दोन कावळे आले. त्यातला एक दुसऱ्याला म्हणाला, "बडू नामक माणसाचे हे तुकडे आपण खाऊया काय?"

दुसरा म्हणाला, "छी! असल्या बेचव गोष्टी खाणं कावळ्याच्या जातीला शोभत नाही! त्यापेक्षां आपण तो तीन दिवसांपूर्वी मेलेला उंदीर पलीकडे पडला आहे, त्यालाच खाऊंया!"

आणि तुच्छतेनें 'काव् काव्' करीत ते तिथून निघून गेले.

* * *

# खरं सांगायचं म्हणजे.... ७

विद्वान् वक्त्यांनीं हातांनीं भोपळा सूचित करीत म्हटलें, "To put it in a nutshell..."

त्याच वेळीं मी दचकून जागा झालो आणि मग एक धाडसी गोष्ट केली. मीं खिशांतून एक शेंग काढली. तिच्यातला दाणा खाऊन टाकला. मग सरळ स्टेजवर जाऊन विद्वान् वक्त्यांना त्यांचें भाषण चालू असतांनाच त्या पोकळ शेंगेंत कोंबलें व शेंग खिशात टाकून बाहेर पडलों.

गंमत अशी कीं श्रोत्याना काय होतंय् तें समजलेंच नाहीं. ते आपले व्यासपीठाकडे पहात भाषण चालूच आहे अशा समजुतीनें बसलेले होते.

बाहेर पडल्यावर मीं माझ्या घरासमोरच्या बगिच्यांत खिशांतल्या चाकूनें एक लहान खड्डा केला. त्यांत ती शेंग पुरून टाकली. आणि मग हात झाडीत चालायला लागलों. ह्यामुळें त्या वक्त्यांना जरा गुदमरल्यासारखें वाटणें शक्य होतें. पण लांबलचक भाषणें करायची हौस असेल तर मनुष्यानें प्रसंगोपात्त असली गैरसोय सोसायला तयार असलें पाहिजे.

मीं केलेल्या धाडसाबद्दल आपल्याला आश्चर्य वाटत असेल. पण ह्या गोष्टी माझ्या अंगवळणीं पडलेल्या आहेत. कारण वक्त्यांना पळवायची माझी ही संवय फार जुनी आहे. मूठ आपटून जडजंबाल बडबडणाऱ्या एका वक्त्यांची मूठ मीं अशीच फार दिवसांपूर्वी लांबवली आहे. सध्यां माझ्या टेबलावर पेपरवेट म्हणून मी तिचा उपयोग करतों. त्याचप्रमाणें एका किडकिडीत क्रांतिकारक

वक्त्यांच्या डोक्यावर मीं भाषण चालू असतांना माझें पेन्सिलीचें टोपण लावलें आणि त्यांना खिशात अडकवून घरीं घेऊन आलों. आज अनेक वर्षे मीं त्यांचा लाल पेन्सिल म्हणून उपयोग करीत आलो आहें. मी पेपर तपासल्यावर बरींच मुलें नापास होतात ह्याचें कारण ती लाल पेन्सिलच!

सध्या माझ्या बायकोला एका मोराब्याच्या बरणीची आवश्यकता आहे. त्यामुळें मी गोड गोड भावगीतें म्हणणाऱ्या एखाद्या गायिकेच्या शोधांत आहें. अशी एखादी ठेंगू लठ्ठशी गायिका कुठें आढळल्यास कृपा करून मला ताबडतोब कळवावें.

असाच एकदां मीं 'मुस्कराहट' नांवाचा सिनेमा पहायला गेलों. तो जंगल-चित्रपट असावा अशी माझी कल्पना! ब्रह्मपुत्रा नदींतल्या मगरीला मुस्कराहट म्हणतात हें सगळ्यांना माहीत आहे. माझ्या बायकोला अर्थात् हें माहीत नाहीं. ती मुस्कराहट म्हणजे बंगाली पट्टेवाला वाघ असें समजते. बराच वेळ चित्रपट पाहिला तरी त्यांत ब्रह्मपुत्रा नदींतली मगर दिसेना अगर बंगाली पट्टेवाला वाघदेखील दिसेना. तसा मी संतापलों. जाग्यावरून उठत मीं संतापानें म्हटलें, "ह्याचा जाब विचारलाच पाहिजे!" बायको 'अहो, अहो' म्हणून मला अडवूं लागली. पण मी ताडकन् उडी मारून पडद्यावर गेलों आणि सिनेमाच्या नायकाच्या हनुवटीवर टोसा मारून त्याला खाली पाडलें. नतर झाडूनें एका कागदाच्या तुकड्यावर त्याला ढकललें आणि त्या कागदाची पुरचुंडी करून खिडकीबाहेर टाकून दिली.

मग नायिकेकडे डोळे वटारून पहात म्हटलें, "अजून ब्रह्मपुत्रा नदींतली मगर मला कशी नाहीं दिसली?"

"मगर?" नायिका दांत विचकून हसत म्हणाली.

"होय. होय. मुस्कराहट कशी नाहीं दिसली अजून मला सिनेमांत?"

"मी हसतें आहें तर खरी सारखी सिनेमांत."

"हसतें आहें?"

"मुस्कराहट म्हणजे हास्य."

"Nonsense! उद्यां तूं Lackadaisical म्हणजे बर्फी असें म्हणशील. मुस्कराहट म्हणजे ब्रह्मपुत्रा नदींतील मगर." मीं युक्तिवाद केला.

"छट्!" ती नायिका अडाणीपणें म्हणाली.

"बरें आहे, मी सिद्धच करून देतो." असें जोरांत म्हणून मीताबडतोब दिल्लीला ग. ज. लॉर्ड माउंटबॅटन ह्यांच्याकडे गेलो.

लॉर्ड माउटबॅटन चीजचा डबा फोडीत होते.

मीं हांक मारली, "लॉर्ड माउंटबॅटन!"

"ओ."

"खालीं ठेवा तो चीजचा डबा!"

"हा ठेवलाच. चहा मागवूं का?" लॉर्ड माउंटबॅटन अदबीनें म्हणाले.

"कसली पावडर वापरता?"

"लिप्टन. हिरवें लेबल."

"बरें, चालेल. पण ह्यापुढें गुलाबी मिक्श्चर वापरत चला."

लॉर्ड माउंटबॅटननीं ताबडतोब माझ्या अध्यक्षतेखालीं ह्या प्रश्नाचा खल करण्याकरितां एक तज्ज्ञांची कमिटी नेमली.

तें झाल्यावर मीं त्यांना म्हटलें, "ह्या देशांत काय भयंकर गोष्टी चालल्या आहेत त्याची तुम्हांला कल्पना आहे का?"

"नाहीं बुवा. काय?"

"मुंबईत लोक मुस्कराहट म्हणजे हास्य असें म्हणायला लागले आहेत."

"काय म्हणता काय?" लॉर्ड माउंटबॅटन आश्चर्यानें थक्क झाले.

"अलबत्." मीं ठासून म्हटलें.

"मग सैन्याच्या हालचालीना सुरुवात करूं म्हणतां?"

"नाहीं. सध्या तुम्ही एका ऑर्डिनन्स काढा आणि मुस्कराहट म्हणजे ब्रह्मपुत्रा नदींतील मगर असें जाहीर करा."

"अच्छा." लॉर्ड माउंटबॅटन म्हणाले, आणि त्यांनीं ऑर्डिनन्स लिहायला सुरुवात केली—

"मीं हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल व व्हॉइसरॉय असा आनंदानें हुकूम काढतों कीं ब्रिटिश हिंदुस्थान, हिंदी संस्थानें, अंदमान व निकोबार हीं बेटें—"

मीं म्हटलें, "ब्रह्मदेश, सिलोन व एडन ह्याचादेखील समावेश केल्यास बरें होईल."

"तसें करायला मला आनंद वाटला असता. पण माझा अधिकार—"

"अच्छा–अच्छा! तुम्ही चिंता करूं नका. मी सहाव्या जॉर्जना त्या बाबतींत जाऊन भेटेन."

लॉर्ड माउटबॅटननीं थोडें पुढें लिहिलें. आणि ते पुन्हा थाबले. मी प्रश्नार्थक भुंवया उंचावल्या.

लॉर्ड माउंटबॅटन पेन्सिल चावीत म्हणाले, "सध्या हिंदुस्थानचा अन्नप्रश्न फार गंभीर आहे, हें देखील आपण इथें विचारात घेतलें पाहिजे."

"तेंहि खरेंच." मीं रिकामा चहाचा कप खाली ठेवत म्हटलें.

"तेव्हां मुस्कराहट म्हणजे ब्रह्मपुत्रा नदींतील मगर असें जाहीर न करतां उकडलेलें रताळें असें जाहीर करणें फायद्याचें ठरेल. आपली कांहीं हरकत नाही ना असें करायला?" लॉर्ड माउटबॅटननीं माझ्या कपात चहा ओतला.

"अन्नप्रश्न खरोखरच इतका बिकट आहे का?" मीं विचारमग्नपणें म्हटलें.

"हो." माउंटबॅटन हनुवटीवर पेन्सिल आपटीत म्हणाले.

"तर मला वाटते कीं, मुस्कराहट म्हणजे उकडलेलें रताळें असें न ठरवतां, उकडलेला बटाटा असें ठरवावें."

"फारच हुषार बुवा तुम्ही." लॉर्ड माउटबॅटन उद्गारले. आणि ऑर्डिनन्स पुरा लिहून त्यांनीं माझ्या हातांत दिला.

मग तो ऑर्डिनन्स मीं त्या नटीपुढें आदळला.

ती नटी आश्चर्यानें म्हणाली, "हें काय?"

"ह्यांत असें लिहिलेंय् कीं तुझे तोंड उकडलेल्या बटाट्यासारखें आहे आणि त्या नायकाचें उकडलेल्या रताळ्यासारखे आहे." असें मार्मिक उत्तर देऊन मी पडद्यावरून उतरून माझ्या जाग्यावर जाऊन बसलों.

असा माझा स्वभाव करारी आहे. आणि अशा मी अनेक अचाट गोष्टी करीत असतों. लोकांच्या मात्र हें ध्यानांत येत नाहीं. कारण मी जनरीतीप्रमाणें टाय लावून कॉलेजांत लेक्चर देतों आणि लोकांत चारचौघांसारखा वागतों.

मी करारी आहें तसा लहरी पण आहें. आणि मनाची लहर कधीं कशी फिरेल तें सांगतां यायचें नाहीं. एकदा आमच्याकडे श्राद्धानिमित्त वामनभट आले होते. श्राद्धामुळें जेवण सपाटून झालें होतें आणि मला झोप येत होती. पण वामनभट आपले उगीचच पान तयार करीत आणि गप्पा मारीत वेळ काढीत होते.

"तर बरें का..." ते म्हणाले. आणि पानाच्या शिरा काढून त्यांनीं तें आपल्या तलम धोतरावर पुसून साफ केलें. त्यामुळें तें पान फार लुसलुशीत दिसायला लागलें. मीं चटकन् तें पान त्यांच्या हातातून हिसकून घेतलें आणि पाढराशुभ्र वेलदोडा उशाला घेऊन त्यावर झोपीं गेलो.

पण माझा खरा करारीपणा आणि चातुर्य दिसून आलें असेल तर तें मी चिमणीवर फिर्याद केली तेव्हां. ही चिमणी माझ्या हॅटमध्यें घरटें बांधीत होती. माझी हॅट मीं फक्त पावसाळ्यांत वापरतों. इतर वेळीं मी ती खुंटीला टांगून ठेवतो—मी म्हणजे माझी बायको.

एक दिवस एक चिमणी तोंडांत गवताची काडी घेऊन आत आली. दारावर बसून तिनें एकदां माझ्याकडे पाहिलें. मग रेडिओवर बसून तिनें हॅटकडे पाहिलें.

तिच्या हालचाली संशयास्पद असल्याकारणानें मीं तिच्यावर नजर ठेवली. तेवढ्यांत सरळ ती माझ्या हॅटमध्यें शिरली आणि तिथें तिनें ती काडी ठेवली. मग ती कौतुकानें हॅटकडे पहात खिडकीच्या दारावर बसली.

मीं ओरडून तिला म्हटलें, "ती हॅट माझी आहे. आणि तिच्यांत गवताच्या काड्या ठेवायच्या नसून माणसाचें डोकें ठेवायचें असतें."

मी काय बोलतों तें न ऐकल्याचा बहाणा करून ती बाहेर गेली आणि गवताची आणखी एक काडी घेऊन आली. बरोबर तिनें नवऱ्यालाहि आणलें होतें.

पुनः त्यांनीं त्या दोन काड्या त्या हॅटमध्यें ठेवल्या. तसा मी तरातरा उठलों आणि त्या हॅटमधल्या काड्या बाहेर फेकून दिल्या. आणि दोन्ही हात उचलून 'हाऽऽ' केलें.

चिमणा आणि चिमणी दोघेंजण खिडकीच्या दारावर बसलीं. चिमणी चिमण्याला म्हणाली, "हीं माणसें किती आप्पलपोटीं आणि रानटी असतात, नाहीं!"

चिमणा म्हणाला, "माणसें कसलीं? कावळेच हे."

चिमणी म्हणाली, "कीं गिधाडें म्हणावें हो यांना?"

ह्या बोलण्याकडे अर्थात् मीं दुर्लक्ष केलें. आणि तीं दोघेंजणें उडून जाईपर्यंत माझ्या हॅटचें संरक्षण करीत तेथें उभा राहिलों.

माझा स्वभाव तसा साधाभोळा असल्याकारणानें नंतर पंधरा दिवस मीं माझ्या हॅटकडे पाहिलें नाहीं. नंतर एक दिवस माझे मित्र प्रा. टकले माझ्याकडे आले. त्या टांगलेल्या हॅटच्या खाली असलेल्या खुर्चीवरच मीं त्याना बसवलें. त्यांनीं हॅट काढली आणि त्यांचें टक्कल प्रसन्नतेनें चकाकलें.

आमच्या गप्पा सुरू झाल्या आणि त्या ऐन रंगांत आलेल्या असतांन प्रा. टकल्यांच्या डोक्यावर एक काडी पडली. त्यांनीं ती काडी घेऊन चावायला सुरुवात केली. माझ्या मनात मात्र एक दुष्ट शंका डोकावली.

तेवढ्यांत दुसरी एक काडी टकल्यांच्या डोक्यावर पडली. त्यांनीं ती काडी दुसऱ्या हातांत घेतली आणि मग काहीं वेळ त्यानीं गोंधळलेल्या नजरेनें तिच्याकडे पाहिलें. ते मला म्हणाले, "ह्या काडीचें काय करावें हो?"

मीं म्हटलें, "मला वाटतें, तिनें कान कोरावा."

"छट्!" प्रा. टकल्यांनीं नापसंती दर्शविली.

"तर मग ती तशीच डोक्यावर राहूं द्यावी." मीं दुसरी शक्कल सुचवली. प्रा. टकल्यांना तें पटलें. त्यांनीं ती काडी माझ्या डोक्यावर ठेवली आणि ते पुढें बोलूं लागले.

तेवढ्यांत तिसरी काडी प्रा. टकल्यांच्या डोक्यांत पडली. तेव्हां त्यांनीं डोकें हलवलें. त्यामुळें त्यांना एकदम आपल्याला घरीं जायचें आहे याची आठवण झाली. ते ताडकन् उठले. त्याबरोबर हॅटला धक्का बसला. आणि एक पांढरें शुभ्र अंडें प्रा. टकल्यांच्या डोक्यावर पडलें. तेथें क्षणभर स्थिरावलें. मला मीति वाटली कीं, प्रा. टकले तें उचलून तोडांत टाकतील. पण तेवढ्यांत त्यांनीं हॅट डोक्यावर घातली आणि लगबगीनें ते चालायला लागले.

मी त्यांच्या मागोमाग पुढें होत ओरडलों, "अहो अंडें, अंडें."

प्रा. टकले मागें वळून हसत म्हणाले, "अच्छा, अच्छा! शेक हँड!"

निराशेनें मी मागे परतलों. तेवढ्यांत चिमणी लगबगीनें हॅटच्या बाहेर पडली. मीं तिला हटकलें आणि ओरडलो, "आतांच्या आत्तां माझ्या हॅटमधून आपलें बिऱ्हाड हलव."

चिमणी चीत्कारली, "भाडेंनियंत्रण कायद्यान्वयें मला जागा खालीं करायला सांगायचा तुम्हाला मुळींच अधिकार नाही. मी मात्र प्रा. टकल्याच्या विरुद्ध माझें अंडें चोरल्याबद्दल फौजदारी खटला करणार आहें. आणि त्यांचे साथीदार म्हणून तुमचेंहि नांव त्यांत गोवणार आहें."

आणि उद्धटपणें पंख फडफडावीत ती निघून गेली.

त्यानंतर काय झालें ती हकीकत वर्तमानपत्रातून जनतेला वेळोवेळीं कळले-लीच आहे. प्रा. टकल्यांना ताबडतोब गिरफदार करण्यांत आलें आणि त्यांच्या-वरचा आरोप शाबीतहि झाला. प्रा. टकले आपलें चोरून चुंबन घेतात असें त्यांच्या पत्नीनें भर कोर्टांत सांगितल्यामुळें त्याना चोरी करायची संवय आहे ही गोष्ट पूर्णपणें सिद्ध झाली आणि त्यांचा बचाव करण्याचा मार्गच खुंटला.

मी मात्र केवळ माझ्या चलाखीनें सुटलों.

मला विचारण्यांत आलें, "प्रा. टकल्यांच्या डोक्यावरचें अंडें तुम्हीं पाहि-लेंत कीं नाहीं?"

मीं म्हटलें, "हो."

"मग त्यांना चोरी करतांना पाहून तुम्ही आरडाओरडा कसा केला नाहीं?"

मीं म्हटलें, "प्रा. टकल्यांना डोक्यावर अंडें ठेवून फिरण्याची संवय आहे. त्यामुळें मला वाटलें कीं तें अंडें त्यांचेंच असावें."

"प्रा. टकले अंडीं घालतात, असें तुम्हांला सुचवावयाचें आहे कीं काय?"

"होय. मला तसेंच निक्षून सांगायचें आहे. शिवाय प्रा. टकल्यांना कॉले-जांत उडत जाताना मीं पाहिलेलें आहे." मीं धीटपणें म्हणालों.

"मलाहि ते कधीं कधीं 'उडत जा' असें म्हणतात!" असे उद्गार काढून सौ. टकल्यांनीं माझ्या बोलण्याला पुष्टि दिली.

त्यामुळें मी निर्दोषी ठरलों. आणि प्रा. टकले ह्यांच्याकडे बघण्याचा कोर्टाचा दृष्टिकोनहि अजिबात बदलला. त्यांना तुरुंगांत टाकण्याऐवजीं न्यायाधीश महाराजांनीं

हिंदुस्थान सरकारला अशी शिफारस केली कीं, इक्वेडॉर देशातील मुलाना भेट म्हणून हत्ती पाठविण्याऐवजीं प्रा. टकल्याची तेथ रवानगी व्हावी.

त्यानुसार प्रा. टकले इक्वेडॉरला गेल्याचें वर्तमानपत्रातून प्रसिद्ध झालेलें आहेच. डोक्यावर अंडे ठेवून काढलेला प्रा. टकल्याचा फोटो 'इलस्ट्रेटेड वीकली 'मध्यें आल्याचें सर्वाना स्मरण असेल. मुंबई विद्यापीठाच्या प्राध्यापकानीं त्याना पुष्पहार घालून त्याचा सन्मान केला. त्या वेळीं झालेल्या भाषणात त्याच्या अंडीं घालण्याच्या कर्तृत्वाचा विशेष गौरव करण्यात आला. त्याचप्रमाणें ही कर्तबगारी इतके दिवस उघड न करण्यात त्याचा विनय दिसून येतो असेंहि म्हणण्यात आले. तेव्हा ते सरळ मनाचे गृहस्थ म्हणाले, "माझ्याप्रमाणेंच तुम्हा सगळ्याना देशोदेशीं पाठविण्यात येईल, अशी आशा मी व्यक्त करतो."

त्या खटल्यातून माझी सुटका झाल्यानंतर मी चिमणीवर कायदेशीर इलाज करण्याकरिता ताबडतोब वकिलांच्याकडे गेलो. त्याना एक कडक नोटिस लिहायला सागितली. मीं ती वाचली आणि म्हटलें, "वकीलसाहेब! मीं तुम्हाला कडक नोटिस लिहायला सागितलं होतं ना?"

"होय, तशीच लिहिली आहे."

"मग त्यात whereas हा कडक शब्द एकदांहि नाहीं हें कसें काय? हेच का तुमचें कायद्याचें ज्ञान?"

"चुकलो. माफ करा." वकीलसाहेब म्हणाले.

"मग whereas हा शब्द सात वेळा घालून ती पुन्हा लिहून काढा."

त्यानीं तसें केल्यावर मीं म्हटलें, "आतां पुढें असं लिहा: 'In testimony whereof is set the seal of the said university and the said chancellor'"

वकीलसाहेब म्हणाले, "अहो, पण हे डिग्रीच्या सर्टिफिकेटावर लिहायचें असतें."

"त्याच्याशीं मला कांहींहि कर्तव्य नाहीं. तें कडक आहे कीं नाहीं तें बोला" मीं मूठ आपटून म्हटलें.

"वा! कडक म्हणजे काय, भलतेंच कडक!" वकीलसाहेबांनीं कबुली दिली.

"तर मग तें अलबत् नोटिशींत घाला."

तयार झालेली नोटिस मीं चिमणीला दिली. चिमणीनें ती आपल्या घरट्यांत ठेवून तिच्यावर काड्या टाकल्या. मीं त्या अपमानास्पद वागणुकीकडे दुर्लक्ष केलें आणि नोटिशीची पावती मागितली, तेव्हा तिनें शाईच्या पॅडवर पाय ठेवून मग त्याचा ठसा एका कागदावर उमटवला आणि ती पावती मला दिली.

त्यानंतर चिमणीनें नोटिशीला उत्तर तयार करून आणलें. त्यात whereas हा शब्द अकरा वेळा वापरलेला होता. शिवाय शेवटी एक उपनिषदातलें अवतरण होतें. त्याचा अर्थ असा: "माणसाला दोन पाय असतात, दोन कान असतात आणि डोळेहि दोनच असतात."

ह्या कडक उत्तरामुळें मी मुळींच डरलो नाही. whereas ह्या शब्दानें अथपासून इतिपर्यंत भरलेली नोटीस मीं तिला दिली. नोटिशीच्या शेवटी, 'नेबुकडनेझर' व 'खतरनाक' हे अत्यंत कडक शब्द मी वापरले होते.

असें आमचें भाडण खूपच रंगलें. एक दिवस मीं माझ्या मुलाला कावळ्याचिमणीची गोष्ट सांगत होतो: "कावळ्याचें घर होतें शेणाचें आणि चिमणीचें घर होतें मेणाचें—"

तेवढ्यांत चिमणी तिथें येऊन म्हणाली, "नाहीं रे मुला. चिमणीचें घर मुळींच मेणाचें नसतें. तें असतें गवताच्या काड्यांचें आणि कापसाचें."

आणि तिनें स्वतःचें घर त्याला दाखवून त्याच्या मनांतला माझ्याविषयींचा आदर नाहींसा करून टाकला.

ह्या गोष्टीचा सूड म्हणून '...तिचे (चिमणीचे) वाटीएवढाले डोळे' अशी ओळ असलेला अभंग पुन्हा पुन्हा मी रेडिओवर ऐकूं लागलों.

चिमणी ह्या गोष्टीचा निषेध करायची, चिवचिवाट करायची. पण मी पुन्हा पुन्हा तो अभग लावायचों. रेडिओवर लागत नसला तर ग्रामोफोनवर लावायचो. मला वाटतें कीं तुकारामबोवांच्या पागोट्यातहि चिमणीनें घरटें बांधलें असावें. आणि त्याच वेळीं त्यांना हा अभंग सुचला असावा.

असो. अखेर माझ्या रेडिओवर ठेवलेल्या लाकडी हत्तीनें आम्हां दोघांत समझोता घडवून आणला. त्याद्वारें असें ठरलें कीं, चिमणीचीं पिलें मोठीं होई-

पर्यंत तिला माझ्या ह्टमध्यें वास्तव्य करून रहाण्याचा अधिकार असावा. त्यानंतर मात्र तिनें शेजारच्या अरविंदाच्या ह्टमध्यें घरटें बांधावें. दोन्ही पक्षांनीं आपापले कडक शब्द मागें घ्यावे.

ह्या झगड्यांत आलेल्या यशामुळें माझा आत्मविश्वास बराच वाढला. एक दिवस सगळ्या गणिताच्या पुस्तकातील दशांश अपूर्णांक मीं पळवून आणले. आणि मुलानें विचारलेल्या गणितातल्या शकाचें समाधान न करता येण्याच्या नामुष्कीच्या प्रसंगांतून सर्व आईबापाना वाचवलें. एका सुप्रसिद्ध भावगीतगायकाचें गाणें बाटलीत भरून तें एरडेल म्हणून विकण्याचा उपक्रम मीं साधारणतः त्या वेळींच सुरु केला. नंतर पौर्णिमेच्या दिवशीं मीं चद्राला गोळी घालून खाली पाडले आणि एका सिनेमा कंपनीला भाड्यानें दिलें. अलीकडे चादणें पडत नाहीं तें त्यामुळेंच. खगोलशास्त्रज्ञ ह्या बाबतीत खूपच चर्चा करीत आहेत हें मला माहीत आहे. पण माझा त्या गोष्टीला इलाज नव्हता. सिनेमांतले खोटे चंद्र पाहून मी अगदीं वैतागून गेलों होतो. मात्र खगोलशास्त्रज्ञाना तात्पुरता जर चंद्र हवा असला तर तो देण्याची व्यवस्था करता येईल. उत्तराकरिता तिकिटें पाठवून पत्रव्यवहार करावा. व्यवहार जमल्यास चद्र व्ही. पी. नें पाठविण्यात येईल. मधुचंद्राकरितादेखील चंद्र देण्यात येईल. मात्र मध ज्याचा त्यानें स्वतः आणावा.

ह्या सगळ्या गोष्टी मीं करीत असतांना आतरराष्ट्रीय राजकारणाकडे मात्र माझें लक्ष वेधलें नव्हतें. पण परवां मीं दाढीचीं पातीं आणायला गेलों असतांना अचानक त्या प्रश्नात मी गुरफटला गेलों.

दुकानदाराकडून मीं एक पातें घेतलें आणि त्याला एक आणा देऊं केला. तेव्हा दुकानदार म्हणतो, "नाहीं साहेब! दीड आणा द्यावा लागेल तुम्हांला."

"मग तुम्हांला पण मला आणखी अर्धें पातें द्यावें लागेल." मीं चाणाक्षपणें म्हटलें.

"तसें नव्हे. पात्यांच्या किमती वाढल्या आहेत." दुकानदारानें स्पष्टीकरण केलें.

"कां म्हणून?" आवाज चढवला.

"कोरियांतील युद्धामुळें."

"म्हणजे कोरियांत अमेरिकन व चिनी सैनिक समोरसमोर बसून परस्पराच्या दाढ्या तासत असतात असें तुम्हाला म्हणायचें आहे कीं काय?" मीं त्याचेंच म्हणणें त्यालाच स्पष्ट करून सागितलें.

"नाही साहेब. ते बंदुकानीं लढाया करीत असतात."

"होय ना? मग मूर्ख माणसा, ते सैनिक परस्परांच्या दाढ्या करतात असें तूं कां म्हटलेंस? जनतेच्या मनांत विनाकारण गोंधळ व भीति निर्माण केल्याबद्दल तुला ताबडतोब अटक केली पाहिजे." मीं त्या माणसाला चागलाच चमकावला.

नतर मीं तडक स्टॅलिनला भेटायला गेलो. स्टॅलिन आपले ॲटम बॉंब मोजीत बसला होता, आणि मांजरानें एक ॲटम बॉंब खाल्ल्यामुळें त्याच्याशी भांडत होता.

मी ताडकन् पुढें झालों आणि स्टॅलिनच्या तोंडातला पाइप ओढून घेतला. स्टॅलिन चपापला.

मीं म्हटलें, "स्टॅलिन! काय चावटपणा मांडला आहेस तूं आजकाल? ॲटम बॉंब कसले बनवतोस!"

स्टॅलिन म्हणाला, "मला ॲटम बॉंब आवडतात. त्याचा खूप मोटा आवाज होतो."

"पण त्यामुळें दाढीचीं पातीं महाग होतात त्याचं काय?" मीं भेदक प्रश्न टाकला.

स्टॅलिन आश्चर्यानें म्हणाला, "महाग कशीं होतात बुवा? माझ्या पंचवार्षिक योजनेप्रमाणें तर—"

मीं त्वेषानें म्हटलें, "वेड्या माणसा! पांच वर्षांनंतर मीं दाढी करावी असं तुझं म्हणणें आहे कीं काय?"

"नाहीं. नाहीं." स्टॅलिन चांचरत म्हणाला.

"नाहीं कसं? होय. आणि तें मला बिलकूल मान्य नाहीं." मीं असें म्हटल्यानंतर स्टॅलिनचें बोलणें खुंटलें. तो एक ॲटम बॉंब झेलत गप्प उभा राहिला.

तेव्हां मीं पुन्हा म्हटलें, "आण ते सगळे ॲटम बॉंब इकडे. मी ते जप्त करणार आहें. आणि हें पहा, ॲटम बॉंबचें उत्पादन बंद."

मग मीं स्टॅलिनजवळचे एकुणपन्नास ॲटम बॉंब खाणारें तें मांजर घेऊन जो निघालो तो थेट व्हाइटहाऊसमध्यें जाऊन थडकलो. प्रेसिडेंटसाहेबाचा चष्मा काढून घेत मीं म्हटलें,

"का हो हरिभाऊ सोमण?"

"नाहीं —हॅरी ट्रुमन."

"नव्हे, हरिभाऊ सोमणच. असें नसते तर तुम्ही मराठींत हो कसें बोललां असतां?" मीं तल्लखपणानें उत्तर दिलें.

त्यामुळें प्रेसिडेंटसाहेब निरुत्तर झाले. आणि मग त्याच्याजवळचे दोनशें ॲटम बॉंब हस्तगत करायला मला मुळींच वेळ लागला नाहीं.

ॲटम बॉंबचें गुपित हें असें आहे. सगळे ॲटम बॉंब आज माझ्याजवळ आहेत. त्यामुळेंच तर जागतिक युद्धाला सुरुवात होऊं शकत नाहीं. आणि कोरियात शस्त्रसंधीच्या वाटाघाटी चालल्या आहेत त्या ह्यामुळेंच.

ह्या दिवाळींत आमच्या वाडींत मात्र खूप गमत येणार आहे. कारण ॲटम बॉंबचा कोट मी त्या वेळीं उडविणार आहें. मात्र प्रश्न इतकाच आहे कीं, त्या मांजराच्या पोटातला ॲटम बॉंब कसा उडवायचा!

* * *

# राजा आणि बादशहा ८

समुद्रकिनारीं कालवें लागलेल्या खडकावर बादशहा बसला होता. त्याच्या एका हातांत चित्रवही होती. दुसऱ्या हाताची किरंगळी तो चावत होता आणि त्याची नजर एका कोळणीच्या फिगरकडे लागली होती. ती टसटशीत 'फिगर' त्यानें आपल्या चित्रवहींत पुसटपणें काढली होती, पण त्यामुळें त्याचें समाधान झालें नव्हतें. त्या 'फिगर'चे काही भाग अनावृत असावे अशी त्याची मागणी होती. पण तिच्या टसटशीतपणामुळें कीं काय, ती मागणी मिळ-मिळीतच राहिली होती.

बादशहा टेंगू आणि किडकिडीत होता. त्याच्या आणि मेंढीच्या चेहेऱ्यांत बरेंचसें साम्य होतें. त्याचे केस देखील उसकटलेल्या लोकरीसारखे होते आणि तो जेव्हां त्यांना तेलानें चबचबीत करून नीट बसवीत असे, तेव्हां मेंढीच्या डोक्यावर कोणी पाणी ओतल्यामुळें ती भेदरली आहे असें वाटत असे अर्थात् आपल्या मनानें बादशहा बरीच कलाकुसर आणि नोकझोक करीत असे चेहेऱ्यावर पुरुषी उग्रपणा दिसावा म्हणून त्याच्या केसांचे काट अर्ध्या गाला-पर्यंत खाली उतरले होते आणि तोंडाच्या द्वारावर मिशीची कमानदार रेघ रेखली होती. पिस्तूल झाडणारे आणि घोडे उधळणारे अमेरिकन चित्रपटांतले नायक घालतात तसलें कातडी जाकीट त्यानें घातलें होतें. तें घालून, छाती पुढें काढून आणि मान ताठ करून तो चालायचा त्या वेळीं असें वाटायचें कीं याला गोणत्यांत कोंबून कोणी तरी याची मान करकचून आवळली आहे. त्यानें

घातलेली विजार मूळची हिरवी मखमली असली तरी आतां उसवलेल्या गादीसारखी दिसत होती.

बादशहा बराच वेळ किरंगळी चावीत बसला होता, इतक्यांत त्याच्या पृष्ठभागावर लाटेचा फटकारा बसला आणि तो शुद्धीवर आला. त्यानें पाहिलं तों भरतीच्या पाण्यानें त्याचा खडक वेढला होता. असले प्रसंग कांहीं बादशहाला नवीन नव्हते. आगगाडींतून जातांना आपण कुठून व कां निघालों आणि कुठें जात आहो, याचा खुलासा कोणाकडून तरी करून घेणें त्याला अवश्य वाटत असे. बादशहानें गोंधळून इकडे तिकडे पाहिलें आणि मग नृत्याचे कांहीं अवघड पवित्रे टाकून त्याला किनारा गाठावा लागला. किनारा गाठल्यावर त्याला सुचलें कीं विजार दुमडली असती तर भिजली नसती.

तेवढ्यांत त्याच्या ध्यानांत आलें कीं राजानें व त्यानें त्या दिवशीं एकमेकांना भेटायचें ठरवलें होतें. कुठच्या तरी स्टेशनवरील घड्याळाखालीं त्यांची भेट व्हायची होती. नक्की स्टेशन कुठचें तें मात्र बादशहाला आठवत नव्हतें. पण बादशहाला ह्या गोष्टीचें फारसें महत्त्व वाटलें नाहीं. त्याचा दृष्टिकोनच भिन्न होता. कुठच्या तरी स्टेशनवर घड्याळाखाली भेटायचें हें आठवलें ह्यांतच त्याला समाधान वाटत होतें. निर्विकारपणें तो जवळच्याच स्टेशनवर जाऊन घड्याळाखाली उभा राहिला आणि किरंगळी चावीत निरीक्षण करूं लागला. तेवढ्यांत त्याला एक सुंदर 'फिगर' दिसली. तिच्या मागोमाग तो गाडींत शिरला. नीट निरीक्षण केल्यावर तिच्या पातळाच्या रंगाची स्ट्रेंग्थ त्याला पसंत पडली नाहीं. त्यामुळें तो पुढील स्टेशनवर उतरला आणि पुन्हा घड्याळाखालीं उभा राहिला. बराच वेळ तिथें उभे राहून संध्याकाळ रागावलेल्या बेडकीसारखी दिसते आहे कीं काय याचा त्यानें विचार केला.

नंतर दुसऱ्या एका 'फिगर'च्या मागोमाग तो बाहेर पडणार इतक्यांत राजा कुठून तरी आला आणि त्यानें बादशहाची कॉलर पकडली.

राजा उंच आणि धिप्पाड होता. एखाद्या षट्कोनांत भुंवयांचे दोन त्रिकोण काढले, डोळ्यांच्या ठिकाणीं कलिंगडाच्या बिया ठेवल्या, नाकाच्या ठिकाणीं जरा चाकूच्या टोकानें खरडलें आणि त्याखाली एक करंजी काढली, तर तो षट्कोन जसा दिसेल तसा त्याचा चेहरा होता. त्यानें अंगांत काळ्या पट्टयाचा

शर्ट घातला होता, आणि तांबुस सोनेरी रगाची विजार घातली होती. त्याच्या बुटांचीं नाकें कापलेली होतीं. कलिंगड खाऊन पाढऱ्या रुमालाला हात पुसले तर तो जसा दिसेल तशा रगाचा रुमाल त्याच्या हातांत होता. त्या अत्यंत दुर्लभ रगाचा रुमाल आपल्याला मिळाला ह्यावर राजा फार खूष होता.

बादशहाचा स्वभाव राजाला माहीत होता, म्हणून त्यानें चर्चगेट ते वांद्रा तिकीट काढलें होते आणि दर स्टेशनवर उडी मारून उतरून घड्याळाखालीं पहायचें आणि मग परत धक्काबुक्की करून गाडींत चढायचें असा उपक्रम त्यानें केला होता. त्यामुळें बऱ्याच लोकाचे पाय चिरडले असले तरी त्याला बादशहा सापडला होता. बादशहाला भेटायला त्या दिवशीं तो विशेष उत्सुक होता. कारण आपली नवी विजार त्याला बादशहाला दाखवायची होती.

बादशहानें एकवार राजाकडे पाहिलें आणि आणि मग संतप्त नजरेनें त्याला ढकलून दिलें. तो ओरडला, 'चालता हो. माझ्या डोळ्यासमोर येऊ नकोस. ह्या विजारीवर ह्या रंगाचा शर्ट कसा घातलास तू? एखाद्या पठाणाला देखील ह्यापेक्षां अधिक रंगदृष्टि असते.' बादशहानें मान फिरवली.

राजाला धक्काच बसला. एक नवीन प्रकारची रंगसंगति आपण जमवली ह्या आनदांत तो होता आणि बादशहानें त्याला सरळ जंगली म्हटलें होतें.

तो ओरडला, 'काय म्हणतोस? ह्या विजारीवर हा रंग शोभत नाहीं? साल्या, हें कॉंबिनेशन समजायची तुला अक्कल नाहीं. पाहिजे तर आपण उद्यां आर्ट मास्तरना विचारूं आणि हें कॉंबिनेशन नापसंत केलें तर हा शर्ट आणि विजार फाडून फेकून देईन.' त्यानें शर्टचीं बटणें हिसक्यासरशीं सोडलीं.

बादशहा लाल झाला आणि आपलें बोट राजाच्या नाकासमोर हलवीत ओरडला, 'आर्टमास्तरनीं हें कॉंबिनेशन पसंत केलें तर—तर मी त्यांना मूर्ख समजेन. आर्ट स्कूल सोडून देईन.'

ह्या वेळेपर्यंत दोघे इतके तापले होते कीं, एकमेकांच्या नाकांसमोर बोटें हलवण्यापलीकडे दुसरें काहींच करणें त्यांना शक्य नव्हतें. अखेर बादशहानें वैतागानें मान फिरवली आणि तो दुसरीकडे पाहूं लागला. त्यामुळें राजा भडकला आणि त्याला दिसावें म्हणून त्याच्या भोवतीं उड्या मारीत नाचूं लागला.

बादशहा ओरडला, "बघ राजा, मी टोसा मारीन."

राजा विजयोन्मादानें ओरडला, ‘पण ठोसा मारायला तरी माझ्याकडे पहाशील कीं नाहीं?’

स्टेशनवरचे सर्व लोक स्तंभित होऊन या प्रकाराकडे पहात राहिले. अखेर एक जबाबदार मनोवृत्तीचा भय्या पुढे आला आणि दुधाचा हंडा त्याच्यासमोर हलवीत त्यानें त्याना अहिंसेचा संदेश दिला. त्याबरोबर त्या दोघानीं त्याचें बकोट धरून त्याला आपली बाजू समजावून सांगायला सुरुवात केली. तो भय्या बापडा गांगरला. त्याच्या हातातला दुधाचा हंडा गळून पडला आणि तो पळून जाण्याचा प्रयत्न करूं लागला. पण हे त्याला सोडीत ना. ह्यामुळें अधिकच गोंधळ माजला. स्टेशनवरचा शिपाई दंडा आपटून आपण आता काही तरी भयंकर करणार अशा आविर्भावानें सावकाश पुढें सरकला.

इतक्यांत स्टेशनवरची एक माजलेली गाय त्या दोघाच्या मधून धावत गेली आणि त्याचें भांडण मिटलें. ‘तुला काहीं समजत नाहीं’ असे त्या भय्याला दरडावून सांगून ते दोघे मार्गाला लागले.

‘बरें का बादशहा, मला एक कल्पना सुचली आहे.’ राजा आपल्या कलिंगडी रंगाच्या रुमालाचा उंदीर बनवीत म्हणाला.

बादशहानें मान हलवली.

‘मी म्हणतो कीं आपली भाषा फार पुळपुळीत असते.’ राजाचें लक्ष बादशहा बघत असलेल्या फिगरकडे गेलें. बादशहा म्हणाला, ‘पदराची ‘स्ट्रेंग्थ’ चांगली आहे, हं ऽ आपल्या बोलण्यात ‘कलर’ नसतो.’

‘म्हणून आपण निरनिराळ्या रंगाचे दिवे घेऊन हिंडावें आणि बोलतांना योग्य तो दिवा लावावा.’

‘मी म्हणतो बोलूच नये. चित्र काढून सांगावें काय सांगायचें तें.’

‘त्याला फार वेळ लागेल. त्यापेक्षां सारंगी वाजवून प्रत्येकानें आपल्या मनांतले विचार सांगावे.’

‘पण भांडण करायचें म्हणजे मृदंग पाहिजे.’

‘छे, हें फार कठीण जाईल बुवा. त्यापेक्षां आपण निदान रंगीबेरंगी शब्द तरी वापरावे. ‘मशारनिल्हे’ हा शब्द आपण वापरावा. ह्या शब्दाचा रंग

गडद निळा आहे आणि त्यात सोनेरी झांक आहे.'

'मला वाटतें—'

ह्या विषयावर आणखी बराच वेळ त्यानीं महत्वपूर्ण चर्चा केली असती. पण तेवढ्यांत त्यांनीं एक दिव्यांची जाहिरात पाहिली आणि दोघेहि चुकचुकले.

'काय भिक्कार जाहिरात केली आहे लेकानं!' बादशहा.

'खरोखर मुंबईचें सौंदर्य हे लोक घालवून टाकणार आहेत.' राजा.

'उदबत्त्यांनीं ह्यांच्या जिभांना डाग दिले पाहिजेत.' उद्वेगाच्या भरांत बादशहाला सुंदर कल्पना सुचली.

'नाहीं, त्यांच्या कानाच्या टोकांवर टिचक्या मारल्या पाहिजेत.' राजा अधिकच उत्साहानें म्हणाला आणि त्यानें बादशहावर तसा प्रयोगहि केला.

'मी म्हणतों, राजा, त्याच्या कानाला नेहमीं गुडद्या बसल्या पाहिजेत आणि त्यांच्या दाढा नेहमीं दुखत राहिल्या पाहिजेत.'

'आणि मी म्हणतो बादशहा, त्याना खूप गोड गोड खायला दिलें पाहिजे आणि मग त्याना मुळीं प्यायला पाणीच देता कामा नये.'

राजा-बादशहांनीं आपल्या कल्पनेनें एक तुरुंग निर्माण केला आणि त्यात निरनिराळ्या लोकांना क्रूर पण सुंदर शिक्षा दिल्या आणि जिथें त्यांचें विव्हळणें ऐकूं येणार नाही पण जिथून त्या शिक्षा दिलेल्या दिसतील अशा ठिकाणीं ते हसत उभे राहिले.

ह्या कल्पनेशीं थोडा वेळ खेळण्याचा चाळा झाला. मग दुसऱ्या कल्पना सुचल्या आणि एका बोटावर काठी नाचवावी तशा त्यांनीं त्या नाचवल्या. इतक्यांत त्यांना एक छोटेंसें टुमदार घर दिसलें.

राजा म्हणाला, 'आपल्याला पन्नास हजार रुपये मिळाल्यावर आपण हें घर घ्यावें का रे बादशहा?'

बादशहानें लक्षपूर्वक त्या घराकडे पाहिलें. मग तो मान हलवून म्हणाला, 'छे बुवा! हें घर फार नवें आणि छाकटें आहे. आपल्याला घर पाहिजे तं जुनें अनुभवी पाहिजे.'

राजानें लगेच कल्पना उचलली, 'हो ना. जुन्या माणसांसारखे ऐसपैस, प्रेमळ.'

'त्याला छप्पर कौलांचें पाहिजे आणि पावसाळ्यांत त्यावर शेवाळ धरली पाहिजे.'

'आणि बरे का बादशहा, थोडें वाकडें तिकडेंच पाहिजे तें घर. फार रेखीव असता कामा नये.'

'आणि हें पहा राजा, त्याच्याभोवतालचें कुंपण मोडकळीला आलेलें असलें पाहिजे. घराभोवतीं गवत आणि फुलझाडें जरा अस्ताव्यस्तपणेंच वाढलीं पाहिजेत आणि जर एक भोपळ्याचा वेल घरावर चढला तर फारच उत्तम होईल बुवा.'

'खरें सांगूं बादशहा, ही घराची कल्पना आपल्याला पसत नाहीं. प्रचंड आणि राजेशाही घर पाहिजे आपल्याला. नुसती मन थक्क करणारी कलाकृति, डोळे दिपविणारें वैभव.'

'पण आपल्या पन्नास हजार रुपयात तें बसत नाहीं ना? मग काय उपयोग त्याचा विचार करून.'

'तीच तर लेकाची अडचण आहे.' राजा दुःखी लाब चेहेरा करण्याचा प्रयत्न करीत म्हणाला.

त्या दोघांनीं ठरवलें होतें कीं शब्दकोडीं सोडवून आपण पन्नास हजार रुपये मिळवायचे. आणि ते आपल्या हातात आले आहेत अशाच भावनेनं दोघाच्या कल्पना चालत असत. अगदीं काटेकोरपणें पन्नास हजार रुपयात ते आपला सर्व खर्च बसवीत असत. कधीकधी काय विकत घ्यायचें ह्या विषयावर त्या दोघांची कडाक्याचीं भांडणें होत असत आणि मग आठ आठ दिवस ते परस्पराशीं बोलत देखील नसत.

एवढ्या मोठ्या प्रमाणावर खरेदी करण्याच्या गोष्टी केल्यावर खरोखरच कांहीं खरेदी करावी असें त्याना वाटूं लागलें. त्यानीं चार आण्यांच्या भाजलेल्या भुईमुगाच्या कवळ्या शेंगा विकत घेतल्या आणि त्याच्या चवदारपणाची स्तुति करीत त्या खाल्ल्या. नंतर त्यानीं पाणी पिण्याकरिता एक नक्षीदार ग्लास घेण्याचें ठरवलें. विलक्षण उत्साहानें त्यानीं सबंध बाजार पालथा घातला. अनेक दुकानदारांना शिड्या लावून माळ्यावर पाठवले. कित्येकांना वस्तूंच्या रचलेल्या उतरंडी मोडायला लावल्या. काहीना नफेबाजी न करण्याचा सल्ला

दिला. तर अनेकांना कलादृष्टि नसल्याचें स्पष्टपणें सांगितलें. कधीं आकार पसंत नाही, कधीं रंगाची छटा पाहून छट् म्हणायचें, कधीं वरचें नक्षीकाम पाहून हाय खायची, असा प्रकार बराच वेळ चालल्यावर अखेर त्याना हवा तसा ग्लास मिळाला.

विलक्षण खुषींत दोघे वाट चालूं लागले. आपल्या ओळखीच्या लोकांपैकीं किती थोड्या लोकांची इतक्या सुंदर ग्लासामधून पाणी पिण्याची योग्यता आहे ह्याचा त्यांनीं उहापोह केला आणि त्या ग्लासशी जुळणाऱ्या रंगाचे ओठ कोणाचे आहेत तें पहात पहात ते पुढें चालत राहिले.

थोड्या वेळानें राजाला बादशहाविषयींच्या आपल्या जबाबदारीची आठवण झाली. राजा बादशहाचा पालक होता. बादशहानें सकाळपासून संध्याकाळपर्यंत काय करायचें हें राजा आखून देत असे आणि त्यानुसार बादशहा वागला कीं नाहीं हें संध्याकाळीं ताडून पहात असे. राजानें बादशहाचें बकोट पकडलें आणि त्याला थाबवून तो म्हणाला, 'बादशहा, मीं तुला सकाळीं एक रुपया दिला होता, त्याचें काय केलेंस?'

बादशहाचा चेहेरा घाबरून आणि भांबावून गेला. पैशाचा प्रश्न काढला म्हणजे तो नेहमींच असा कावराबावरा होत असे. आपली ही स्थिति लपविण्याकरितां तो भांडखोरपणानें म्हणाला, 'कसला रुपया? मला नाहीं माहीत.'

राजा समजुतीच्या स्वरानें म्हणाला, 'असें काय करतोस बादशहा. अरे, सकाळीं तूं टुवालच गुंडाळून बाहेर पडत होतास तेव्हां नाहीं का मीं तुला विजार घालायची आठवण केली? आणि मग विजारीच्या खिशांत ठेवायला एक रुपयाची नोट नाही का दिली?'

'मग? दिली असशील! पण ती सकाळीं दिली होतीस त्याचें आतां काय!' बादशहा गुरगुरला.

'त्या रुपयाचें तूं काय केलेंस?' राजानें निष्ठुरपणें उलटतपासणी चालू ठेवली.

बादशहा आतां मात्र खराखुरा घाबरला. त्यानें विजारीच्या खिशांत हात घालून पाहिला. शर्टाचा छातीवरचा खिसा चाचपला आणि मग केविलवाण्या

मुद्रेनें म्हणाला, 'राजा! माझ्या खिशांत तो रुपया नाहीं.'

'मग काय झालें त्याचें? तूं त्या रुपयाचें काही घेऊन खाल्लेंस का?'

'नाही राजा! मी सकाळपासून कांहींच खाल्लें नाही, मला आतां भूक लागली. चल आपण खाऊं या.'

'पण आधीं रुपयाचें काय केलेंस तें सांग मला. बस-कंडक्टरला दिलास कीं काय?'

'बस-कंडक्टरला नाही दिला. पऽण त्याला देण्याकरिता हातांत काढला होता...हूऽ! आता आठवलं राजा.' बादशहानें टाळी वाजवली.

'काय?'

'मीं बसमधे ती नोट हातात धरली होती. मग विचाराच्या भरांत मीं तिचे फाडून तुकडे केले. मग ते सगळे तुकडे तोंडात घालून त्याची गोळी बनवली आणि एक सुन्दर कल्पना सुचली तेव्हां ती बाहेर थुंकून टाकली.' सगळा व्यवस्थित उलगडा झाला ह्याचाच बादशहाला विलक्षण आनंद झाला.

राजा हतबुद्धपणें त्याच्याकडे पहातच राहिला. पैशाची किंमत बादशहाला समजत नाहीं याचें त्याला वाईट वाटलें आणि बादशहाला त्याबद्दल काहींच वाटत नाही याचें त्याला अधिकच आश्चर्य वाटलें.

इतक्यात रेशमी सूट घातलेला आणि पाइप ओढणारा एक ऐटबाज गृहस्थ त्याच्यासमोर येऊन उभा राहिला आणि सफाईदार इंग्रजींत बोलूं लागला. 'दोन तरुण माणसे; एक आनंदात दुसरा चिंतेंत; एकाचें भाग्य लवकरच उदयास येणार. दुसऱ्याला थोडे दिवस वाईटच जाणार. बघू, इकडे तोंड करा जरा. तुम्ही आहात स्वभावानें थोडे दिलदार. कांहीं वाईट नाहीं तें; पण जपून रहा हं या जगांत. हें जग फार वाईट आहे. दुसरा दिसतो साधा—पण आहे खरोखर मोठा व्यवहारचतुर. वा! छान! दोघाचीं मैत्री जमली हें फारच छान झालं. वा! खूपच छान—!'

राजा आणि बादशहा दोघे तो वक्तृत्वाचा ओघ पाहून चकितच झाले आणि त्याच्या गोड वाणीनें मोहित झाले. प्रत्येकाला वाटलें कीं आपण साधे दिसत असलों तरी मोठे धूर्त आहोंत. अनेक गंभीर काळज्या मागें लागल्या असल्या

तरी आपण आपला चेहरा आनंदी ठेवतों. लवकरच आपला भाग्योदय होणार आहे आणि आपण त्या वेळीं संकटांत सापडलेल्या आपल्या मित्राला मदत करूं.

दोघेही आदरानें त्या माणसाकडे पाहूं लागले, तो म्हणाला, 'मी हझमपाशा, प्रख्यात इजिप्शिअन ज्योतिषी. काय ? माझें नाव तुम्हीं ऐकलें नाही ? रोम ! हिंदुस्थानातल्या सगळ्या राजेरजवाड्यानी मला खास बोलावून, माझ्याकडून ज्योतिष सागून घेतलें. नशीब तुमचें कीं मला तुमच्यात इटरेस्ट वाटलें; तुमचे चेहरे ! वा ! अगदीं निराळे. अख्या हिंदुस्थानात मला असे चेहरे आढळले नाहींत. नाहीं म्हणायला एक आढळला—तिबेटच्या लामाचा ! हात बघूं, वा ! मला ह्याचा 'स्टडी' केलाच पाहिजे. चला हॉटेलमध्यें. तिथें बसूनच सागतों सगळें तुम्हाला. पण मी फुकट कधीं काहीं सागत नाहीं. तशी शपथ घेतली आहे गुरूजवळ. म्हणून तुमच्याकडून नावाला पाच रुपये घेतो.'

राजा आणि बादशहा दोघे तोंड वासून त्याच्याकडे पहात राहिले. राजाचा षट्कोनी चेहरा वर्तुळाकार झाला. बादशहाचा मेंढीसारखा चेहरा, खाटीक-खान्यांतल्या मेंढीसारखा झाला. दोघानीं एकमेकाकडे पाहिलें आणि परत त्या ज्योतिष्याकडे पाहिलें !

तेवढ्यांत ज्योतिष्यानें राजाच्या गालावर चापट मारून म्हटलें, 'ह. काय चेहरा आहे, 'कॅरॅक्टर' आहे.!'

राजानें मंत्रमुग्धाप्रमाणें खिशात हात घातला. तेवढ्यांत ज्योतिष्यानें राजाचें पाकीट आपल्या खिशांतून काढून त्याच्या हातात दिलें आणि खदखदा हसूं लागला.

राजाचा वर्तुळाकार झालेला चेहरा आतां लंबवर्तुळाकार झाला. बादशहाचा चेहरा मरून पडलेल्या मेंढीसारखा झाला.

ज्योतिषी फटकन् सिगरेटची पेटी काढून त्यांच्यापुढें धरीत म्हणाला, 'मला सगळें कांही येतें. हातचलाखी, मंत्रविद्या, भूतभुताटकी, मानसशास्त्र, मोहिनी-विद्या, सबकुछ...काय ? नाहीं ओढत ? अच्छा,—म्हणून त्यानें स्वतःच एक सिगरेट् शिलगवली.

त्यानें पेटवलेल्या काडीची लाल-निळी-पिवळी ज्वाला राजाच्या नजरेसमोर तरळली आणि आणि त्यानें पांच रुपये काढून त्या ज्योतिष्याच्या हातावर ठेवले.

मग ते सगळे हॉटेलांत गेले आणि त्या ज्योतिष्यानें राजाच्या जीवनांत पुढें घडून येणाऱ्या अद्‌भुत घटना सांगितल्या. विशेषतः निळ्या मोटरमधून हिंडणारी एक असामान्य सुंदर इजिप्शियन युवती राजाच्या प्रेमात पडणार होती आणि मग अनेक गूढ रोमांचकारी घटना घडणार होत्या. बिचाऱ्या बादशहाचें जीवन मात्र खडतर होतें.

राजानें हॉटेलचें साडेतीन रुपये बिल दिलें आणि ते सर्व बाहेर पडले. अखेर जाता जाता तो ज्योतिषी म्हणाला, 'अरेच्चा ! मी एक सांगायचें विसर-लोंच. तुम्ही एक नवग्रहाची आंगठी घेतलीत तर बरें होईल. त्यामुळें तुमच्या बऱ्याच अडचणी टळतील. तुम्ही विचार करा. हवी असली तर उद्या या माझ्याकडे. मी देईन तुम्हाला. तुमच्याकडून म्हणून फक्त पन्नास रुपये घेईन.'

'पन्नास ?' बादशहा उद्‌गारला.

'अरे दोस्त, राजेमहाराजाकडून ह्या आंगठीचे मीं हजार हजार रुपये घेतों. पण तुमच्यात मला 'इंट्रेस्ट' वाटलं म्हणून इतकी स्वस्त देतोय. फुकट कांहीं द्यायचें नाही अशी शपथ घेतली आहे ना ?'

आणि आपली सोनेरी कडांची परिचयपत्रिका ऐटबाजपणें त्यांच्या हातांत देऊन तो गहिऱ्या नजरेचा ज्योतिषी अदृश्य झाला.

त्या ज्योतिष्यानें निर्माण केलेल्या स्वप्नसृष्टीकडे पहात ते दोघे सत्यसृष्टींतून चाचपडत चालूं लागले. त्या तंद्रींतच ते दोघे खाणावळींत जाऊन जेवले आणि डुलत डुलत घरीं निघाले.

वाटेंत एका मवाल्यानें एका बाईची नव्हे चांगल्या फिगरची आगळीक केल्याचें राजानें पाहिलें आणि त्या मवाल्याला एका ठोशासरशीं लोळावलें. त्याबरोबर दुसरे दोन मवाली धावून आले. पण बादशहानें त्यांतल्या एकाच्या कमरेला असा विळखा घातला कीं स्वतःभोवतीं गरगरा फिरण्यापलीकडे त्याला काहीच करता येईना. राजानें एका मवाल्याचें डोकें दिव्याच्या खांबावर आदळलें आणि दुसऱ्याच्या पोटात लाथ मारली. त्या मवाल्यानीं त्यामुळें धास्ती खाल्ली आणि लांब जाऊन ते शिव्या द्यायला लागले व दगड फेकूं लागले.

पण अस्सल शिव्यांचा भरणा सुद्धां राजा-बादशहांजवळ थोडा नव्हता. त्यांनींही शिव्यांचा भडिमार केला आणि दगड फेकले. शेवटीं एका दगडानें

जेव्हां म्युनिसिपालिटीचा दिवा फुटला तेव्हां मवाली पळत सुटले.

विजयाच्या नशेंत डुलतडुलत दोघे आपल्या पाच फूट लांब व पांच फूट रुंद खोलीत येऊन पोहोचले. त्याच्या खोलीत जायचें म्हणजे एका शिडीवरून दोरीला लोंबकळत वर जावें लागत असे, आणि मग त्या खोलीचा भुईसपाट दरवाजा राजाच्या डोक्याच्या दाबानें उघडत असे. ते दोघे वर गेल्यावर उंदराच्या सापळ्याच्या दरवाज्याप्रमाणें तो दरवाजा धाडदिशीं बंद होत असे. त्या खोलीच्या गजाच्या खिडक्यांतून राजा आणि बादशहा सापळ्यात सापडलेल्या उंदराप्रमाणें दिसत असत.

वर गेल्यावर आपल्या वळकटीवर रेलून राजा बादशहाला म्हणाला, 'काय रे बादशहा! हे पन्नास रुपये खर्च केले तर त्याचा हिशेब वडलाना कसा कळवायचा?'

बादशहा म्हणाला, 'पन्नास रुपये? ते कशाला खर्च करायचे?'

राजा चवताळला, तो किंचाळला, 'अरे मूर्खा! नवग्रहाची आगठी नाही का विकत घ्यायची आहे मला.'

बादशहा म्हणाला, 'बघ बुवा. मला तर हा ज्योतिषी लुच्चा वाटतोय. त्यानें आपले पाच रुपये खाल्ले तेवढें पुष्कळ झालें.'

'लुच्चा! तोच एक जगातला शहाणा आहे. माझी खरी किंमत त्यालाच समजली. अरे बाबा! नबाब व्हायलाच मी जन्माला आलो आहें.' राजानें बिछान्यावर मुठी आपटल्या.

'अरे कसला नबाब! पांच फुटी खोलींतल्या नबाबाचें तोंड पहा.' बादशहा छद्मीपणानें म्हणाला आणि त्यानें हातपाय आपटले.

राजा बादशहाच्या छातीवर बसण्याच्या तयारीनें म्हणाला, 'बादशहा! तूं आतां हलकटपणा करतो आहेस. मी नबाब होणार म्हणून तुला वाईट वाटतें आहे.'

बादशहाच्या मनाचा तडफडाट झाला. 'तूं असें कां बोललास? माझा अपमान! आपल्या मित्राचा अपमान!' असें बोलल्यावर 'मी आता जातो. तुझ्याजवळ मला रहायचें नाहीं. मी लांब कुठं तरी वाट फुटेल तिकडे जाणार.'

असें म्हणून बादशहानें आपली वळकटी गोळा केली, बॅग भरली आणि तो बाहेर पडण्यास तयार झाला.

ताबडतोब राजानेंदेखील आपलें सामान बांधलें व बाहेर पडायच्या तयारीनें म्हणाला, ‘तूं जातोस, तर मी पण जाणार. मला पण तुझें तोंड बघायचें नाहीं. तूं जाशील त्याच्या उलट्या बाजूनें मी जाईन.’

इतका निकराचा प्रसंग निर्माण झाला असतांना एक उंदीर त्यांच्या खोलींत खुडखुडला. त्याबरोबर ते आपलें भांडण विसरले आणि उंदराला मारण्याकरितां त्यांची धावपळ सुरू झाली.

* * *

# केसांची गुंडळी ९

माझी बायको पांचव्यांदा गॅलरींत जाऊन रस्त्यावर नजर टाकून आली. मैत्रीण यायची म्हणून ही लगबग! त्या लगबगीचें हसूं येण्याइतक्या प्रसन्न मनःस्थितींत मी नव्हतों. संकटाच्या चाहुलीमुळें माझें मन कावरेंबावरें झालें होतें. पण लग्नापूर्वी भोळीभाबडी असलेली माझी बायको आता पक्की संशयी झाली होती. आपलें तोंड माझ्याकडे न वळवता लाइटहाउसच्या फिरत्या प्रकाशझोतासारखा तिनें माझ्याकडे दृष्टिक्षेप टाकला. मग ती म्हणाली, "हसायला काय झालें?"

"कांहीं नाहीं. मी कुठें हसलों?" ह्या वेळीं चेहरा कसा करावा ह्याबद्दल मी जरा गोंधळातच पडलो होतों. कारण जितका मी भोळसट आणि प्रामाणिक चेहरा करतो तितका तिला माझा अधिक संशय येतो.

"मीं कांहीं सुधा आली कीं नाहीं तें पहायला गेलें नव्हतें गॅलरींत. मला वाटलें कीं भाजीवाला आला."

तिचें म्हणणें पटलें असा भाव मीं चेहऱ्यावर आणला. पण त्यामुळें ती खवळून म्हणाली, "आणि काय झालें हो मैत्रिणीची घाई लागली तर?"

तिच्या वाक्याच्या व्याकरणशुद्धतेविषयीं शंका न घेण्याचा मीं दृढ निश्चय केला. पण तिच्या नजरेंतल्या क्ष किरणांनीं सारें ओळखलें आणि ती ओरडली, "असूं दे माझें व्याकरण वाईट. मग कशाला लग्न केलेंत माझ्याशीं?"

व्याकरण आणि लग्न ह्यांचा काय संबंध?—जाऊं दे झालं. मग मीं प्रेमानें

हलुवार स्वरांत म्हटलें. "प्रिये, अशी रागावूं नकोस."

"मला प्रिये म्हणूं नका हं. मी सांगून ठेवत्यें."

माझ्या वागणुकींत पुरेसा प्रेमळपणा नसतो अशी बायकोची तक्रार असल्या-मुळें मीं नाटक-कादंबऱ्यांतले कांही शब्द व उपमा बोलतांना वापरतो. हें सारें कृत्रिम आहे हे बायकोला समजत असलें, व तें आपल्याला आवडत नाहीं असें जरी ती म्हणत असली, तरी मी तसें बोललों म्हणजे ती मनांतल्या मनांत खूप होते. जाणून बुजून आपल्या सोयीनुसार आभास व असत्य ह्याचा स्वीकार करण्याची व त्यात सुख मानायची स्त्रियाची नेहमींच तयारी असते.

मग ती लाडिकपणें म्हणाली, "अशी काय गडे तुम्ही माझी नेहमीं थट्टा करता?"

मग मींहि भावनावश होऊन तिचा हात हातात घेतला. ती उठून माझ्या खुर्चीच्या हातावर बसली, तिनें माझ्या गळ्याभोवतीं हात घातला. मीं तिच्या पदराच्या टोकाचीं सुते ओढूं लागलो.

खुर्चीच्या हातावर इतका वेळ बसलें तर तो मोडेल हा क्षुद्र विचार मनांतून मीं झटकून टाकला. आणि मग खुर्चीचा हात मोडल्यावर बायको कशी पडेल ह्याची कल्पना मी करूं लागलो. तेवढ्यांत बायकोनें आपल्या पदराचा शेव माझ्या हातातून हिसकावून घेतला. मीहि मग माझ्या अवघडलेल्या मानेसभोवताल्चा तिचा हात काढला व मान झटकली.

सिनेमा आणि कादंबऱ्यातले नायक अवघडलेल्या स्थितींत नायिकांवर तासन्तास प्रेम कसें करतात ह्याचें मला नेहमींच आश्चर्य वाटतें. आम्हीं पाहिलेल्या एका सिनेमांत नायक नायिकेला अलगद उचलतो आणि हास्यविनोद करीत तिला घेऊन जातो असें दृश्य होतें. घरीं आल्यावर बायकोनें मींहि तसेंच करावें असा लडिवाळ हट्ट धरला. अंगापिंडानें मी चांगलाच मजबूत असलो तरी त्या वेळेला माझी चांगलीच पंचाईत झाली. आणि धडपडींत माझे बोट बायकोच्या डोळ्यांत गेलें तेव्हां ती जोरानें विव्हळली. तेव्हांपासून पाहून आलेला सिनेमा पुन्हा घरीं करण्याची माझ्यावरची जबाबदारी नष्ट झाली आहे.

—माझी बायको समजुतीच्या स्वरांत म्हणाली, "आतां सुधा आली कीं नाहीं, म्हणजे तुम्ही अगदीं नीट वागा हं. मीं तिला सांगितलें आहे कीं, तुम्ही

नेहमीं लिहीत नाहीं तर वाचीत असतां. तुम्ही माझे सगळें ऐकतां. आणि कीं नाहीं, तुम्हाला मुलें फार फार आवडतात. अगदीं तस्सें वागायचें हं. वागाल ना गडे, एवढें नाहीं का माझे ऐकायचें?"

ह्यावर सद्गदित होऊन होकारार्थी मान हलविण्यापलीकडे दुसरें काय माझ्या हातांत होतें? पण तशी मान हलवितानाच एकदर प्रसंगाचें गांभीर्य माझ्या ध्यानात येत होतें. थोड्याच वेळात मीं तिरसटपणें बायकोला म्हटलें, "पण तुला कोणी हे उद्योग सांगितले होते?"

मला जेव्हां बायकोवर रागवायचें असतें, तेव्हां माझ्या रागावण्याचें कारण पुष्कळदां तिच्या ध्यानांत येत नाहीं. त्यामुळें माझ्या रागाची वाफ उडून जाते. एकाद्या पंक्चर झालेल्या टायरप्रमाणें माझ्या रागाची स्थिति होते. आणि कधीं कधीं तर माझें रागावणें ही तिला फार विनोदी घटना वाटते. आणि मी तावातावानें बोलत असतां ती मला जीभ काढून दाखवते अगर माझें नाक ओढते. या वेळीं ह्या दोन्हीहि गोष्टी घडल्या. आणि नेहमींप्रमाणें माझा अवसानघात झाला. मला वाटूं लागलें कीं, माणसानें समजूतदार असावें, लहान सहान गोष्टींवरून रागावूं नये. घरांत बायकोचा अधिकार हा असायचाच. ह्या कचखाऊ विचारांचा परिणाम व्हायचा तोच झाला. माझ्या रागावण्याचें कुरकुरींत रूपांतर झालें. आणि थोड्याच वेळात मी बायकोच्या विनवण्या करीत आहें, असें मला आढळून आलें.

तेवढ्यांत दाराशीं टांगा उभा राहिल्याचा आवाज आला आणि माझी बायको लगबगीनें बाहेर पळाली. तिच्या मागोमाग मी देखील धावलों. धावत असतांनाच माझी चूक माझ्या ध्यानांत आली. मी गॅलरींत जाऊन थबकलो. आणि नवऱ्याला साजेशा बेगुमानपणें मीं मोठी जांभई दिली व तोंडापुढें चुटकी वाजवली. सुधा टांग्यांतून उतरली. तिनें पातळ सारखें केलें, पर्स चाचपली, छत्री नीट पकडली, केसांवरून हात फिरवला, आणि मग परत दोन्ही बाजूंनीं मुरडून आपल्या पातळाकडे पाहिलें. एवढया वेळांत माझ्या बायकोनें लगबगीनें सुधाच्या मुलीला बाहेर काढलें. तिच्या केसांची एक गुंडळी तिच्या डोळ्यांत गेली होती. आणि एक बोट तोंडांत घालून ती चिकित्सकपणें माझ्याकडे पहात होती. तिची ती पहाण्याची पद्धति मला मुळींच आवडली नाहीं. मग बोटानें

माझा निर्देश करून म्हणाली, “ हा बुवा कोण आहे ?”

माझी बायको खदखदून हसत म्हणाली, “ हा बागुलबुवा आहे. ” आणि ह्यावर ती व सुधा खदखदून हसत सुटल्या. ‘ आई ग ’ अशा किंचाळ्या मारून त्यांनीं एकमेकींना चापट्या मारल्या आणि अर्धवट वाकून त्यांनीं इकडे तिकडे हेलकावे खाल्ले. बायका अशा हसूं लागल्या म्हणजे आपला कांहीं गुन्हा नसताना आपण फार मोठे गुन्हेगार आहोंत असें वाटूं लागतें. मी ओशाळलों आणि तरी खेळाडू वृत्ति दाखविण्याच्या हेतूनें मीं चेहऱ्यावर एक अस्पष्ट बावटळ हास्य आणलें. हा हसण्याचा कार्यक्रम चालू असतांना ती मुलगी मात्र अगदीं शांतपणें बोट तोंडात घालून उभी होती. अखेर तिनें कांहींसा निश्चय केला आणि आपल्या आईला ती म्हणाली, “आई, तूं त्याला मार.” आई जेव्हां मला मारीत नाहीं असें तिला आढळून आलें, तेव्हा ती स्वतःच हात उगारून मला मारण्यास धावली. तशीं सुधानें तिला उचलून घट्ट पोटाशीं धरलें आणि हसत ती घरांत पळाली.

ह्या एकंदर प्रकारानें मी चांगलाच भांबावून गेलों. लहान मूल घरांत येणार, असें कळल्यावर हालअपेष्टा सहन करायची मीं मनाची तयारी केली होती. पण मला कांहीं शारीरिक अपाय होईल अशी अपेक्षा मीं केली नव्हती. आतां मात्र मीं परिस्थितीच्या गांभीर्यानें भांबावून गेलों. कांहींसा मी शुद्धीवर येतों तों माझी बायको टाग्यांतल्या सामानाकडे व माझ्याकडे अर्थपूर्ण दृष्टिक्षेप टाकीत आहे, असें माझ्या ध्यानांत आलें.

“ मी हमाल घेऊन येतों बरें का. ” असें म्हणून मीं तेथून निसटण्याचा प्रयत्न केला. पण बायको म्हणाली, “ इथें कुठें आतां हमाल मिळणार आहे ! आणि एवढेंसें तर मेलें सामान. ”

मीं सुस्कारा सोडला आणि सामान उचलून घरांत आणलें. मुलीनें तोंडांतलें बोट काढून माझ्याकडे शत्रुत्वानें पाहिलें. आणि मग तरातरा पुढें येऊन अनपेक्षितपणें तिनें माझ्या हातांतली बॅग हिसकली. आणि दुर्दैव असें कीं, ती बॅग तिच्या पायावर न पडतां माझ्याच पायावर पडली.

त्यानंतर घरांत चहापाण्याची धांदल उडाली. टॉवेल, पातळें, कंगवे, पिना वगैरे वस्तू इतस्ततः विखुरल्या. स्टोव्हचा फरफराट झाला. भांड्यांची उचलठेव

झाली. कपबशा किणकिणल्या. गाळणें ठणाणलें. ह्या आवाजांच्या कल्लोळांत उंच स्वरांत संभाषण चाललें होतें. पातळांच्या किनारी, केसाचीं वळणें, लिपस्टिकचा रंग, नखांचें पॉलिश, भांड्यांचे घाट, डब्याचा सुबकपणा, कपबशाच्या किमती आणि तो मेला स्टोव्ह, या साऱ्या विषयांचा संमिश्र उहापोह झाला. मैत्रिणींच्या व नातेवाइकांच्या उखाळ्यापाखाळ्या खोचदारपणें काढण्यांत आल्या. आणि नवरा ह्या प्राण्याची निंदा विशेष उत्साहानें होत होती. मी अभावितपणें हें संभाषण ऐकत घरांत उभा राहिलो. तें पाहून बायको प्रेमळ आवाजांत म्हणाली, "आतां कीं नाहीं तुम्ही वाचीत बसा बाहेर. मग थोड्या वेळानें मीं चहा आणतें."

मीं बाहेर जाऊन वाचत बसण्याचा प्रयत्न केला. पण माझें कांहीं तिकडे लक्ष लागेना. बायको जवळ असली म्हणजे, ती माझ्या वाचनांत व्यत्यय आणते म्हणून मी तिच्यावर संतापतों. आणि ती दूर असली कीं ती वाचनात व्यत्यय आणीत नाहीं म्हणून माझी चुळबुळ होते. खरें म्हटलें म्हणजे मला आतां वाचनाची फारशी हौस राहिलेली नाहीं. पण तसा मला देखावा मात्र करावा लागतो. आणि तसा देखावा करण्याची मला थोडीशी हौसहि वाटते.

बायकोनें चहा आणला आणि आम्ही सारीं टेबलाभोंवतीं बसलों. गप्पा मारीत आम्ही चहा घेत होतो. आणि उंबरठ्यावर उभी राहून ती डोळ्यांत केसांची गुंडळी गेलेली मुलगी तोंडात बोट घालून आमच्याकडे पहात होती. थोड्या वेळानें ती पुढें आली आणि अगदीं अनपेक्षितपणें आपल्या आईला कडकडून डसली. सुधा किंचाळली, आणि मग मोठ्या सन्मानानें त्या मुलीला खुर्चीवर बसविण्यांत आलें. सुधाच्या व माझ्या बायकोच्या विनवण्यांना न जुमानतां ती स्वतःच्या हातानें चहा प्यायली, तिच्या बशींतला चहा जितका हिंदकळत होता, त्यापेक्षां माझें हृदय अधिक हेलकावे खात होतें. आणि त्याच वेळीं तिच्या बशींतल्या चहाप्रमाणें माझ्या बायकोच्या हृदयांतलें कौतुक ओसंडून जात होतें.

"कित्ती हुषार आहे ग ही!" चाकोलेट तोंडात पडल्याप्रमाणें मिटक्या मारीत माझी बायको म्हणाली.

"मेली मोठी वस्ताद आहे. अशी बोलते चुरुचुरु आणि कोणाचेंहि ऐकत नाहीं. ती म्हणेल तें खरें." सुधा विभूतिपूजेच्या स्वरांत म्हणाली.

इतरांना दुरुत्तरें करणें आणि हट्टीपणा करणें हे मुलांचे कौतुकास्पद गुण कां समजले जातात तें मला अजून कळलेलें नाहीं.

बायको माझ्याकडे बघून म्हणाली, "कित्ती गोड आहे नाहीं का ही! गडे, तुम्ही हिच्यावर गोष्ट लिहा. अशी छान लिहाल."

त्यावर सुधा उत्साहानें म्हणाली, "खरेंच गडे! कित्ती छान लिहितां तुम्ही. तुमच्या गोष्टींतलीं लहान मुलें इतकीं गोड असतात! वाटतें कीं त्यांना उचलावें आणि पटापट मुके घ्यावे. आणि तुमच्या त्या गोष्टींतली दोन अजागळ माणसें आहेत ना, अगदीं तश्शीं हुबेहुब आमच्या शेजारीं रहातात. मीं मुद्दाम त्यांना ती गोष्ट वाचून दाखवली. पण त्यांना कीं नाही, त्यांतलें कांहीं समजलें नाहीं. एवढें कसें बाई माणसांना समजत नाहीं कोण जाणे." आपण फार रसिकतेनें बोललों असा भाव तिच्या तोंडावरून ओसंडत होता.

आपली स्तुति केल्यावर जें एक नेभळट हास्य करायचें असतें तें मीं चेहऱ्यावर उमटवलें. माझ्या लेखनावर इतक्या अधिकारवाणीनें आपल्या मैत्रिणीनें बोलावें हें माझ्या बायकोला रुचलें नाहीं. ती माझ्या गोष्टी कशा कठीण असतात, आणि त्या समजल्या असें वाटलें तरी कशा समजलेल्या नसतात वगैरे गूढ मुद्दे मांडूं लागली. आणि अखेर तिनें आपल्या मैत्रिणीला हळूच चिमटा काढला, "बघ ग बाई सुधा! तुझ्यावर सुद्धां गोष्ट लिहितील एखादी."

ह्यावर सुधा मान वेळावून म्हणाली, "इश्श!" आपल्यावर गोष्ट लिहिली जावी अशी उत्कट इच्छा लपविणें तिला जमलें नाहीं. तेवढ्यांत मी तिच्यावर कदाचित् गोष्ट लिहीन अशा धास्तीनें माझी बायको म्हणाली, "थट्टा पुरे गडे. पण तुम्ही या छोकरीवर गोष्ट लिहा कीं."

...मला पुष्कळदां वाटतें कीं फोटोग्राफरप्रमाणें आपणहि एक गोष्टी लिहिण्याचें दुकान काढावें. त्यांत नुकतेंच लग्न झालेलीं दांपत्यें, डोहाळे लागलेल्या बायका, तान्हीं मुलें, साठी उलटलेले आजोबा वगैरे व्यक्तींवर गोष्टी लिहून द्याव्या. फोटोंत जशा निरनिराळ्या पोझेस् असतात त्याप्रमाणें गोष्टींचेहि निरनिराळे प्रकार कमीअधिक दरानें विकतां येतील. मला वाटतें कीं, मासिकांत गोष्टी लिहिण्यापेक्षां हा धंदा अधिक किफायतशीर ठरेल. कारण आपल्यावर

गोष्ट लिहिली जावी, म्हणून बरींचशीं माणसें हपापलेलीं असतात. आणि आपलें जीवित व अनुभव कांहीं निरालेंच आणि अनाकलनीय आहेत असा सर्वांचाच गैरसमज असतो...

माझ्या बायकोचें बोलणें ऐकून त्या मुलीनें आपल्या आईला हुकूम सोडला, "आई, माझी वेणी घाल. आणि मला नवीन फ्रॉक घाल." आणि तिनें ती केसांची गुंडळी अधिकच आपल्या डोळ्यांत खुपसली.

मीं वेळ मारून नेण्याच्या इराद्यानें मुळमुळीत हास्य केलें. मग त्या मुलीचें कौतुक करण्याच्या इराद्यानें मीं म्हटलें, "काय बाळ, तुझे नांव काय?"

ह्यावर त्या मुलीनें आपलें नांव सांगितलें, पत्ता सांगितला, उंदराची गोष्ट सांगितली, आणि अखेर बापानें फावल्या वेळेचा दुरुपयोग करून शिकविलेली एक इंग्रजी कविताहि म्हणून दाखविली. पूज्य बापूजींना वंदन करून तो कार्यक्रम संपला.

त्यानंतर कौतुकाचा कल्लोळ उडाला. त्या कल्लोळांत भाग घेणें मला शक्य नसल्यामुळें व तोंडावर उगीचच हास्य खेळतें ठेवायचा कंटाळा आल्यामुळें मी स्तब्धच राहिलों. मला तसा स्तब्ध राहिलेला पाहून माझी बायको हलक्या आवाजांत मैत्रिणीला म्हणाली, "आतां कीं नाहीं गडे, ह्यांची मूड लागते आहे. बहुधा गोष्ट सुचत असेल. आतां अगदीं मुळींच बोलायचें नाहीं. नाहीं तर हे रागावतील हं." मला ऐकायला येऊं नये अशा स्वरांत झालेलें हें बोलणें मला चांगलें स्पष्टपणें ऐकूं आलें. पण माझ्यावर लादण्यांत आलेली ही सांकेतिक कल्पना कशी दूर करावी तें मला समजेना. म्हणून मी स्तब्धच राहिलों.

त्या दोघी उठून गुपचुप घरांत गेल्या. आणि ती मुलगी तोंडांत बोटें घालून, डोळ्यांतली केसांची गुंडळी दूर न करतां माझ्याकडे पहातच राहिली. तिनें माझ्यामोवतीं दोन फेऱ्या घातल्या. हळूच माझ्या अंगाला बोट लावलें. आणि मग मी कांहीं विशेष कुतूहलजनक व्यक्ति नाहीं, असा निष्कर्ष काढून ती घरांत चालती झाली. त्यामुळें तिला आंत बोलावण्याकरितां होणारा सुकसुकाट बंद झाला. पण आंतल्या बाजूला एक विलक्षण संभाषण सुरू झालें. सुधा तिला फिसफिसत्या स्वरांत कांहींसें सांगत होती, आणि ती मुलगी उंच

स्वरात त्याला उत्तरें देत होती. अखेर त्या मुलीला झोपविण्यांत आलें. आणि मग या ना त्या प्रकारें होणाऱ्या टेहेळणीपलीकडे मला कसला त्रास झाला नाहीं.

पंधरा वीस मिनिटें गेल्यावर माझी बायको हसतमुखानें बाहेर आली आणि म्हणाली, "सुचली का गडे गोष्ट? आता केव्हां लिहून काढताय्?"

मीं म्हटलें, "काढूं सावकाश दोन चार दिवसानीं."

ह्यावर माझी बायको हसली आणि माझ्यासमोर मैत्रिणीसमवेत येऊन बसली. त्या दोघी इलस्ट्रेटेड वीकलींतलें विनोदाचें पान वाचूं लागल्या. थोड्याच वेळात ठराविक अडचण उपस्थित झाली. माझी बायको म्हणाली, "इथें कुठें हसायचें तें सांगा ना हो."

विनोदाचा अन्वयार्थ लावण्याच्या मी विरुद्ध असल्यामुळें मीं म्हटलें, "मला नाहीं माहीत."

"एवढेंहि सांगतां येत नाहीं ना? फुतुक!" बायको.

"फुसस्! काय पण!" सुधा.

"मग कशाला तें वाचून एकटे एकटे हसत असतां?" बायको.

"अग उगीच तें. आपल्याला समजतें असें दाखवायला." सुधा डोळे मिचकावीत म्हणाली.

"मग मला समजत नाहीं म्हणून कशाला नांवें ठेवतां?" बायको.

ह्या टोंचणीनें मी कंटाळलों. आणि रागारागानें मीं वीकलींतला विनोद त्यांना समजावून सांगितला. त्या दोघींचे चेहरे पूर्णपणें निर्विकार राहिले. त्यांनीं एकमेकींकडे पाहिलें. मग बायको म्हणाली, "इश्श! ह्यांत कसलें बाई हसायचें? असलाच का विनोद करतात हे लोक?"

ह्यावर सुधानें क्षुद्र कोटी केली, "अग, हा 'विनोद' नव्हे, 'इनोद.'" ह्या कोटीवर त्या दोघीहि विलक्षण खूष झाल्या आणि गडबडा लोळायची पाळी येईपर्यंत हसल्या. स्त्रियांची विनोदबुद्धि मला अजून समजलेली नाहीं. आणि पुढें कधीं समजेल असें वाटत नाहीं.

त्यानंतर मी कांहीं तरी वाचीत बसलों. आणि माझी बायको व सुधा घरांत

कांहीं तरी कुलकुल करीत होत्या. थोड्या वेळानें ती मुलगी जागी झाली आणि तरातरा माझ्या खुर्चीजवळ येऊन उभी राहिली. एक डोळा व एक केसांची गुंडळी ह्यांनीं माझ्याकडे पहात आणि मला बोटानें टोचत ती म्हणाली, "ए बुवा, माझी गोष्ट कुठें आहे?"

मीं तिच्या बोटाला चिमटा काढला आणि म्हटलें, "ए बुवी! तुझ्यासारख्या फडतुस पोरीवर कोण गोष्ट लिहितो!"

तोंडांत बोट घालून एकदां परिस्थितीचा तिनें विचार केला. मग ती म्हणाली, "तूं खडतूस आहेस!" आणि तिनें माझ्या दंडावर एक चापटी मारली.

मीं तिच्या पृष्ठभागावर तोच प्रयोग केला, आणि म्हटलें, "फडतूसपेक्षां खडतूस पुष्कळ बरा असतो. त्याचे दांत किडके नसतात आणि केस डोळयांत जात नाहींत."

अशीं उत्तरें आणि प्रत्युत्तरें व चापट्या आणि प्रतिचापट्या ह्यांची देवघेव थोडा वेळ झाली. आणि मग अपेक्षेप्रमाणें ती मुलगी चिडली. आणि मला चावायला धावली. मीं तिचें नाक पकडलें आणि ती ओरडली तशीं सोडून दिलें. ती दूर हटली आणि पाय आपटीत घरात निघून गेली. बहुधा आपल्या आईकडे तक्रार करण्याचा तिचा विचार असावा. पुढील घटनांची मी भीतिपूर्वक वाट पहात होतों. पण ती मुलगी कांहीं तरी निश्चय केल्याप्रमाणें बाहेर आली. बहुधा आपल्या आईकडे तक्रार करण्यांत तिला कमीपणा वाटला असावा. आपण कुठच्या तरी अलिखित नियमाचा भंग करीत आहों असें वाटलें असावें. बाहेर येऊन तिनें एकवार माझ्याकडे पाहिलें. आणि मग माझ्या टेबलावरचें फाउंटनपेन घेऊन ती घरांत पळाली.

मी क्षणभर दिङ्मूढ झालों. माझ्या पेनच्या भवितव्याविषयीं मला शंका वाटूं लागली व युद्धतहकुबी करण्याचे कचखाऊ विचार माझ्या मनांत येऊं लागले. पण ते विचार मीं निर्धारानें दडपून टाकले. मी उत्साहानें उठलों आणि त्या मुलीचा खुंटीवर टांगलेला रेशमी फ्रॉक बाहेर टाकून देऊं लागलों. तेवढ्यांत माझी बायको आली आणि आश्चर्यानें म्हणाली, "हें काय? तो फ्रॉक कशाला बाहेर फेकतांय्?"

मीं खलनायकाप्रमाणें दांत विचकून म्हटलें, "मग तिनें माझें पेन कां पळवलें!"

बायकोनें माझ्या हातांतला फ्रॉक हिसकून घेतला आणि ती फणकाऱ्यानें म्हणाली, "वाः! अगदीं पोराहून पोर झालांत तुम्ही!"

मीं म्हटलें, "असूं दे मी पोरकट, तूं मोठी थोरकट आहेस तें माहीत आहे!" आणि जीभ काढून तिला वेडावून दाखविलें. ती हसत हसत घरांत निघून गेली.

विजयोन्मादानें गाल फुगवून मीं त्यांच्यावर मुटके मारले. थोडया वेळानें राधाकृष्णन् यांचें तत्त्वज्ञानावरचें पुस्तक वाचतांना मला आपल्या पोरकटपणाची शरम वाटूं लागली. पण तात्त्विक भूमिकेवरून मीं स्वतःलाच म्हणालों, 'महायुद्धें मोठ्या प्रमाणावर होत असली, तरी माझ्या व त्या मुलीच्या मारामारीहून तीं कांहीं भिन्न स्वरूपाचीं नसतात.' एवढा मोठा तात्त्विक विचार सुचल्यामुळें मला फारच संतोष वाटला. आणि त्या संतोषाच्या भरात मीं तें पुस्तक खालीं ठेवलें.

मैत्रीण घरीं आली म्हणजे नवऱ्यावर विशेष अधिकार गाजवावा असें बायकांना वाटूं लागतें. त्याचे दुष्परिणाम मी दिवसभर भोगीत होतो. रात्रीं जेवणाच्या वेळीं तर माझ्यावर फारच अत्याचार झाले. मुख्य म्हणजे त्या मुलीला माझ्या शेजारीं बसविण्यांत आलें होतें. तिच्या डोळ्यांत गेलेली केसांची गुंडळी माझ्या मनांत इतकी खुपत होती कीं, मला सारखी अस्वस्थता वाटत होती. शिवाय ती माझ्या अंगाला खरकटे हात लावीत होती आणि शत्रुत्वानें माझ्याकडे पहात होती. मला सारखे वाटत होतें कीं ती मला कडकडून डसणार. म्हणून मी अंग चोरून बसलों होतों. मला वाढण्याचें काम बायको व सुधा मोठ्या उत्साहानें करीत होत्या. माझ्याविषयींची आस्था पराकोटीला पोहोंचली होती. तिनें माझ्या पानांतल्या कोशिंबिरींतील मिरच्या काढून टाकल्या. माझ्या वाटींतली आमटी ढवळली आणि मग माझ्या भातांत दगड असल्याचा संशय तिला आला. समोरचें ताट उचलून घेऊन तिनें त्या संशयाचें निराकरण केलें. त्यामुळें अन्न माझ्या पोटांत जाणें बरेंचसें दुरापास्त झालें. अखेर ताटाचा कबजा मिळाल्यावर मीं अधाशीपणें दोनचार घास तोंडात कोंबले. तरीं उद्गार निघाले, "अजून ती कोशिंबीर नाहीं खाल्ली?"

मीं मानेनें म्हटलें, "खातों. जरा दम धर." तेवढ्यांत बायकोनें माझ्या पानांतील कोशिबीर खाऊन पाहिली आणि तिच्यांत काय कमी झालें आहे ह्याबद्दल माझी उलटतपासणी करण्यात आली. नंतर माझ्या पानांतील भाजीचा रस मिठात जात आहे असें दिसून येतांच त्याचा बंदोबस्त करण्याकरिता परत माझ्या बायकोचा हात पुढें सरसावला. मी खातो आहें असें ध्यानात येतांच मला अधिक भाजी खाण्याबद्दल आग्रह करण्यांत आला. आणि मी भाजी नको असें म्हणतांच बायको ठसक्यात म्हणाली, "नेहमीं चांगली चार डाव भाजी खातां आणि आजच काय झालें ?"

चार डाव भाजी माझ्या पानांत जबरदस्तीनें वाढण्यात आली. आतां तरी सुखासमाधानानें जेवता येईल अशा कल्पनेनें मीं दोन घास घेतले, तेवढ्यात आणखी एक शोध लागला.

"अय्या ! अजून पाणी नाहीं प्यायलां तुम्ही ? हे कीं नाहीं जेवतांना दोन तांब्ये पाणी पितात. माझें बाई सबंध जेवणांत एका भांड्यावर भागतें..."

आणि मग दोन तांब्ये पाणी पिण्याची नैतिक जबाबदारी माझ्यावर येऊन पडली.

नंतर मला सुपारी कातरून देण्याचा लडिवाळ हट्ट बायकोनें धरला. आपलें सारें बळ एकवटून तिनें अडकित्ता दाबला. आणि सुपारीचें एक खांड स्वयंपाकघरांत व एक गॅलरींत जाऊन पडलें. मी रांगत आणि कपाटाखालीं डोकावत तें सुपारीचें खांड शोधूं लागलों. अखेर तें मिळालें तेव्हां बायकोनें त्याचा पुन्हा कबजा घेतला. तें फोडण्याच्या प्रयत्नांत तिनें बोट कापून घेतलें...

मी तिच्या हाताला चिंधी गुंडाळत असतां तिच्या प्रेमाला भरतें आलें. माझ्या केसांतून हात फिरवीत ती म्हणाली, "गडे, किती गोड आहे नाहीं का ती मुलगी ! आपल्यालासुद्धां अशीच एक गोड मुलगी हवी !"

"काय ?" मी किंचाळलों. आणि धाड्दिशीं अंथरुणावर पडून, डोक्यावरून पांघरूण घेऊन झोपीं गेलों.

★ ★ ★

## टिल्लूंची संस्कृति

१०

श्री. टिल्लू, बॉम्बे गव्हर्न्मेंट सर्व्हिस, दुय्यम वर्ग, आपली एक महिन्याची रजा संपवून सहकुटुंब मुंबईला परत येत होते. आजोबा, पप्पा आणि मम्मा, प्रभा आणि विभा, मनु आणि अनू ही काय ती सारी मंडळी. मम्मानें लावलेल्या शिस्तीनुसार सगळीं प्लॅटफॉर्मवर उभीं राहिली होतीं. त्यामुळें पौंड, शिलिंग, पेन्सांचें कोष्टकच स्टेशनवर उभे आहे, असें वाटत होतें. मम्मानें सामान देखील मोजकेंच घेतलें होतें. दोन मोठ्या ट्रंका आणि दोन मोठे होल्ड्ऑल, गाडींत उघडतां येतील अशा दोन छोट्या बॅगा आणि गाडींत झोंपण्याकरितां दोन छोटे होल्डॉल! आणि अगदीं आवश्यक वस्तूंनीं भरलेली छोटी पिशवी अगर बॅग प्रत्येकाच्या हातांत होतीच. शिवाय आजोबांची काटी, पाण्याचा तांब्या, टिफिन कॅरिअर, थर्मास, मम्मा व प्रभा ह्यांच्या पर्सेस आणि फळांची करडी हें किरकोळ सामान होतें.

तो सामानाचा ढीग स्टेशनवरच्या कुत्र्यांना तरी मोठा आकर्षक वाटत असावा. कारण तीं वारंवार जवळ जाऊन हुंगीत होतीं. आजोबा वीरश्रीनें काठी उगारून त्याना हाकलीत होते. आतां ती काटी कुत्र्यांना लागण्याऐवजीं स्टेशनवरच्या माणसांनाच अधिक लागत होती हें खरें, पण आपलें वय लक्षांत न घेतां लहानमोटीं कामें हौसेनें अंगावर घ्यायची ह्य सवय आजोबाना होती.

मनु आणि अनू मम्माच्या पायावरून आगगाडीचें इंजिन गेलें तर काय होईल, त्याची तटस्थ भूमिकेवरून चर्चा करीत होतीं. विभा एका डोळ्याला

कॅमेरा लावून इकडे तिकडे, म्हणजे चांगल्या मुलीकडे, पहात होता. प्रभा कधीं निष्पाप मुद्रेनें आणि डोळ्याची कृत्रिमपणें उघडमीट करीत जगाकडे पहात होती, तर कधीं कुरेबाजपणें व तुच्छतेनें जगाकडे दृष्टिक्षेप टाकीत होती. कारण असें कीं, आपण एक निष्पाप, अजाण व बालवृत्तीची तरुणी आहोत, कीं स्मार्ट मॉडर्न युवती आहोत ह्याबद्दल तिचा मनाशीं निर्णय झाला नव्हता.

मम्मा कांहीं तरी विलक्षण चिंतेत होत्या. कारण आपल्या घामेजलेल्या नाकाला पावडर लावायला त्या अजिबात विसरल्या होत्या. आपण काय सामान विसरलो तें त्याना आठवत नव्हतें. आणि मग एकदम त्याचा चेहरा पुरीसारखा फुलला. आपल्या शेजारच्या माणसाला जोरांत कोपरखळी मारून त्या म्हणाल्या, "तरी म्हटलें, मी विसरले नाहीं कसें काही?"

आपल्या शेजारीं उभे असलेले गृहस्थ आपले 'अहो' नाहीत हें ध्यानात येताच, त्यांनीं रागानें त्या गृहस्थाकडे पाहिलें, आणि दूर उभ्या असलेल्या 'अहो' ना एक कोपरखळी मारून त्या म्हणाल्या, "ऐकलें का? अखेर विसरलेंच मी कांहीं तरी!"

पपांच्या तोंडातला तिरका चिरूट म्हणाला, "हं."

विरस न पावतां मम्मा म्हणाल्या, "काय तें नाहीं विचारलेंत?"

"काय?" चिरूटाभोवतीं ओठ हालले.

"ओळखा बरें?" लाडिकपणें मान कलती करून मम्मा म्हणाल्या.

"मला नाहीं बुवा ओळखतां येत." श्री. टिल्लूंनीं चर्चा संपविण्याच्या उद्देशानें म्हटलें. पण मम्मांचा उत्साहभंग अजून कोणी करूं शकलें नव्हतें.

हसत हसत बोटें हलवून मम्मानें सर्वांना आपल्या भोवतीं गोळा केलें. आणि मग कमरेवर हात ठेवून डुलत त्या म्हणाल्या, "ओळखा बरें मी काय विसरलें तें. जो ओळखील त्याला मी चॉकलेट देईन."

प्रभा आणि विभा ह्यांचें लक्ष ताबडतोब त्या प्रश्नावरून उडालें आणि तीं दोघें दूर झालीं. पण मनु व अनु ह्यांना चॉकलेटचा मोह सोडवेना. दोघांनीं डोकीं खाजवून निरनिराळ्या वस्तूंचीं नांवें घेतलीं. पण दर वेळेला लडिवाळ उत्तर यायचें, "नाऽहीं!"

मम्मा विलक्षण सुखांत होत्या. आपण कांहींच विसरलों नाहीं ही त्यांची

चिंता दूर झाली होती. अखेर त्या कांहीं तरी विसरल्या होत्या. त्याचा विसरभोळेपणा अजून शाबूत होता. मोठेपणाची ती खूण शिल्लक होती.

तेवढ्यात मनु स्फूर्तीच्या झटक्यांत ओरडला, "आई, नक्की तूं आपल्या दाताची कवळीं विसरली आहेस."

मनु हें एवढ्या मोठ्यानें ओरडला कीं आसपासच्या सर्व माणसाना तें ऐकूं गेलें. काहीं बायका गालातल्या गालात हसल्या, आणि मम्मांना दिसावें अशा बेतानें त्यानीं आपलें हसूं लपविलें. पुरुषानीं आपली डोकीं वर्तमानपत्रात खुपसली. आणि एक अडाणी पोरगा तर खो खो करून हसूं लागला.

मम्माना काय करावें तें समजेना. त्यांची पॅनकेक मेकअपची सारी संस्कृति विरघळून गेली; आणि परंपरागत मातृदेवता त्यांच्या ठिकाणीं प्रगट झाली. मनूचें बकोट धरून त्याला फरफटत ओढत न्यावें आणि त्याच्या पाटींत धपके घालावे अशी तीव्र इच्छा त्याना झाली. त्याच्या मनात त्या दोन संस्कृतींचें तुंबळ युद्ध झालें. अखेर हसत हसत त्यानीं मनूचा गालगुच्चा घेतला आणि त्या म्हणाल्या, "वेडा रे वेडा! माझी का दातांची कवळी आहे? आजोबा कवळी वापरतात." मात्र गालगुच्चा हसत हसत घेतलेला असला, तरी मनूचा गाल बराच वेळ झणझणत राहिला.

तेवढ्यांत आगगाडीची घंटा झाली. त्यासरशीं मम्मांच्या मनांतली पोक्त कोंबडी जागृत झाली. कर्कश किलबिलाट करून त्यानीं आपलें कुटुंब भोवतीं गोळा केलें. पौंड, शिलिंग, पेन्सांचें पांगलेलें कोष्टक पुन्हा एकत्र झालें; आणि गाडींत चढण्याची जय्यत तयारी मम्मांनीं सुरू केली. हमाल कुठें दिसेना, तेव्हां त्यांचा जीव कासावीस झाला. नेमकें गाडी यायच्या वेळेला नाहींसें होण्याच्या हमालांच्या दुष्ट सवयीवर त्यानीं यथेच्छ तोंडसुख घेतलें. त्या चरफडल्या, "मला माहीत आहे काय होणार आहे तें. अर्धें सामान बाहेर रहाणार आहे आणि मग सगळा गोंधळ! तारा, टेलिफोन..."

प्रभाला आपल्या आईचा हा भित्रटपणा व वेंधळेपणा आवडला नाहीं. आपल्यासारख्या आधुनिक स्मार्ट मुलीला अशी आई मिळावी ह्याची तिला शरम वाटली. हार्डीच्या कुठच्या तरी कादंबरीची आपण दुःखी नायिका आहोंत असा तिनें दृढ समज करून घेतला. आणि रडव्या आवाजांत ती

म्हणाली, "आई, नको असा वेंधळेपणा करूं. हमाल कांहीं कुठें पळून जायचा नाहीं."

पॅनकेन संस्कृतीला सोडून ही आपली वागणूक आहे हें मम्मांना पटलें. कारण त्या बाबतींत प्रभाला अधिक समजतें हें त्याना पटलें होतें. पण त्यांच्या मनांतली तगमग कमी होईना. अखेर त्या हसत हसत म्हणाल्या, "चला गडे आज आपणच आपलें सामान गाडींत टाकू या. स्वावलंबन!" आणि एक जड होल्डॉल त्यांनीं आपल्या मतें खेळकरपणें पुढें सरकवला.

प्रभा अधिकच रडवेपणानें म्हणाली, "काय हें आई?"

"कुठें काय?" असें हसत हसत म्हणत त्यांनीं दुसऱ्या बोजाला हात घातला. तशीं पपा वसकन् ओरडले, "ठेव तें खाली. कांहीं अक्कल आहे कीं नाहीं?"

इतक्या लोकांच्या समोर पॅनकेक सस्कृतीचा सरळ मुडदा पाडण्यांत आला होता. मम्मा गोऱ्यामोऱ्या झाल्या. आणि मग आपली बाजू सावरण्याकरितां त्या लडिवाळपणें म्हणाल्या, "असें काय गडे रागावयाचें? मी मुळीं तुम्हांला वाचूंच देणार नाहीं!" आणि खसकन् त्यांनीं पपांच्या हातांतलें वर्तमानपत्र ओढून घेतलें. पपा चरफडत गप्प बसले. आणि मम्माचा स्वाभिमान परत प्रतिष्ठितपणे मिरवूं लागला.

तेवढ्यांत विभा म्हणाला, "आई, मी हमालाला बघून आणतों." पण तो जाणार इतक्यांत त्याचा बुशशर्ट खसकन् खेचून मम्मांनीं त्याला थांबविलें. "कुठें जायचें नाहीं आतां. तुला कुठें आणखी शोधत बसायचें आम्हीं?" आपल्याला मम्मा अजून लहान पोराप्रमाणें वागवते ह्याचा विभाला फार राग आला. त्यानें मम्मानें जिथें बुशशर्ट धरला होता तिथें तो हातानें झाडला आणि अमेरिकन चित्रपटांतल्या ऐटबाज नायकाप्रमाणे त्यानें इंग्रजींत अपशब्द उच्चारण्याचा प्रयत्न केला. एकंदरींत अमेरिकन चित्रपटांतल्या नायकाप्रमाणें होण्यांतच विभाला जीवनाची इतिकर्तव्यता वाटत असे. त्याचे केस लांबलचक होते. आणि ते वाऱ्यावर उडाले म्हणजे विभाला परमानंद होत असे. मग मानेला झटका देऊन तो ते सारखे करी. मध्येंच तो उगीचच विचारमग्न मुद्रा करीत असे. ड्रॉवर खसकन् उघडून पुन्हा बंद करीत असे. तुटकें तुटकें चावून चावून बोलत

असे. आणि खांदे हलवीत कोणाला तरी धमकी द्यायला निघाल्याप्रमाणें चालत असे.

तेवढ्यांत हमाल आला आणि एक गुंतागुंतीचा प्रश्न सुटला. मग गाडी यायची वेळ होत आली, तशीं मम्मानें गाडीत शिरण्याच्या बेतानें सर्वांना उभें केलें. आजोबाचें बकोट बाबाना पकडायला सांगितलें. आजोबांना आपल्या जबाबदारीची पूर्ण जाणीव होती. आणि त्याचा उत्साह तर कोणालाहि लाजवील असाच होता. त्यांनीं आपली काठी घट्ट बकोटीला धरली होती. धोतर वर बांधलें होतें. टोपी डोक्यावर चेपून बसवली होती आणि उत्साहाच्या भरात गाडीत चढण्याकरितां त्यांनीं आपला एक पाय आधींच उचलून ठेवला होता.

मम्मांनीं एका हातानें एक बॅग व मनु अशा दोन वस्तू आणि दुसऱ्या हातानें छत्री, पर्स व अनु अशा तीन वस्तू पकडल्या होत्या. त्यामुळें त्या अनेक आयुधांनीं सज्ज असलेल्या अष्टभुजा देवीसारख्या दिसत होत्या. आपल्याला आणखी दोन हात असावेत व त्यांनीं प्रभाचा पदर आणि विभाचा बुशशर्ट पकडावा असें त्यांना वाटत होतें. डोळे विस्फारून अधाशीपणानें त्या आगगा-डीची वाट पहात होत्या.

भपकारत गाडी स्टेशनच्या आवारांत आली. आजोबांचा पाय अधिकच उचलला गेला, व त्यांनीं काठी बगलेंत अधिकच दाबली. मम्मांच्या रागीट बेपर्वा चेहऱ्यावर देखील थोडें औत्सुक्य दिसूं लागलें. पपांचा एक डोळा सामानावर होता व दुसरा डोळा आगगाडीकडे व आपल्या कुटुंबाकडे होता! हातानें त्यांनीं मनु व अनु ह्यांना घट्ट पकडलें होतें व तोंडानें त्या हमालाचा नंबर पाठ म्हणत होत्या. विभा अशा थाटांत उभा होता कीं जणुं तो आगगाडीच्या टपावर उडी मारणार होता आणि तेथून टोसे लगावून व पिस्तुल झाडून तो सगळ्या लोकाना पळवून लावणार होता. प्रभा विचार करीत होती कीं, किती हे वेधळे आणि हावरट लोक आहेत. आपण किती वेगळ्या, उच्च वातारणांत वावरतों. ह्या लोकांत आपणाला मिसळावें लागतें हें किती अन्यायाचें आहे.

गाडी स्टेशनांत येऊन कुरकुरत थांबली, तशीं आजोबांचा उत्साह अनावर झाला. आपला हात सोडवून घेऊन ते धावत सुटले आणि घाईघाईनें रिकाम्या दिसणाऱ्या बायकाच्या डब्यात शिरून त्यानीं जागा अडवली. मग ते

हातवारे करून इतरांना बोलावूं लागले. मम्मांनीं सेकंड क्लासचा रिकामा डबा ताबडतोब हेरला, आणि चपळाईनें त्या साग्रसंगीत आत शिरणार, तोंच मनूनें त्यांच्या हातातल्या बॅगचें झाकण उघडलें आणि आतल्या सर्व वस्तू खाली पडल्या. पण ताबडतोब त्यानीं बॅगमधल्या वस्तू गोळा करायचें काम पपा व मनु यांच्यावर सोपवलें व त्यांनीं अनूसमवेत त्या डब्याचा कब्जा घेतला. अनूला त्यानीं जबरदस्तीनें एका बाकावर झोपविलें. दुसऱ्या बाकावर हातांतली पर्स व छत्री पसरून ठेवून त्यांनीं तें अडविलें. आणि तिसऱ्या बाकावर त्या स्वतः हात पसरून तें अडवून बसल्या. खरें म्हटलें तर त्या बाकावर झोपावें असेंच त्याना वाटत होतें. पण पॅनकेक संस्कृतीच्या अर्ध्यामुर्ध्या संस्कारांमुळें तसें करण्याचा धीर त्यांना झाला नाहीं. उरलेल्या जागेकडे अधाशीपणें पहात त्या म्हणत होत्या, "अरे सामान द्या, सामान द्या, म्हणजे बाकीची जागा अडवितां येईल."

श्री. टिल्लू व मनू खाली बसून लोकाच्या पायाभोवतीं फिरत होते व पडलेल्या वस्तू गोळा करीत होते. त्या कायम सरकारी अधिकाऱ्याच्या पोटावर त्यामुळें बराच ताण पडत होता. शिवाय लोकाचीं ढोपरें, त्यांच्या हातांतल्या बॅगा व गाठोडीं त्यांच्या शरीराच्या निरनिराळ्या भागांवर आदळल्या होत्या. शिवाय त्यांचें कामहि विशेष वेगानें चाललें होतें अशांतला भाग नाहीं. कारण त्यांच्या बॅगेतल्या बऱ्याचशा वस्तू एका लठ्ठ गुजराती बाईच्या पातळाच्या घोळात पडल्या होत्या. दोनदां वर मान करून त्यांनीं त्या बाईला दूर होण्याची विनंति केली. पण एकदां नाकावर बोचकें हापटल्यामुळें व दुसऱ्यांदा बॅगेचा अणकुचीदार कोपरा डोक्याला लागल्यामुळें त्याची विनंति परिणामकारकपणें व्यक्त होऊं शकली नाहीं. अखेर एका हातानें त्यांनीं हळूच त्या बाईच्या पातळाचें टोक उचललें व दुसऱ्या हातानें त्याखालच्या वस्तू उचलण्याचा प्रयत्न केला. तेवढ्यांत दुर्दैवानें त्या गुजराती बाईनें खाली वाकून पाहिलें व एक भीषण किंकाळी फोडली. ताबडतोब सर्व माणसांचें लक्ष श्री. टिल्लू यांच्या संशयास्पद हालचालीकडे गेलें. आणि दुसऱ्याच क्षणीं लोकांनीं श्री. टिल्लू यांचें बकोट पकडलें, हात पकडले, मानगूट पकडली आणि केसहि पकडले;—जिथें जिथें पकडणें शक्य होईल तिथें तिथें पकडलें. मग कोणी त्यांना थपडा मारल्या,

कोणी गुद्दे मारले, कोणी चिमटे काढले, कोणी केस ओढले. सगळ्या लोकानीं ह्या अहिंसामय समाजव्यवस्थेंत पुरी न होणारी आपली मारामारी करण्याची नैसर्गिक हौस पुरी करून घेतली.

ह्याच वेळेला विभाच्या कानावर ही बातमी गेली. त्याला चेव चढला. भर स्टेशनवर एका बाईची अब्रू घेण्याचा प्रयत्न करणाऱ्या चांडाळाला Shoot केलें पाहिजे असें म्हणत तो त्या घोळक्याजवळ गेला आणि सुरक्षित अंतरावरून हात लांब करून आपला कॅमेरा त्यानें दोनदां श्री. टिल्लू याच्या डोक्यावर आपटला. मग एका गृहस्थांनीं श्री. टिल्लू यांना दोन थपडा मारून समजाविलें, "चांगला बूटपाटलून घालणारा साहेब तूं. अन् असले धंदे करतोस?"

दोन अडाणी बाया त्याच्यासमोर हातवारे करून म्हणाल्या, "मेल्या! फुटलं ते तुझं थोबाड अन जळले ते तुझे हात! तुला काय आयाबहिणी नाहींत कीं काय?"

आणि मग बूटपाटलोणीच्या संस्कृतीपेक्षा विडीकाडीची 'व पानतंबाखूची संस्कृति कशी श्रेष्ठ आहे ह्याबद्दल जनतेचें एकमत झालें. तेवढ्यात मम्मांनीं खिडकींतून पपांची अवस्था पाहिली. त्या क्षणीं त्यांच्यातली पॅनकेकची संस्कृति विरघळली आणि मूलभूत स्त्रीवृत्ति जागृत झाली. त्या चवताळून बाहेर धावल्या. त्यानीं लोकाना मारलें, बोचकारलें, चिमटे काढले, चावे घेतले, झणझणीत शिव्या शाप दिले. सारे लोक दूर हटले. आणि आपल्या नवऱ्याचा कब्जा घेऊन मम्मा परत डब्यांत शिरल्या. मग प्रभा, मनू अन् अनु ह्यांना त्यांनीं जरब देऊन बसविलें. आणि विभाला आजोबाचें बकोट धरून पकडून आणायला सांगितलें.

पपांनी डोळे लाल करून मम्माकडे पाहिलें. आणि मनूच्या ढुंगणावर दोन मणसणीत चापट्या मारल्या. मग खिडकींतून डोकें बाहेर काढून स्टेशनवरच्या जंगली लोकाना जरब देण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. पण त्याचें डोकें दिसतांच लोकांनीं त्यांच्याकडे बोटें दाखवली व ते ओरडले, "हेऽऽहोऽऽ" पपांनीं घाईनें डोकें मागे घेऊन खिडकी बंद केली. आणि आपल्याला मागें ओढण्याचा प्रयत्न करणाऱ्या प्रभावर ते खेकसले, "गप्प बैस कारटे! तूं आणखी शहाणपणा करूं नकोस." आजोबांना बायकांच्या डब्यांतून बाहेर काढल्यावर ते उगीचच घाई-

घाईनें गाडीच्या ह्या टोकापासून त्या टोकापर्यंत फिरत होते. विभानें त्यांना पकडून डब्यात आणलें. ताबडतोब उत्साहानें सामानाची अडगळ बाजूला सारण्याच्या कामाला ते लागले, म्हणजे एक होल्डॉल उचलून त्यांनीं खाण्याच्या डब्यावर ठेवला व दुसरी एक बॅग पपाच्या मांडीवर दिली. तिसरी जड बॅग उचलून वर ठेवण्याचें शौर्य ते दाखविणार इतक्यात पपा खेकसले "तुम्ही स्वस्थ बसा बरें एका कोपऱ्यात. काय उगीच गोंधळ घालताय?" आजोबा मुकाट्यानें कोपऱ्यांत जाऊन बसले. आणि दुसरी कांहीं चाळवाचाळव करतां येत नव्हती, तेव्हा आपली काठी एका हातांतून दुसऱ्या हातात व दुसऱ्या हातातून पहिल्या हातांत ठेवण्यातच त्यांना समाधान मानावें लागलें.

विभा डब्याच्या दाराशीं उभा राहिला. आगगाडी सुरू झाल्यावर मग आंत शिरण्याचा त्याचा विचार होता. तें पाहून पपा खेकसले, "ए झिपऱ्या, आंत बस बघूं. कशाला सारखा नाचत असतोस?" विभाचा चेहरा खर्रकन उतरला. विशेषतः आपल्याला 'झिपऱ्या' म्हणावें ह्याची त्याला विलक्षण चीड आली. आणि त्याच क्षणीं पपांना कांहीं तरी बाणेदार उत्तर देऊन गाडींतून उतरावें आणि बेदरकारपणें दूरदूर चालत जावें असें त्यानें ठरवलें. मम्मा रडली आणि प्रभा किंचाळली तरी तो पर्वा करणार नव्हता. मग आपल्या कर्तबगारीच्या जोरावर नशीब काढून तो ऐशीं मैल वेगानें मोटर चालवीत परत आला असता. आणि पप्पाच्या पुढें आणखी कांहीं तरी बाणेदार बोलला असता. पण इतक्यांत गाडी सुरू झाली आणि त्यामुळें आपला बेत त्याला अमलात आणतां आला नाहीं.

गाडी सुरू झाली. वाऱ्याच्या झुळका आल्या. अनु पप्पांजवळ कांहीं तरी गोड बोलली आणि पप्पानीं हसून तिच्या गालाला हात लावला. मग मम्मांनीं आपल्या चेहऱ्याची आणि केसाची साफसफाई केली. आणि मान कलती करून हास्य केलें. ढुगणावर चापट्या मिळाल्यामुळें चुपचाप बसलेला मनू आतां संधि पाहून फुरंगटला आणि मम्मानें बिस्किटें, चहा वगैरे देऊ केलें तरी त्याचा राग जाईना. अखेर पप्पानीं त्याला उचलून मांडीवर घेतलें आणि कानात बोलून कांहीं तरी देण्याचें कबूल केलें, तेव्हा तो खुदकन् हसला. सगळ्यांनीं त्याला विचारलें, "काय रे मिळणार आहे तुला? सांग तरी आम्हाला." पण तो

कुणाला सांगायला तयार होईना. मग कुणी त्याचे गाल कुस्करले, कुणी त्याचे केस ओढून त्याला पुंड म्हटलें. प्रभानें पप्पाची दुमडलेली कॉलर सारखी केली. आणि त्यांनीं तिचा गालगुच्चा घेतला. अशा प्रकारें टिल्लू कुटुंबाची उध्वस्त झालेली संस्कृति पुन्हा प्रस्थापित झाली. पप्पा पप्पा झाले, मम्मा मम्मा झाल्या...

मग मम्मा लगबगीनें उठल्या. त्यांचे पोकळ लठ्ठ अवयव लुटलुटले. त्या म्हणाल्या, "बरी बाई एकदाची चांगली जागा मिळाली! आतां अगदीं आराम-शीर बसता येईल! मनू, तूं असा सरकून बस! हां! चांगला ऐसपैस. प्रभा, तू खिडकी लावून घे हं. म्हणजे ऊन नाहीं लागायचें. आणि वारा पण नाही लागायचा. ऐकलं का? तुम्ही ती बॅग कशाला जवळ घेतली आहे? द्या ती इकडे. आणि पाय ठेवा समोरच्या बाकावर. म्हणजे अगदीं घरच्याप्रमाणें पेपर वाचता येईल. गडे, रागावून कशाला पहायचं तें! ठेवा ते पाय इकडे. मी सांगतें म्हणून ठेवा. आणि विभा, गडे तूं आजोबांना वर जागा करून दे. म्हणजे ते निवातपणें झोपतील. नाही तर कीं नाहीं, त्यांना प्रवासाचा त्रास होईल."

सगळ्यानीं आरामांत बसावें, ह्या प्रामाणिक इच्छेनें मम्मा हें सगळें बोलत होत्या. पण त्यामुळें सगळ्यांची गैरसोय होत होती. पप्पांचे पाय समोरच्या सीटपर्यंत नीटसे पोंचत नसल्यामुळें ते लोंबकळल्यासारखे झाले होते. प्रभाचा जीव उष्म्यामुळें गुदमरून चालला होता. मनूला निष्कारण हातपाय पसरून ऐसपैस बसावें लागलें होतें. आणि बिचारे आजोबा आपल्या इच्छेविरुद्ध वरच्या बर्थवर कोंबले गेले होते. त्यांना झोपायची इच्छा नव्हती. म्हणून ते उठून बसले होते. आणि वर जागा कमी असल्यामुळें त्यांना मान वाकडी करून व व पाठींत पोक काढून बसावें लागलें होतें.

मम्मा कमरेवर हात ठेवून म्हणाल्या, "आतां कसं गडे सगळं छान झालं!" संतुष्टपणें त्या हसल्या. आणि मग सगळ्यांच्या आरामांत काय कमतरता आहे तें शोधूं लागल्या. त्यांच्या छीद्रान्वेषी दृष्टीला ती आढळायला वेळ लागला नाहीं. त्या लडिवाळपणें म्हणाल्या, "गडे विभा, आतां आपण गडे सगळं सामान व्यवस्थित लावूं या."

"काय बुवा कटकट सारखी तुझी !" विभा पुटपुटला.

"इश्श गडे. असं काय रे विभा, मम्माचं नाहीं का ऐकायचं? फक्त एवढं हें सामानच नीट लावायचं आहे. तेवढं लावून झालं कीं खुशाल अगदी आरामात ताणून दे तूं, अं?" आणि मग सामान लावण्याचा समारंभ झाला.

"मनू गडे, जरा तूं थर्मास धर. अनु, बाळ तू माझी पर्स धर हं. प्रभा, ही बॅग आणि हा खाण्याचा डबा आपल्याजवळ घे तूं. आणि तुम्ही गडे पाय जरा बाजूला घ्या. जरा खालची बॅग काढायची आहे. काय म्हटलंत? तुझ्या डोक्यावर का ठेवूं पाय? खुशाल ठेवा. नाहीं तर गडे, जरा उठून तुम्ही बाजूलाच व्हा. खिडकींतून बाहेरची मौज पहा हं. मला वाटतं, तुम्ही सगळींच उठून जरा बाजूला व्हा. फक्त पांच मिनिटं. मग अगदीं खुशाल पाय पसरून बसा तुम्ही. माझं अगदीं काहीं म्हणणं नाहीं."

सगळें टिल्लू कुटुंब ताटकळत उभें राहिलें आणि मम्माच्या मनाप्रमाणें एकदा सगळें सामान लागलें. सुटकेचे सुस्कारे टाकून सारीं माणसें जाग्यावर बसली. मम्मानीं गोड हास्यानें सगळ्याचा राग घालविण्याचा प्रयत्न केला. आणि आतां अगदीं कोणाला त्रास द्यायचा नाहीं मला!' असा भाव चेहऱ्यावर आणून त्या विणकाम करूं लागल्या. पण पाच मिनिटांहून अधिक वेळ इतकें स्वस्थ बसणें त्यांना शक्य नव्हतें. थोड्या वेळानें वर मान करून त्या म्हणाल्या, "किती वाजले रे विभा?" त्याच्या हातांत घड्याळ होते. पण लहान सहान गोष्टींत दुसऱ्याला त्रास देण्यांत आणि स्वतःला त्रास करून घेण्यांत त्यांना फार सौख्य वाटत असे.

"चार वाजले. कां?" विभानें प्रश्न विचारला.

"नाहीं म्हटलं, टिफिन करून टाकूं या आतां. म्हणजे तेवढच रहायला नको गडे. तो थर्मास करतां का इकडे?" लाडिकपणें श्री. टिल्लूच्या पेपरच्या बाजूनें तोंड खुपसून त्या म्हणाल्या. खरें म्हटलें म्हणजे श्री. टिल्लू आपल्या संस्कृतींत तितकेसे मुरले नव्हते. त्यांचें पोट मोठें झालें होतें. कपडे साहेबी झाले होते. पण अजून त्यांचें मन गुळगुळीत, गुलगुलीत आणि कौटुंबिक झालें नव्हतें. ते खेंकसले, "आतां गप्प बसतेस कीं नाहीं तू? तासभर निवान्तपणें बसून रहा. मग बघूं खाण्यापिण्याचं."

खट्टू अगर नाउमेद होणें हा मम्मांचा स्वभाव नव्हता. त्यांनीं मनूचा गाल ओढून म्हटलें, "बघ तुझे पपा कसे चिडतात ते! चिडवा त्याना, चिडका बिब्बा म्हणून." पण पपांना चिडविण्यांत मनूला मौज वाटत नव्हती. आणि वाटली असती तरी त्यांना चिडविण्याचा त्याला धीर झाला नसता.

मग इतरांना आपल्या विश्वासात घेण्याचा प्रयत्न करून मम्मा खाजगी आवजांत म्हणाल्या, "पपांना नको आहे टिफिन. आपणच घेऊन टाकूं या हं." आणि त्यांनीं थर्मासला हात घातला.

पपांनीं गर्जना केली, "गप बसतेस कीं नाहीं?"

मम्मांचा नाइलाज झाला. आणि त्यानीं थोडा वेळ रागावल्याचा व संसारांतून लक्ष काढून घेतल्याचा आविर्भाव केला, पण त्याकडे कोणीच लक्ष न दिल्यामुळें त्याना अगदीं कोंडमारा झाल्यासारखे वाटलें. तितक्यांत प्रभानें मान मागें टाकली आणि कपाळाला बोट लावून ती छताकडे पाहूं लागली. असली संधी मम्मा सोडणें शक्यच नव्हतें. त्या डोळे विस्फारून आनंदानें ओरडल्या, "काय झालं प्रभा?"

प्रभानें नुसताच हात हलवला आणि ती छताकडे पहात राहिली. सगळ्यांचें लक्ष प्रभाकडे वळलें. तिला मळमळत असावें असा निष्कर्ष पंधरा मिनिटांच्या चर्चेनंतर निघाला. मम्मांनीं खिशांतली लवंग तिला दिली. विभानें रुमालानें तिचें डोकें घट्ट बांधलें. मनूनें तिला आपलें चॉकोलेट देऊं केलें. आणि त्याच्या बालिशपणाचें सगळ्यांनीं यथायोग्य कौतुक केलें. आजोबांनीं उत्साहानें वरून खालीं उतरण्याचा प्रयत्न केला. आणि त्या प्रयत्नांत लोंबकळून ते अनूच्या अंगावर पडले. अनू रडूं लागली, तेव्हां तिच्याहूनहि मोठ्यानें हसून आणि ओरडून तिला गप्प करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. अखेर मम्मांनीं खेकसून त्यांना गप्प बसवलें.

मम्मांच्या आनंदाला पारावार राहिला नाहीं. त्यांची टकळी अखंड चालू झाली—"तरी मला वाटत होतेच. कोणाला तरी मळमळायला लागणार. गाडींत आपली धांदल उडणार. कधीं माझं चुकायच नाहीं. दुसऱ्या कुणाच्या लक्षांत आलं नाहीं तें."

वाईट तें होईल अशी मम्मांची नेहमीं अपेक्षा असायची आणि तसें झालें

म्हणजे त्यांना विलक्षण आनंद व्हायचा. त्यांनीं ताबडतोब सारी परिस्थिति आपल्या काबूत घेतली. प्रभाला जबरदस्तीनें झोंपवलें. आणि तिच्या शेजारीं तिला खेटून त्या दाटीवाटीनें बसल्या. सगळ्या लोकांना हुकूम सोडून त्यानीं बेजार केलें. तिला औषध दिलें. सारखे प्रश्न विचारून तिला भंडावून सोडलें. आणि अखेर त्या कलकलाटानं आणि त्रासानें प्रभाला वांती झाली.

सारीं स्थिरस्थावर झाली. बाकीच्या माणसांनीं सुटकेचे सुस्कारे सोडले. विभा क्रॉसवर्ड सोडवूं लागला. वीस हजार रुपयाचें बक्षीस मिळून जीवनातील सगळे प्रश्न सुटतील अशी त्याची कल्पना होती. मग तो ऐटबाज कारमध्यें बसून...पपानीं जांभई दिली आणि डोळे मिटले. मनू व अनू चॉकलेट चघळूं लागलीं.

पण मम्माना निचळेपणें बसवेना. त्यांनीं थर्मास काढला. आणि खाण्याचा पसारा मांडण्याचे तयारीनं त्या हालचाली करूं लागल्या. मग बिस्किट तोंडात घालीत त्या म्हणाल्या, "आतांपर्यंत छान झाला प्रवास! आतां मुंबईला उतरल्यावर पाऊस नाहीं पडला म्हणजे झाल."

आणि मुंबईला उतरल्यावर नक्की पाऊस पडणार ह्या कल्पनेनें त्याना आनंदाच्या उकळया फुटत होत्या.

* * *

# आमची घोडी

११

मी लहान असतांना आमच्या दिवाणखान्यांत काकाच्या ऑफिसांतल्या लोकांचा फोटो फार महत्त्वाचा होता. त्यात काकाचा गोरा साहेब हसत हसत हारतुरे घेऊन बसलेला होता, आणि त्याच्या मागें जे माणसाचे मजले होते, त्यात दुसऱ्या मजल्यावर खुद्द आमचे काका होते. त्याना इतक्या उंचावरची जागा मिळाली, ह्यामुळें मला त्याच्याविषयीं फार आदर आणि दरारा वाटत असे. आणि त्यांच्या ऑफिसांतल्या मिशीवाल्या आणि शिवाजीच्या मावळ्या-सारखी पगडी घातलेल्या पट्टेवाल्याला सगळयांत वरच्या मजल्यावर जागा मिळावी हें मला योग्यच वाटायचें. त्या फोटोच्या शेजारीं माझ्या बाबांचा पगडी घातलेला फोटो होता. फोटोंतले काका बाबाच्या चष्म्याच्या भिंगाएवढेदेखील नव्हते, ह्यावरूनच बाबांच्या मोठेपणाची मीं कल्पना बांधली होती. आणि ह्या दोघाच्या फोटोच्या शेजारीं शिवाजीच्या चित्राला जागा मिळाली होती. त्यामुळें त्याच्याविषयीं मला बाबा-काकांच्याइतकाच आदर वाटत असे. कित्येक वर्षे त्याच्या घोड्याची टाप उचललेली होती आणि त्याची तलवार उगारलेली होती. सायकलवर बसण्यांतला मोठेपणा मीं अनुभवला असल्यामुळें, घोड्यावर बस-ण्यांत किती मोठेपणा असावा ह्याची कल्पना मला करतां येत असे.

शाळेंत गेल्यावर शिवाजीचा मोठेपणा माझ्या चांगलाच प्रत्ययास आला. कारण शाळेंत होणारें प्रत्येक व्याख्यान बहुधा शिवाजीच्या मोठेपणाविषयींच असे. आणि इतिहासाच्या पेपरांतील प्रत्येक प्रश्नाच्या उत्तराचा सारांश,

'शिवाजी हा शूर, मुसद्दी व ध्येयवादी होता,' असाच असे. शिवाजीचा हा एकंदर रुबाब पाहून अ पणदेखील शिवाजी व्हावें, ह्या कल्पनेचा जंतु माझ्या मनाला डसला. चालताना माझ्या कोपरांचीं टोकें बाहेर निघून लोकांना टोचूं लागलीं. हनुवटीवर बोट ठेवून मी पुष्कळदां विचारमग्न होऊं लागलो. अभ्यास करण्याचें विसरूं लागलों. काकांच्या माडीवर बसून त्यांनीं मांडी हलविल्यावर घोड्यावर बसल्याचा आनंद मिळविण्यात मला कमीपणा वाटूं लागला. आणि आईनें माझा मुका घेतला कीं शरमेनें मी बेचैन होऊन जात असें. अखेर आमच्या बिल्डिंगमधल्या गोऱ्या तरतरीत सदूनें जेव्हां मेळ्यांत शिवाजीचें काम करून टाळ्या घेतल्या, तेव्हा तर मोठेपणीं खराखुरा शिवाजी होण्याचा माझा निश्चय अगदीं कायम झाला.

माझा बेत मीं माझ्या तीनचार मित्रांना सांगितला. आणि त्याना तो पटलाही. त्या सगळ्यांनाच सदूचा हेवा वाटत होता. आणि माझ्या पैशाची ते भेळ खात असल्यामुळें, मीं शिवाजी व्हावें आणि त्यांनीं मावळे व्हावे हें त्यानीं कबूल केलें. शिवाजीप्रमाणें सोळाव्या वर्षी तोरणा जिंकायचा असे आम्हीं ठरवलें. तोरण्याला जायला लागणारे आगगाडीच्या तिकिटाचे पैसे आमच्या खाऊच्या पैशांतून गोळा करायची योजना आम्हीं आंखली. आणि त्या प्रमाणें आम्हीं रोज विलक्षण मनोनिग्रह करून दिडक्या सांठवूं लागलों. आपले पैसे भेळेवर खर्च करणाऱ्या मुलाकडे आम्ही तुच्छतेनें पाहूं लागलों. पण त्याचा त्यांच्यावर कांहींच परिणाम होईना. त्याचें भेळ खाणें चालूच राहिलें. त्यामुळें आम्हीं एकमेकांना बजावूं लागलों कीं, 'पहा हं, खायचं नाहीं,' आणि एकमेकांकडे संशयानें पाहूं लागलों. अखेर एकदां आम्हीं आमच्यांतल्या बंडूला चोरून भेळ खातांना पाहिलें. लगेच आम्ही त्याच्या अंगावर धावूनच गेलों. त्याची भेळ आम्हीं जप्त केली आणि ती खात खात त्याची निर्भत्सना करूं लागलो. पण त्या निर्भत्सनेचा त्याच्यावर कांहींच परिणाम होईना. उलट तो तुच्छतेनं आमच्याकडे पहात म्हणाला, "हॅः! तोरणा जिंकायला जायचं, आणि तें म्हणे आगगाडींतून! जसा कांहीं शिवाजी आगगाडींतून किल्ले जिकायला जात होता!"

त्याच्या ह्या युक्तिवादानें आम्ही नामोहरम झालों. आम्हाला कांहींच उत्तर सुचेना. थोडा वेळ आम्ही नुसतेच भेळ खात राहिलों. अखेर मीं म्हटलें,

"काय रे, मग कसा जाणार तूं तोरण्याला? चालत जाणार आहेस कीं काय?" माझ्या खोचक प्रश्नानें आम्हांला सर्वांना हसूं आलें.

पण बंडू शांतपणें म्हणाला, "कां? त्यात काय हरकत आहे? तानाजी नसे का चालत जात? तसं आपण जायचं. खिशांत एक भेळेची पुडी टाकायची आणि खात खात जायचं. रात्रीं झाडाखाली झोंपायच. सकाळीं उठून पुन्हा भेळ घ्यायची आणि खात खात चालायला लागायचं."

पुन्हा माझ्यावर थंड पडण्याचा प्रसंग आला. तरी मीं सारी अक्कल एकवटून म्हटलें, "पण शिवाजी कांहीं चालत नसे! तो घोड्यावर बसून हिंडायचा."

पण ही समस्या बंडूला मुळींच कठीण वाटली नाहीं. तो म्हणाला, "मग शिवाजीनं सांगावं आपल्या बाबाना एक घोडा विकत घेऊन द्यायला. नको म्हणावं सिल्कचा सूट. पण आपण बुवा शूर मावळ्यांसारखे आपले चालत येऊं."

ही सूचना सर्वांना इतकी समाधानकारक वाटली कीं, पैसे सांठविण्याचा निश्चय त्यांनीं तेथल्या तेथें सोडून दिला. आणि आपापल्या खिशांतून दिडकी काढून सगळ्यांनीं भेळवाल्याकडे मोर्चा वळवला. त्यामुळें मलाहि कुरकुरत खिशांत हात घालावा लागला.

बंडूचें ऐकण्यांत काहीं तरी चुकलें असें मला दिवसभर वाटत होतें आणि राग येत होता. आईनें दिलेल्या लाडवाकडे तिरस्कारानें पहातच मीं तो खाल्ला. आजी-जवळ नेहमींप्रमाणें लाडीगोडीनें साय न मागतां मी पाय आपटीत ओरडलो, "म्हणजे! आम्हांला साय द्यायची नाहीं कीं काय?" आणि रात्रीं बाबा आल्यावर त्यांच्या मांडीवर लोळण घेत मीं म्हटलें, "तें कांहीं चालायचं नाहीं अं! उद्यां तुम्ही ऑफिसातून येतांना मला एक घोडा घेऊन या!—"

"घोडा? अरे, पण तुझी सायकल आहे ना?" बाबांनीं आश्चर्यानें विचारलें.

"तुम्हांला काहीं समजत नाही. लाकडाचा घोडा नकोय कांहीं मला. खरा घोडा हवाय्." मीं बाबांचें अज्ञान दूर केलें.

"खरा घोडा?"

"हो हो, खरा घोडा! व्हिक्टोरियाला जोडतात तसा. आणि एक तलवार

—पण तलवार राहूं दे. आधीं घोडाच आणा तुम्ही !" एकदम पुष्कळ वस्तू मागायच्या नसतात हें समजण्याइतका मी धूर्त होतों.

मला खराखुरा घोडा हवा आहे, हें बाबांनीं आईला आणि काकाना सांगितले. आईनें आजीला सागितलें. काकांनीं काकूला सांगितलें. काकूनें शेजाऱ्यांना सागितलें. सगळ्यांनीं एकमेकाना सागितलें. आणि सगळीं हसूं लागली. त्यांनी का हसावे तें मला समजेना. आणि जो तो जेव्हां तेव्हा मला 'घोडा आणला का' असें साभिप्राय विचारूं लागला, तेव्हा मी अगदीं चिडून गेलो.

दोन दिवसानीं, बाबा घरीं आल्यावर मीं त्याचे बूट लपवून ठेवले आणि मला घोडा मिळाल्याशिवाय बूट परत मिळणार नाहीत, असे निर्धारानें त्याना सांगितलें.

बाबा म्हणाले, "अरे ! घोडा काय ? आत्तासुद्धा घेऊन येतां येईल. पण त्याला बांधायचं कुठें तें ठरवलं पाहिजे ना ? त्याची काय ती व्यवस्था तूं कर."

मी गंभीरपणें विचार करूं लागलों. अनेक कल्पना माझ्या मनांतून धावू लागल्या. मीं त्यांना विचारलें, "समोर रस्त्यावरच्या दिव्याच्या खांबाला बांधून ठेवला तर ?"

"वा रे वा ! आणि रात्रीं आपण झोपल्यावर त्याला कुणी सोडून नेल तर ?" बाबांनीं शंका काढली.

हो ! तेंहि खरेंच होतें. मी पुन्हा विचार करू लागलों. मग मीं भीतभीत विचारलें, "घोड्याला जिना चढतां येतो का ?"

"घोडा ? आणि जिना चढणार ? हो ! तूं खांद्यावरून त्याला वर आणलस तर चढेल तो जिना."

ह्यामुळें मी अगदीं ओशाळून गेलों. आणि मग इतक्या गंभीरपणें विचार करूं लागलों कीं, बाबांच्या माडीवर मला रेलून बसावें लागलें आणि अखेर मला झोप लागली.

त्यानंतर दोन दिवस मीं खूप विचार केला. समोरच्या दूधवाल्याला, त्याच्या दुकानांत आमच्या घोड्याची सोय होईल का, असें विचारावेंसें वाटलें. पण दोन दिवसांत मुळीं आईनें मला त्याच्याकडे दूध आणायला पाठवलेंच नाहीं.

आणि 'शाळेच्या आवारात घोडा बाधायला काय हरकत आहे,' असाहि विचार माझ्या मनात आल्यावाचून राहिला नाहीं. माझा घोडा तेथे बाधलेला आहे आणि मी मुलाना 'त्याला हात लावूं नका' असें दरडावून सागत आहें, असें सुखस्वप्न माझ्या नजरेसमोरून तरळून गेलें. पण आमच्या शाळेचा घोड्ठ शिपाई मला हेडमास्तराच्या खोलीच्या आसपासहि जाऊं देईना. अखेर मला कल्पना सुचली कीं, धोडयाला आमच्या गावी नेऊन ठेवावें. आमच्या सोनी गाईच्या शेजारीं त्याला बाधून टेवावें. सोनी गाय मारकुटी असली तरी घोडयाला मारायची नाहीं. घोडा मारील लाथ आणि टाकील तिला पाडून! अशी मीं मनाची समजूत करून घेतली.

संध्याकाळीं बाबा आल्यावर मीं त्याच्या खिशांतील घडयाळाचा कब्जा घेत म्हटलें, "बाबा! बाबा! आपला घोडा आपण गोदवल्यालाच नेऊन ठेवूं या. तिथें आपला गोठा आहे. आणि शिवाय गवत पण आहे तिथें त्याला खायला. नाहीं तर तुम्ही पुन्हा विचाराल, कीं घोड्याला गवत कुठून आणा-यचं म्हणून."

"अरे, पण त्याला गोंदवल्याला नेणार कोण? माझं तर ऑफिस आहे चालूं."

मी पाय आपटीत ओरडलों, "तें कांहीं चालायचं नाहीं हं बाबा. तुम्ही सुट्टी घ्या आणि आपण त्याला घेऊन जाऊं गोंदवल्याला. म्हणे कोण नेणार? शहाणेच लागून गेलात कीं नाहीं तुम्ही?"

ह्यावर बाबानीं आपल्या डोक्यांत आतां प्रकाश पडला असा चेहरा केला आणि ते म्हणाले, "आतां उद्यां मात्र नक्की घेऊन येतो घोडा."

दुसऱ्या दिवशीं मी गॅलरींतून अगदीं टक लावून बाबांच्या येण्याच्या मार्गा-कडे पहात राहिलों. पण बाबा पुन्हा आपले एकटेच घरीं आले. मी अगदीं कावून त्यांच्या अंगावर धावून गेलो; पण त्याच्या आधींच बाबा तोडाचा चबू करून म्हणाले, "आज अगदीं बाजारांत गेलो होतो, एक घोडा पसंत देखील केला होता पण तेवढ्यांत प्रश्न पडला कीं तुला कुटच्या रंगाचा घोडा हवाय्. तांबडा, कीं काळा कीं पांढरा?"

—बाबांनीं अशा अनेक अडचणी काढल्या. मला रेसचा वेगानें धावणारा घोडा

हवा असला तर थांबावें लागेल, कारण रेस सध्या पुण्याला आहे, असें त्यांनीं सांगितलें. आणि अखेर उन्हाळ्याच्या सुटींत आम्ही गोंदलवाल्याला गेलों तेव्हां-देखील घोडा घेतलेला नव्हताच. पण मुंबईहून घोडा पाठवून द्यायला सांगितलें आहे असें आश्वासन मात्र बाबा देत होते. इतक्या दिवसांच्या विलंबामुळें माझीहि घोड्याविषयींची उत्सुकता कमी झाली होती. गांवच्या निराळ्या वातावरणांत मी रमलों होतो. पण असाच एक दिवस मी अंगणांत खेळत असतांना एक माणूस तट्टू घेऊन येतांना मला दिसला.

मीं धावत जाऊन बाबांना बाहेर ओढून आणीत म्हटलें, "बाबा, तो पहा घोडा येतोय्. माझ्याचसाठीं हो तो!"

"थांब! गडबड करूं नको. आता थोडा वेळ गुपचुप बसून रहा." बाबा म्हणाले. माझा आज्ञाधारकपणा त्या वेळीं अगदीं शिगेला पोहोंचला होता. मीं गुपचुपपणें घरांत जाऊन सगळ्यांना माझ्याकरिता घोडा आणल्याची रम्य बातमी सांगितली. मग मीं झोंपाळ्यावरून, खाटेवरून आणि अखेर गाद्यांच्या ढिगाऱ्यावरून उड्या मारल्या आणि सगळ्या गाद्या जेव्हां कोसळून पडल्या, तेव्हां गुपचूप बाबांच्या शेजारीं जाऊन बसलों.

तेवढ्या वेळांत तो धनगर आमच्या अंगणांत येऊन दाखल झाला. कडेच्या एका खांबाला तो टेकून बसला. डोक्याचें मुंडासें काढून त्यानें तोंडाचा घाम पुसला आणि प्यायला एक लोटाभर पाणी मागितलें. त्याचें घोडें त्याच्यामागें आज्ञाधारकपणें उभें होतें. मध्येंच त्याची चलाख नजर आजीच्या वाळवणांवर पडली; पण धनगर खांकरल्याबरोबर त्यानें आज्ञाधारकपणें पुन्हा मान खालीं घातली. मधूनमधून फुर्र फुर्र करून टापेनें तें अंगण उखळूं लागायचें, पण धनगर ओरडला कीं ते गप्प रहायचें.

बाबा पुढें झाले आणि घोड्याच्या पोटाकडे पहात म्हणाले, "घोडी दिसते आहे."

धनगर म्हणाला, "व्हय जी."

माझी निराशा झाली. स्त्री-जातीविषयीं मला तिरस्कार वाटत असे. दोन वेण्या घातलेल्या मुली पाहिल्या कीं, त्यांच्या वेण्यांची गाठ मारून त्यांना खिळ्याला टांगून ठेवावें असें मला वाटे. आणि तोंडाला पावडर लावणाऱ्या

बायांचा मी आजीच्या बरोबरीनें निषेध करीत असें. मुली जशा जोरानें धावूं शकत नाहीत, त्याप्रमाणें घोडीसुद्धां वेगानें पळूं शकणार नाहीं अशी माझी खात्री होती. पण हे सर्व विचार मीं त्या वेळीं दाबून टाकले. कारण कांहींच नसण्यापेक्षां घोडी असलेली बरी.

बाबांनीं विचारलें, "किती वर्षांची आहे ही?"

धनगर डोकें खाजवीत म्हणाला, "ल्हान हाय अगदीं. नवीनच."

बाबा म्हणाले, "दोन वर्षांची?"

"हां." धनगराची मुंडी हलली.

"कीं तीन वर्षांची?"

"हां, त्येंच." पुन्हा धनगराची मुंडी हलली.

मग बाबांनीं काकांना हांक मारली. दोघांचा विचारविनिमय झाला. मग काकांनीं पुढें होऊन घोडीचे दांत पाहिले. कमरेवर हात ठेवून दोघांनीं पुन्हा विचारविनिमय केला. दांतांवरून घोड्याचें वय कळतें म्हणे.

तेवढ्यांत मीदेखील घोडीचे दांत पहायला पुढें सरसावलों. पण घोडीनें असें कांही जोरांत 'फुर्रर' केलें कीं लांबूनच 'च्-च्' करून मला समाधान मानावें लागलें.

मग बाबांनीं विचारलें, "किती वाढेल ही?"

"अं?" धनगरानें विचारलें.

"उंच किती होईल?" काकांनीं हात करून विचारलें.

"म्होप. लय वाड हाय तिला!" धनगर म्हणाला.

"दोन मुठी वाढेल?" काकांनीं विचारलें.

बाबा म्हणाले, "दोन मुठी काय म्हणतोस रे? चार मुठी तरी वाढेल."

"व्हय! वाडल कीं!—चार मुठी वाडल." धनगरानें आशीर्वाद प्रदर्शित केला.

काका वृत्तीनें संशयी. ते म्हणाले, "काय रे! पायांत खोडबीड नाहीं ना? जरा फिरवून आण बरं समोरून."

धनगरानें घोड्याची दोरी खाद्यावरून घेतली आणि दुडुदुडु एक रिंगण मारलें. धनगराच्या मागे घोडें धावत होतें, आणि त्याच्यामागे मी धावत होतों. एवींतेवीं घोडें फिरवायचेंच होतें, तर मला पाठीवर बसवून तरी फिरवायचें होतें. पण मोठ्या माणसांच्या ध्यानात ह्या गोष्टी येतच नाहींत.

"घोडयाचं खाणं म्हणजे गवत आणि हरभरा. कीं आणखी कांही खातं रे घोडं?" बाबांनीं प्रश्न केला.

"धनगराचं घोडं त्यें साहेब. समद खात! करड, गवत खातं. पेंढा खातं. हरभरा खात." धनगरानें रंगवून वर्णन केलें.

"काय? पेढा पण खातं?" काकांनीं आश्चर्य व्यक्त केलें.

"सुतारफेणी पण खातं का?" मला पण प्रश्न विचारणें अवश्य वाटलें.

"बसतबिसत नाहीं ना तें?" काकांनीं आणखी एक संशय व्यक्त केला.

मला काकांचा राग येऊं लागला. ते स्वतः नेहमीं आरामखुर्चीत पाय ताणून बसलेले असत, आणि घोडयानें मात्र बसायचें नाहीं! हा काय न्याय होता?

"च्छा! बसल कसं घोडं! त्यें काय गाडव हाय का ढोर हाय! असं जनावर सांपडायचं नाहीं साहेब. पोटच्या पोरावानी वाढवलंय् त्येला; आतां पैशाची लय् नड आली म्हणून इकायला काढलं. न्हाई तर काय जड झालं व्हत का काय मला?" धनगरानें सात्त्विक कळवळ्यानें भाषण केलें. त्यानें प्रेमळपणें घोड्याचें तोंड आपल्या बगलेंत धरलें.

तें घोडें आपण खरेदी केल्यावर आतां पोरकें होणार ह्या कल्पनेनें मला गहिंवरून आलें, आणि त्याची फार काळजी घेण्याचें मीं ठरवलें.

बाबांनीं विचारलें, "बरं, काय घेणार ह्याचं तें बोल."

धनगर अंमळ स्वस्थ बसला. आणि मग म्हणाला, "तुम्हीच सांगा साहेब, आमी काय अडानी मानसां!"

अशी थोडी टोलवाटोलवी झाली. आणि मग धनगरानें पन्नास रुपये किंमत सांगितली.

काकांनीं त्याला वीस रुपये देऊं केले.

धनगराला आश्चर्याचा धक्काच बसला. आपल्या पोरासारख्या असलेल्या घोड्याला अवघ्या वीस रुपयाना विकावें लागावें, ह्यामुळें त्याला गहिंवर आला. आपलें एक घोडें आपण शंभर रुपयाना कसे विकलें होते, तें त्यानें रसभरितपणें सागितलें. जायच्या तयारीनें त्यानें डोक्याला मुडासें बाधलें.

तो जाणार या कल्पनेनें मी कावराबावरा झालो. काकांच्या निष्ठुरपणाबद्दल मला विलक्षण राग आला. आपल्या पोटच्या पोरासारख्या असलेल्या घोड्याला निव्वळ गरिबीमुळें एक धनगर विकायला तयार झाला असताना, त्याला अवघे वीस रुपये देऊ करणें ही मला कठोरपणाची परिसीमा वाटली. मीं वाचलेल्या पुस्तकात गरीब माणसें नेहमींच सालस आणि श्रीमंत नेहमींच दुष्ट दाखवलेली असत.

मीं काकांना म्हटलें, " देऊन टाका ना त्याला पैसे!—गरीब आहे तो. " पण काकांनीं खेकसून मला हाकलून काढलें.

अखेर काकांनीं पंचवीस रुपये देऊ केले. धनगरानें शेवटचा शब्द म्हणून तीस रुपये मागितले आणि तो घोडी घेऊन चालायला लागला.

तेव्हा मात्र माझ्यानें रहावेना आणि मीदेखील त्याच्यामागून रडतरडत धावूं लागलो.

तें पाहून बाबा म्हणाले, " बरं, जाऊं दे. देऊन टाक तीस रुपये त्याला. "

काका कुरकुरले, " तो आला असता मागे. "

डोळे पुशीत पुशीत मी बाबांना बिलगलो, आणि घोडीची खरेदी झाली.

धनगरानें पैसे मुंडाशांत बांधले आणि मग त्यानें विचारलें, " शिकारी कुत्र्याच पोर हवंय का ? पांच रुपयांना देतो. "

आतां इतके पैसे मिळालेले असतांना, पोटच्या पोराप्रमाणें असलेलें आणखी एक जनावर तो कां विकतो आहे ते मला कळेना. आणि काकांनीं नको म्हणून सांगितलें तरी तो जास्त जास्त गळ घालूं लागला. अवघ्या दोन रुपयांना कुत्र्याचें पोर त्यानें देऊं केलें. आणि निक्षून नको म्हणून सांगितलें असतांना ' चार दिवसानीं दाखवायला आणतों, ' असें म्हणून तो निघून गेला. आपल्या पोटच्या पोरासारख्या असलेल्या घोडीचें त्यानें अखेरचें चुंबनदेखील घेतलें नाहीं अगर तिच्या पाठीवरून हातहि फिरवला नाहीं.

घोडें खरेदी केलें असें कळतांच आजी कमरेवर हात ठेवून, सोवळें सांवरीत बाहेर आली. तिला माहीत असलेलीं सगळीं शुभचिन्हें त्याच्या ठिकाणीं आहेत कीं नाहीं याची तिनें खात्री करून घेतली. जनावर विकत घ्यायला आजचा दिवस अशुभ, अशी कुरकुर केली आणि अखेर तिनें मीठमोहऱ्या तिच्यावरून ओवाळल्या. त्या चुलीत टाकायला जाताना ती हसून म्हणाली, " मेल्ये, माझी वाळवणं खाल्लीस तर याद राखून ठेव हो. " त्यावरून आम्हीं ओळखलें कीं, आजीला घोडी आवडली.

तेवढ्यांत आई स्वयंपाकघरातून बाहेर आली आणि पडवीत उभी राहून म्हणाली, " शेपटी तरी किती लांब आहे मेलीची. कापून तरी टाकायला हवी. नाहीं तर धावताना पायात अडकून पडेल मात्र. "

बाबा म्हणाले, " शहाणीच आहेस ! अग, लांब शेपटी असेल तितकी माशा उडवायला चांगली. "

आई म्हणाली, " माशा काय तोंडानं उडवतां येत नाहीत कीं काय ? कुत्रा नाहीं का तोंडानं माशा हाकलीत ? "

बाबा म्हणाले, " अग, पण तोंड सगळीकडे पुरतं का ? "

आई म्हणाली, " मग शेपटी तरी काय सगळ्या अंगभर पुरते वाटतं ? "

बाबा म्हणाले, " मूर्ख आहेस ! "

बाबांना आईनें निरुत्तर केलें कीं ते नेहमीं तिला असेंच म्हणत असत; आणि तें तिला आवडत असे. मग बाबांना कांहीं तरी आठवलें आणि ते म्हणाले, " तुला वाटलं तर तुझ्या मुलीचे केस बॉब कर, पण माझ्या घोडीची शेपटी मात्र कापायची नाही हं. "

घोडी माझ्याकरिता घेतलेली असतांना बाबा तिच्यावर आपला मालकी हक्क सांगतात ह्याचा मला राग आला.

तेवढ्यांत काकू पदरानें तोंड पुशीत बाहेर आली. ती अंगणांत उतरून काकांच्या मागें उभी रहात म्हणाली, " वा ! मोठी छानच दिसते हो घोडी ! आणि आयाळ तरी कशी आहे पहा ! आयाळीच्या वेण्या घातल्या तर गडे छान दिसेल, नाहीं का ? "

काकांना कांहीं तरी अनुरूप उत्तर द्यायचें होतें; पण तें त्यांना सुचेना. म्हणून ते विनोदानें म्हणाले, "भलतीचकडे डोकं चालत असतं तुझं!"

काकूला वाटलें कीं ते रागानें बोलले. म्हणून ती हिरमुसली होऊन घरांत गेली. पण घोडी बघायची इच्छा अपुरीच राहिल्यामुळें पुन्हा बाहेर आली.

थोड्या वेळानें घोडीचें कौतुक संपलें आणि सगळीं माणसें इकडेतिकडे निघून गलीं. घोडीपुढें गवत टाकलेलें होते; पण तें ती खात नव्हती. तें नुसते तोंडानें उसकटीत ती इकडेतिकडे बघत होती. निरनिराळ्या आवाजाच्या दिशांना कान वळवीत होती. अंगावर माशा बसल्या कीं तिचें अंग थरकायचें आणि शेपटी हलायची. तिचे टपोरे पाणीदार डोळे पहाता पहातां मला वाटलें कीं तिच्या डोळ्यांतून पाणी आलें आहे.

माझें अंतःकरण तिच्याविषयींच्या प्रेमानें गद्‌गदून आलें. मीं गवताची लहानशी पेंडी केली आणि भीत भीत ती तिला देऊं केली. नंतर पुढें होऊन तिच्या पाठीवरून हात फिरवावा, तिच्या आयाळीशीं खाजवावें आणि तिच्या कानात 'मी तुला हरभरे घालीन' असें सागावें, असें माझ्या मनांत होतें.

घोडीनें माझ्या हातांतल्या गवताच्या पेंडीकडे पाहिलें. मग इकडेतिकडे नजर फिरविली, आणि आसपास कोणी नाहीं अशी खात्री करून घेतल्यावर तिनें आपला एक कान दुष्टपणें पाडला, आपले रबरी ओंठ विचकून आपले जबरदस्त दात मला दाखविले आणि ती माझ्या अंगावर चाल करून आली.

त्या अनपेक्षित आणि दुष्टपणाच्या हल्ल्यानें मी अगदीं गागरून गेलों. मागे उडी घेतली आणि पायांत पाय गुरफटून पडलों. घोडी तशीच पुढें आली. तिचे जबरदस्त दात माझ्या शरीराच्या अगदीं जवळ आले. माझ्या शरीराचा आतां लचका तोडला जाणार ह्या कल्पनेने मी किंचाळणार होतों, पण इतक्यात आमच्या गड्याची चाहूल लागली. त्यासरशी घोडी एकदम मागे झाली आणि निरुपद्रवीपणें गवत हुंगूं लागली. मीदेखील मग चलाखीनें उठलों आणि धासपटलेल्या अंगावरून हात चोळीत घरांत पळालो.

थोड्या वेळानें मीं अगदीं सहजगत्या म्हणून बाबांना विचारलें. "बाबा, घोडे चावतात का हो?"

"चावतात ? एका घोड्यानें आपल्या मोतद्दाराच्या बोटाचा तुकडा पाडलेला मीं स्वतःच्या डोळयांनीं पाहिला आहे." बाबा गोष्टी सागण्याच्या रंगांत येऊं लागले. त्यांनीं सांगितलेल्या सगळया गोष्टी घोडयांच्या दुष्टपणाच्याच होत्या. मीं त्या फार गंभीरपणें ऐकून घेतल्या, आणि हळूहळू घोडयावर बसण्याचा माझा उत्साह मावळत चालला. तोरणा किल्ल्यावर चढायला घोडा एकंदरींत निरुपयोगीच. तिथे पायानींच चढायला हवें असे विचार माझ्या मनात येऊं लागले.

बाबाना मात्र इतक्या गोष्टी सांगितल्यावर विशेष उत्साह वाटूं लागला. त्यांनीं बाहेर येऊन घोडीच्या पाठीवर एक थाप मारली. आणि तिनें ती मारून घेतली ! त्यांनीं एक गोणपाट तिच्या पाठीवर बांधले. मग तिच्या तोंडांत लगामी ऐवजीं एक जाडशी वादी दिली.

आई भिऊन म्हणाली, "म्हणजे ! तुम्ही घोडीवर बसणार कीं काय ?"

बाबा मागे वळून म्हणाले, "मग ? तुला बसविण्याकरता ही तयारी चालली आहे असं तुला वाटल कीं काय ?"

"इश्श ! पण खोगीरसुद्धा धड नाहीं आणि घोडं आहे अजून शिकाऊ..."

पण बाबांनीं घोडीवर उडी टाकली. त्यांचें वजन इतकें होतें कीं घोडी थोडीशी खालीं दबली. बाबाचें ते कृत्य पाहून मला इतका आनंद झाला आणि स्फुरण चढलें कीं मींदेखील टुणकन् झोपाळ्यावर उडी मारली आणि एका कडीभोवतीं दोन्ही पाय टाकून घोडा हाकल्याचा आनद अनुभवूं लागलो.

आई भ्यायलेल्या स्वरांत म्हणाली, "मी आपली घरांतच जातें कशी !"

बाबांनीं लगाम खेचली आणि घोडी व्यवस्थितपणें चालूं लागली. एक रंगण मारून बाबा परत आले तशी काकू म्हणाली, "वा ! घोडी कशी छान चालते आहे !" आणि मीं ओरडून गलका केला.

तशी मला ओरडूं नको असें सागण्याच्या निमित्तानें आई बाहेर आली आणि कौतुकाने बाबाच्या घोडदौडीकडे पहात राहिली.

बाबानीं दोनतीन रंगणें घेतल्यावर मला झोपाळ्याच्या कडीभोवतीं पाय घालून बसणें अशक्य झालें आणि मी ओरडलो, "हें काय हो बाबा ? तुम्हीच एकटे एकटे काय बसतां ? मला बसवा ना आतां घोडयावर."

तें ऐकल्यावर बाबा आणखी एक रंगण घेऊन आले आणि मग धडपडत खाली उतरून त्यानीं मला वर बसवलें व घोडीला थोडेंसें फिरवलें. पण तेवढ्याच वेळात घोड्यावर बसण्यांतले अनेक धोके माझ्या ध्यानांत आले. घोडीनें चावटपणें मान जर खाली केली तर मनुष्य सरकत सरकत पुढें पडण्याचा संभव असतो. शिवाय गोणपाट सरकून आपण एका बाजूला पडण्याचा संभवहि कांही कमी नसतो. आणि मध्येंच घोडीनें उडी मारली तर वर उडालेला मनुष्य पुन्हा घोड्याच्या पाठीवरच व्यवस्थित पडेल असें सांगतां येत नाहीं. खालीं पडल्यावर आपल्या माडीखाली घोडा नाही असें आढळून येण्याचाच संभव फार!

मीदेखील घोड्यावर बसलेला पाहून काकूला रहावेना. ती काकांना म्हणाली, "घोडीवर बसायचं नाहीं का?"

काका म्हणाले, "अग! सगळ्यांनीं का एकदम बसायचं आहे? त्याचं आज कसं काय होतय् तें पाहू या! मग उद्यां मी बसेन. आणि खोगीर आणल्याशिवाय तसंच बसण्यात अर्थ नाहीं; आणि त्यात मजा पण येत नाहीं!"

काकू मान उडवून म्हणाली, "हं."

त्या दिवशीं बाबा पुन्हा पुन्हा घोड्यावर बसून रंगणें घेत होते. आणि मला घोड्यावर बसायला मिळत नाहीं, म्हणून मी अगदीं कावून गेलो होतो.

संध्याकाळ झाली तशी मात्र बाबा आपले आरामखुर्चीत बसून राहिले. जागचे उठतच ना. जेवायची वेळ झाली म्हणून आईनें त्याना सांगितलें तेव्हां त्यांनीं उठण्याचा प्रयत्न केला. पण 'ओऽय' असें ओरडून ते पुन्हा मटकन् खाली बसले. घरांतलीं सगळीं माणसें बाबांच्या भोवतीं जमा झालीं. आई पुटपुटू लागली, "मग दिवसभर सांगितलं होतं कुणी घोड्यावर बसायला! लहान मुलासारखा नादिष्टपणा करायचा आणि मग हें असं...काहीं नाहीं. उद्यां पोचवूनच टाकायला हवी ती घोडी."

तें ऐकून मी धास्तावून गेलों. आणि बाबांना उठवण्याच्या अनेक युक्त्या योजूं लागलों. एकदां वाटलें कीं आरामखुर्चीला मागून नेट देऊन ती उभी करावी, म्हणजे बाबा आपोआप उभे रहातील. एकदां वाटलें कीं—

पण तेवढ्यांत बाबा म्हणाले, "हात द्या रे पोरांनों." तेव्हां आम्हीं

सगळ्यांनीं बाबांना हात दिला. खरा जोर काकांचा, पण आमचाहि हातभार होताच. 'ओय ओय—' करीत बाबा उभे राहिले. मग बाबा कमरेवर हात ठेवून हळूहळू चालत म्हणाले, "तसं कांहीं विशेष नाहीं. पण खोगीर आणायला हवं, म्हणजे मग नीट बसतां येईल." तेवढ्यांत पायरी चढण्याचा प्रसंग आला आणि बाबा ओरडले, "ओय्, उय!"

आम्ही सगळीं हसलों. पण आईला मात्र राग आला, आणि ती जास्तच पुटपुटूं लागली.

बाबा उठले खरे, पण आतां त्यांना बसतां येईना. अखेर ते उभ्याउभ्याच जेवले आणि मग तसेच झोपले. तेव्हां आई लगबगीनें गरम पाण्याची पिशवी आणि तेलाची बाटली घेऊन खोलींत आली.

काका काकूला म्हणाले, "पाहिलंस? कुठचीही गोष्ट जपून व्यवस्थितपणें करावी."

दुसऱ्या दिवशीं काकांनीं कोणाकडून तरी खोगीर आणलें आणि तें घोडीवर घालून ते तिला दूर घेऊन जाऊं लागले. मीदेखील आशाळभूतपणें त्यांच्या मागून जाऊं लागलों. पण त्यांनीं मला हुसकावून लावलें. मग वाईट तोंड करून मी मागे आलो आणि ते गेले त्या दिशेकडे नजर लावून बसलों.

थोड्याच वेळानें घोडी एकटीच उधळत जातांना मला दिसली. मीं तें बाबांना सांगितलें, तेव्हां त्यांनीं गड्याला पिटाळलें आणि आपणहि कमरेवर हात देऊन ते चालूं लागले. काकूला जावें कीं न जावें तें समजेना. जागच्या जागींच तिची तगमग झाली. मीं अर्थातच गड्याच्या मागोमाग धावलों.

आम्हीं पाहिलें तो काका निवडुंगांत पडले होते आणि उठण्याचा अयशस्वी प्रयत्न करीत होते. त्यांचें धोतर फाटलें होतें आणि त्यांच्या अंगभर ओरखडे उठले होते. रक्त येत होतें. आम्हीं त्यांना उभें केलें आणि हळूहळू चालवत घरीं आणूं लागलों. काका कण्हत कण्हत बोलत होते, "हलकट, डांबीस जनावर आहे! धनगरी जनावराची जातच वाईट असते!" मग ते माझ्यावर खेंकसून म्हणाले, "तूं मात्र आतां घोडीवर बसूं नको हो. नाहीं तर घरांतल्या माणसांचा डोळा चुकवून बसशील आणि कपाळमोक्ष करून घेशील."

मला उगीच कां बोलणीं बसावींत तें मला कळेना. मीं तोंड वाईट केलें

पण तेवढ्यांत बाबांनीं माझ्याकडे पाहून डोळे मिचकावले आणि मग मला सगळं समजलें. आम्हीं काकांना खोलींत नेऊन झोंपवलें आणि काकू लगबगीनें आयोडिनची व तेलाची बाटली घेऊन खोलींत गेली.

त्यानंतर चार दिवस अर्थातच घोडीवर बसण्याबद्दल गोष्ट काढणें शक्यच नव्हतें. त्यामुळें घोडीवर बसायची व प्रसंग पडल्यास पडायची माझी उत्सुकता मला दाबून धरावी लागली; पण नंतर मात्र मी हळूहळू कुरकुरूं लागलो. 'गड्यानं घोडी धरल्यावर वर बसायला काय हरकत आहे?' असें मी म्हणू लागलों. आणि बाबांचा विशेषसा विरोध नाहीं असें पाहून मी रडूं लागलो, ओरडूं लागलो, जमिनीवर गडबडां लोळूं लागलों आणि अखेर अन्नसत्याग्रह केला.

शेवटीं घोडीवर बसायची परवानगी मला मिळाली. मात्र गडी बरोबर हवा अशी अट घालण्यांत आली. दोनचार दिवस अशा प्रकारें मी घोडीवर बसलो. आणि मग एक दिवस गड्याला म्हटलें, "तूं आतां घोडी सोड, नि जवळ उभा रहा. म्हणजे पडलोबिडलो तर सावरतां येईल."

गड्यानें खूप कुरकुर केली. 'आपुन नाय बा' असें सतरा वेळां म्हटलें आणि अखेर तो कबूल झाला. मी घोडीला त्याच्या भोवतींभोवतीं फिरवली आणि ती अगदीं मुकाट्यानें आणि व्यवस्थितपणें फिरली. बाबांनीं तें पाहिलें, पण न रागावता उलट त्यांनीं शाबासकीचा उद्गार काढला. त्यामुळें मला जोर आला. मी घोडीला वळवून लांब घेऊन जाऊं लागलों—गड्याच्या ओरडण्याला न जुमानतां!

घर दृष्टिपथांत होतें तोंपर्यंत घोडी अगदीं साळसूदपणें चालत होती. पण घर दृष्टीआड होतांच तिनें चावटपणा सुरू केला. ती जागच्या जागीं उभी राहिली आणि तिनें मान खाली घातली. उद्देश हा कीं मी घसरून पडावें. पण मीं कसेंबसें स्वतःला सावरलें. लगाम खेचून धरला आणि टांच मारली, तशी वेड्यावाकड्या उड्या मारून ती स्वतःभोवतीं गरगरां फिरूं लागली. मानेला हिसके देऊं लागली. मला भीति वाटूं लागली. घोडीवरून उतरावेंसें वाटूं लागलें. पण उतरतां येईना. शिवाय उतरल्यावर ती चावेल अशी धास्ती वाटूं लागली. मी तसाच चिकटून बसलों आणि प्रेमानें घोडीला चुचकारूं लागलों.

पण माझ्या प्रेमळपणाचा तिच्यावर परिणाम होईना. मी उतरत नाहीं, असें पाहून घोडी स्वतःभोवतीं फिरायचीं थांबली आणि एकदम सरळ धावूं लागली, पण ती निवडुंगांच्या अगदीं कडेनें. त्यामुळें माझा एक पाय सोलून निघूं लागला. मी ओरडूं लागलों आणि खालीं उतरण्याकरितां सगळी शक्ति एकवटूं लागलों.

तेवढ्यात दुरून खिंकाळणें ऐकूं आलें. एक घोडा टक लावून आमच्या घोडीकडे पहात होता व टापेनें जमीन उकरीत होता. आमची घोडीदेखील थबकली. त्याच्याकडे टक लावून पहात खिंकाळली. मग तो घोडा एकदम उधळल्यासारखा आमच्या दिशेनें धावू लागला. मी तर इतका भेदरून गेलों कीं मला ओरडतां येईना व खालीं उतरताहि येईना.

पण तेवढ्यांत आमच्या घोडीनें तो प्रश्न सोडवला. ती एकदम मागल्या दोन पायावर उभी राहिली. तिचे पुढचे दोन पाय हवेंत उडाले. काय होतंय् तें समजण्यापूर्वीच मी जमिनीवर आदळलों आणि माझें डोकें कचकन् एका दगडावर आपटलें.

माझ्या दिशेनें दोनचार लाथा झाडून घोडी पसार झाली.

मी कमरेवर हात देत उठून उभा राहिलों, तेव्हां घोडा आणि घोडी एक-मेकाच्या नाकाजवळ नाक आणून उभीं होतीं. मग एकदम आमची घोडी फिरली आणि पळत सुटली. घोडा तिच्या मागोमाग पळत सुटला. त्यांच्या त्या पळापळीच्या खेळाचा मला उलगडा होईना.

पण नंतर जेव्हां सिनेमांत मी नायिकेमागे नायक हसत खिंकाळत धावतांना पाहिला, तेव्हां मला उलगडा झाला कीं आमची घोडी प्रेम करीत होती!

* * *

# वाघाची शिकार १२

एप्रिल आणि मे महिन्यांच्या मोसमात बखेडें गांवांत दर वर्षी अनेक माणसाची आयात होत असते. मुंबईला शाळेंत जाणारीं मुलें खायला आणि उनाडायला येतात. कॉलेजात जाणारीं पोरें, त्यांनीं अधिक उनाडक्या करूं नयेत म्हणून बखेड्यास आणली जातात. मुबईला नोकरी करून बखेड्याच्या शेतीचा व बागाइतीचा खर्च चालवणारे लोक, उत्पन्न कांहीं नाहीं तर निदान आबे-गरे तरी खाऊ अशा हिशोबानें रजा काढून येतात आणि पांचपन्नास रुपयांचे आबे-गरे फुकट मिळावे म्हणून शेंदोनशें रुपयांचा खर्च करतात. लग्न करून दिलेल्या मुली, आपल्या नवऱ्याचें व मुलाचें प्रदर्शन करायला येतात. आणि निदान पांचपंचवीस जांवई तरी स्वतःच्या अकलेचें प्रदर्शन करीत ह्या दिवसांत बखेड्यांत वावरत असतात.

ह्या दिवसांत बखेड्यांत दूध, भाजी व मोलकरणी ह्या गोष्टी महाग होतात. वडाच्या झाडाकडे पुष्कळदां तें फणसाचें आहे असें म्हणत अंगुलिनिर्देश केला जातो. बोरीच्या झाडावर करवंदे कां पिकलीं नाहींत असा मूलभूत प्रश्न विचारला जातो. दुकानांत बसून चकाट्या पिटणारीं गांवांतलीं जुनीं खोडें मुंबईहून आलेल्या फॅशनेबल पोरींकडे किलकिल्या डोळ्यांनीं पाहून घेतात आणि मग वर्षभर तो विषय पानतंबाखूबरोबर चघळीत असतात. कोणाचा जांवई अधिक कर्तबगार ह्या विषयावर स्त्रीवर्गाच्या संभाषणांत गनिमी काव्याच्या चकमकी झडत असतात.

त्या वर्षीदेखील हे सर्व प्रकार बखेड्यांत घडत होते. आया आपल्या मुलांवर सुदृढ होण्याकरितां दूध पिण्याची जबरदस्ती करीत होत्या, आणि मुलें तें न ऐकतां रहस्यकथा वाचून आपली दुधाची तहान ताकावर भागवीत होतीं. तरुण पोरी तासभर तयारी करून पंधरा मिनिटें फिरून येत होत्या. आणि त्यांना पाहून जुनी खोडें वडीलकीच्या अधिकारानें हांका मारून म्हणत होतीं;—'काय ग, कॉलेजात आहेस नाहीं का तूं आतां? कुठचें कॉलेज? मग बी. ए. होणार म्हणायची तूं! वा वा!' मोलकरणी मुंबईकर पाहुण्यांकडून गोड बोलून पातळें वसूल करीत होत्या. पोराबाळांच्या बाबतींत केलेले नवस पुरे केले जात होते. आणि दक्षणा उपटण्याकरितां लुटुलुटु धावून गावांतले उपाध्याय थकून गेले होते. लग्नाळू मुलींच्या आया कॉलेजांतल्या पोरांकडे आशाळभूत नजरेनें पहात होत्या. आणि तीं पोरे त्यांच्या मुलींवर नजर ठेवून होतीं.

पण हें सगळें होत असलें तरी जांवई कोणाचा श्रेष्ठ ह्याबद्दल मात्र त्या वर्षी चकमकी घडत नव्हत्या. कारण मुंबईहून आलेला देसायांचा जांवई सर्वांत श्रेष्ठ असें सर्वांना मान्य करणें भाग पडलें होतें. प्रो. वाघ त्याचें नाव. कुठल्याशा कॉलेजांत ते प्रोफेसर होते. इतकेंच नव्हे, तर ते सामाजिक कार्यकर्ते होते. दर आठवड्याला एक तरी जाहीर व्याख्यान देऊन ते समाजसेवा करीत असत. आणि जाड मथळे देऊन वर्तमानपत्रें ही समाजसेवा अखिल महाराष्ट्राला जाहीर करीत असत. त्यांचे रूढिभंजक आणि बुद्धिवादी लेख महाराष्ट्रांतल्या पुरोगामी मासिकांतून छापून येत असत. अलीकडे तर त्यांनीं कशाच्या तरी विरुद्ध आघाडी उघडली होती. आणि आतां श्रेष्ठ पुढारी होण्याकरितां त्यांनीं एकच गोष्ट करायची शिल्लक राहिली होती. अजून त्यांनीं फंड गोळा केला नव्हता!

प्रो. वाघ नेहमीं विनोदी बोलत असत आणि स्वतःच मोठ्यानें हसत असत! 'मी अमक्याअमक्याला असें सांगितलें आणि मग तो चुपचाप बसला,' हें त्यांच्या बोलण्याचें नेहेमींचें पालुपद असे. आणि ऐन मोक्याच्या प्रसंगीं आपण कसे धीरोदात्तपणें वागलों हें सांगणें त्यांना विशेष आवडत असे. एकदां मोटारीचा अपघात होतोय असें वाटल्यावर आपण डोळे घट्ट मिटून स्वस्थ कसे बसून राहिलों त्याचें ते नेहमीं वर्णन करीत असत. आपलें कधीं बोट कापलें तर ते धीरोदात्तपणें बायकोला म्हणत, 'हं, उगीच आतां घाबरून

जाऊं नको. फार कांहीं झालेलें नाहीं. बोट कापलंय नुसतं. चटकन् आयोडिन आण आणि त्याला चिंधी बांधून टाक.' आणि ते धीरोदात्तपणें हसत असत.

आतां हें खरें, कीं एकदां एक नानेटी बघून प्रो. वाघ लगबगीनें घरांत परतून कॉटवर उडी मारून बसले होते; आणि मग तिथून खाली उतरावें असें त्याना दिवसभर वाटलें नव्हतें. काहीं दुष्ट लोक त्याच्या ह्या वागणुकीची बाजारांत बसून टिंगल करीत होते हें देखील खरें! पण बाजारांतून जाताना तोंडावर तुच्छता तरळत ठेवून प्रो. वाघ ह्या दुष्टपणाला मूक, पण परिणामकारक उत्तर देत असत.

एकंदरींत एप्रिल-मे महिन्याच्या मोसमात प्रो. वाघ ही बखेडें गांवांतील अतिशय प्रसिद्ध असामी झाली होती. ते आल्यामुळें देसायाच्या घरांतली माणसें इतराशीं बोलण्यासहि तयार नसत. प्रो. वाघाचें आदरातिथ्य करण्यांत तीं इतकीं मग्न होतीं, कीं त्याना बोलायला फुरसत मिळत नसे. आणि तशी फुरसत मिळालीच तर प्रो. वाघ ह्याचें गुणवर्णन करण्यातच त्यांचा सगळा वेळ खर्च होत असे. ह्यामुळें गांवातल्या एका चहाटळ माणसानें प्रो. वाघ ह्याची एक आरती रचली होती. पण स्वतःच रचलेल्या आरत्यांच्या आवाजात देसाई कुटुंबाला ही आरती सुदैवानें ऐकूं गेली नाहीं.

बखेडें गांवांतलें हें प्रो. वाघांचें महत्त्व ते मुंबईला परतेपर्यंत कायम टिकलें असतें; पण तेवढ्यांत ज्याचें नांव त्याच्या पूर्वजांनीं चोरलें होतें अशा प्राण्यानें बखेडें गांवांत प्रवेश केला. एक खराखुरा वाघ बखेडें गांवांत एका रात्रीं आला आणि उकडतें म्हणून अंगणांत झोपलेल्या एका जावईबापूच्या पायगतीं असलेलें कुत्रें घेऊन तो पळून गेला. जावईबुवांना रात्रीं 'क्याक्' असा आवाज ऐकूं आला; पण त्यांनीं त्याकडे दुर्लक्ष केलें. पण सकाळीं जेव्हां तें कुत्रें वाघानें नेल्याचें त्यांच्या निदर्शनास आणण्यांत आलें तेव्हां त्यांचें कुठेंच लक्ष लागेनासें झालें. सासूबाईनीं केलेली माशाची आमटी खाताना आपल्यालाहि वाघानें असेंच खाल्लें असतें ह्या जाणीवेनें त्यांच्या डोळ्यांतून अश्रू आले. आणि दुपारीं ते निजलेले असतांना जेव्हां त्यांच्या बायकोनें त्यांच्या अंगाला हात लावला तेव्हां ते किंचाळून उठले आणि उखळीआड लपून बसले. आणि

दुसऱ्या दिवशीं लगबगीनें खास कामानिमित्त मुंबईला जायला निघाल्यावर त्यांच्या मनांत असा खिन्न विचार आला, कीं आपण परत येऊं तेव्हां ह्य सगळ्या माणसांना वाघानें खाल्लेलें असेल.

त्या दिवशीं वाघानें एक कालवड खाल्ली. आणि मग गावांत एकच खळबळ उडून राहिली. गांवांतल्या लफड्याकुलंगड्यांना रजा देऊन, सगळ्यांच्या जिभा वाघाचे लचके तोडूं लागल्या. खुद्द देसायाच्या घरीं, प्रो. वाघांच्या समोर, त्यांच्याशिवाय इतर विपयांवर लोक बोलूं लागले. आणि खुद्द प्रो. वाघानीं देखील 'वाघाला खिडकीचे गज काढतां येतात का,' असा प्रश्न त्या रात्रीं झोपण्यापूर्वी विचारला.

असें त्या गावांत वाघाचें माहात्म्य वाढलें. वाघाच्या भीतीनें गडीमाणसें उशीरां कामावर येऊं लागलीं आणि लवकर घरीं जाऊं लागली. रात्रीं अंगणात बसून गप्पा मारण्यात कांहीं विशेष मौज आहे असें कोणालाच वाटेनासें झालें. खंड देण्याची बोली करून बसलेले लांबचे शेतेली, वाघाची बातमी ऐकून आपलें बखेड्यास जाणें पुढें पुढें ढकलूं लागले. आणि शेताच्या खर्चाकरितां पैसे मागायला आलेले शेतेली 'एकदमच बरेच पैसे देऊन ठेवा, म्हणजे पुन्हा पुन्हा येण्याचा धोका पत्करायला नको,' असें गंभीरपणें म्हणूं लागले. गांवांतल्या प्रत्येकाला वाघ कुठेना कुठें दिसत होता. कुणाला तो शेतांत दिसला. कुणीं त्याला झाडाच्या आडव्या फांदीवर चढून बसलेलें पाहिलें, तर कुणी त्याला तळ्यांत पोहतांना पाहिल्याचें शपथेवर सांगितलें. रोज रात्रीं वाघ कुणाच्या तरी वाडींत शिरून, माडावरचे नारळ पळवूं लागला. त्याचा बहुधा नारळांचा व्यापार असावा! त्याच्यामुळें दुकानदारांची उधारी थकूं लागली. आणि गांवांतल्या शिप्याजवळ जेव्हां महिन्यापूर्वी शिवायला दिलेले कपडे कोणी एकानें मागितले तेव्हां तो म्हणाला, "अहो! गांवांत वाघ आलाय आणि तुम्ही कपडे कसले मागतां? कमाल आहे तुमची तरी!"

जणूं गांवांतल्या इतक्या माणसांच्या दृष्टीस पडायचें असल्याकारणानें, वाघानें कपडे शिवायचें ठरवलें होतें आणि त्या शिप्याला तातडीनें तीनचार सूट बनवायची आर्डर दिली होती!

ह्या सर्व गोंधळांत प्रो. वाघ अत्यंत धीरोदात्तपणें वागत होते. वाघाला

खिडकीचे गज काढतां येत नाहींत इतकी माहिती मिळतांच त्यांनीं वाघाविषयीं विचार करावयाचें सोडून दिलें. मात्र ते टेकडीवर फिरायला जायचे थांबले आणि रात्रीं झोपतांना आपल्या खोलीला आंतून कुलूप लावून घेऊं लागले हें खरें. वाघ छपरावर चढून कौलें दूर करून खोलीत प्रवेश करूं शकेल कीं काय, अशी शंका त्यांच्या मनांत घोळत असावी, असा तर्क करायला जागा आहे. आणि आपण शिकार करायची इच्छा व्यक्त केली होती ह्या गोष्टीची आपल्यालाच नव्हे, तर इतरांनाहि आठवण होऊं नये अशी खबरदारी ते घेत होते हेंहि खरें. पण ते सिगरेट ओढायचे थांबले नव्हते. आणि रोजचा 'टाइम्स' ते अविचलित चित्तानें वाचीत असत.

पण एक दिवस ते विचारमग्न अवस्थेंत चहा पीत असतांना त्यांचा मेव्हणा त्यांना अवचितपणें म्हणाला, "तुम्ही शिकारीला जाणार होतात त्याचं काय झालं?"

त्यासरशीं प्रो. वाघाच्या कपानें बशींत थोडेंसें धोकादायक नृत्य केलें. प्रो. वाघांनीं चहाचा फार मोठा घुटका गिळल्यामुळें, त्याच्या घशांतल्या गोळ्यानेंहि तसेंच नृत्य केलें आणि प्रो. वाघाना लांबलचक ठसका लागला.

पण प्रो. वाघाचा ठसका कितीहि लांबला आणि त्यामुळें जरी त्यांच्या सासूबाईंचा जीव कितीहि कासावीस झाला तरी त्या मेव्हण्याची इच्छा दबली नाहीं.

तो प्रो. वाघांना म्हणाला, "खरंच, शिकारीला चला तुम्ही. मीदेखील येतों तुमच्याबरोबर. नाहीं तरी नुसतं बसून कटाळाच येतो इथें."

वाघ आपलें धीरगंभीर हास्य करून म्हणाले, "शिकारीचं काय! केव्हांहि जातां येईल."

तसं मेव्हणा म्हणाला, "मग चला तर आतांच! मीं बंदूक साफ करून ठेवली आहे."

प्रो. वाघ डोळे विस्फारून म्हणाले, "आत्तां?"

त्यावर मेव्हणा जोरानें म्हणाला, "हो ना! आपला स्वभाव तुमच्यासारखाच आहे. मनांत येईल तें ताबडतोब करून टाकायचं!"

स्वतःच्या स्वभावाविषयीं अशीं विधानें करणें इतकें धोक्याचें असेल अशी प्रो. वाघांना कल्पना नव्हती. त्यांनीं सभांतून देवाविषयीं, विश्वाविषयीं आणि

राजकारणाविषयीं अनेक बेफाट विधानें बिनदिक्कतपणें केलीं होतीं. पण त्यांतलें एकहि असें त्यांच्यावर उलटलें नव्हतें. जनतेहून मेव्हणा हा अधिक धोकादायक असतो हें पुरातन सत्य त्या पुरोगामी मनुष्याला माहीत नव्हतें. निरुपाय होऊन शक्य तो उजळ चेहऱ्यानें प्रो. वाघ म्हणाले, "हो ना! जायचं तर आतांच जाऊं या."

तेवढ्यांत त्यांच्या सासूबाई लगालगा करीत दाराशीं आल्या आणि मुलाला म्हणाल्या, "आता कशाला रे शिकारीला जातां? गावात वाघ आलाय तो गेला म्हणजे होऊं दे काय ती शिकार!"

प्रो. वाघाच्या जिवात जीव आला. ते म्हणणार होते, 'हो, सध्यां कशाला उगीच!'

पण ते बोलायच्या आधींच त्यांचा उत्साही मेव्हणा म्हणाला, "अग, वाघ गेल्यावर मग शिकार कुणाची करायची? त्यांतून हे वाघाला थोडेच घाबरणार आहेत!"

प्रो. वाघांची पुन्हा निराशा झाली आणि तरी उजळ चेहरा करून ते म्हणाले, "हातांत बंदूक असल्यावर भीति कसली! आला वाघ कीं टाकूं उडवून त्याला!"

आणि लीलेनें त्यानीं बंदूक उडवल्याचा अभिनय केला. तो अभिनय इतका परिणामकारक होता कीं त्यामुळें बंदूक खरोखरच उडाली आणि बंदुकीची गोळी दारांत उभ्या असलेल्या सासूबाईच्या शेजारून जाऊन मागील दारानें बाहेर पडली आणि मागील अंगणांत वाळणाऱ्या सासरेबुवाच्या धोतराला भोक पाडून, आंब्याच्या झाडाच्या खोडांत शिरली.

त्यामुळें सासूबाई जागच्या जागीं हादरल्या आणि धावत स्वयंपाकघरांत जाऊन दार बंद करून व डोळे घट्ट मिटून झोपून राहिल्या. प्रो. वाघांच्या पत्नीनें सगळ्या मुलाबाळांना गोळा करून दुसऱ्या खोलीत नेलें आणि दार बंद करून घेतलें.

ह्या सर्वांना जितकें आश्चर्य वाटलें नव्हतें तितकें प्रो. वाघांना वाटत होतें. आश्चर्यानें ते बंदुकीकडे पहात होते. तेवढ्यांत त्यांचा मेव्हणा किंचाळला, "हां! हां! माझ्याकडे नका वळवूं बंदुकीची नळी!"

प्रो. वाघांनीं घाबरून बंदुकीची नळी दुसरीकडे वळवली आणि नंतर ती आपल्याकडेच वळली आहे असें ध्यानांत येताच त्यानीं डोळे घट्ट मिटून घेतले.

त्यांचा मेव्हणा त्यांच्या हातातली बंदूक काढून घेत म्हणाला, "मला वाटलं, तुम्हांला बंदुक चालवतां येत असेल म्हणून. तुम्हींच नव्हतं का सांगितलं कीं तुम्हीं शिकार केलेली आहे म्हणून ?"

आपला मेव्हणा फार भयंकर प्राणी असल्याचें प्रो. वाघ यांच्या ध्यानांत येत होतें. आणि आपल्याला पोहता येतें असें आपण म्हटल्याकारणानें त्यानें आपल्याला पाण्यात ढकलून कसें दिलें नाही व तुम्ही बुडता का व कसे असा प्रश्न का विचारला नाहीं ह्याबद्दल ते आश्चर्य करूं लागले व त्याला दुवा देऊं लागले.

प्रो. वाघांच्या चिकट मेव्हण्यानें तोच प्रश्न पुन्हा विचारला, तेव्हां एकदम उत्तर सुचून प्रो. वाघ म्हणाले, "वा ! बंदूक उडवता येत नसती तर आता कशी उडवली असती ?"

त्या उत्तरानें प्रो. वाघाचें जितकें समाधान झालें तितकें त्यांच्या मेव्हण्यांचें झालें नाहीं. बंदूक आपल्याच हातात ठेवीत तो म्हणाला,

"चला."

बंदुकीची नळी आपल्याकडे वळलेली पाहून टुणकन् उडी मारून प्रो. वाघ म्हणाले, "हो हो! चला ना!"

वाटेंत प्रो. वाघानीं आपल्या मेव्हण्याकडून अशी खात्री करून घेतली की आपण वाघाची, रानडुकराची अगर ससाची शिकार करणार नसून फक्त पांखरांचीच शिकार करणार आहोंत. आणि नंतर त्यानीं आपल्य कौशल्यपूर्ण वक्तृत्वानें त्याला बरोबर एक नोकर माणूस घ्यायला लावलें. नोकराच्या कमरेला खोवलेला कोयता पाहून त्यांना विशेष बरें वाटलें. आपल्या बोलण्यावर विनोदाचें पुट चढवीत ते म्हणाले, "त्यानें कुऱ्हाड घेतली तरी आपली कांहीं हरकत नाहीं बुवा !"

हें बोलणें विनोदी आहे हें न समजून तो नोकर म्हणाला, "कुऱ्हाड कशाला ? आपण शिकार करायला जातोंय ना ? कीं लाकडें तोडायचीं आहेत ?"

अडाण्यासमोर विनोद केला म्हणजे हें असें होतें.

नोकर पुढें चालला होता. त्याच्या मागोमाग प्रो. वाघांचा मेव्हणा होता. आणि प्रो. वाघ मागून रेंगाळत चालले होते. मधूनमधून थांबून ते सृष्टि-शोभेचें निरीक्षण करीत होते. त्याकरितां आपल्या मेव्हण्याला थांबवीत होते.

गांवापासून जरा दूर आल्यावर प्रो. वाघ विनोदाच्या आवरणाखाली म्हणाले, "वाघोबा! इकडे येऊं नको बुवा! नाहीं तर नाहक आमच्या हातून मरशील. मरायचं तर एखाद्या मोठ्या साहेबाच्या हातून मर."

तो नोकर पुन्हा तुटकपणें म्हणाला, "इथं कसला आलाय हो वाघ? वाघ असणार तिकडे जंगलात."

आणि तो पुढं झाला. पण प्रो. वाघ पुढं सरकेनात. ते एका जाळकटींत दगड भिरकावून म्हणाले, "असा एखाद्या जाळकटींत असायचा देखील वाघ."

पण प्रो. वाघानाच नव्हे, तर खऱ्या वाघालादेखील विनोदबुद्धि असूं शकते. आणि त्यामुळेंच प्रो. वाघानीं ज्या जाळकटींत दगड मारला तिच्यातून खरोखरच वाघ बाहेर पडला.

काय होतंय् तें कळण्यापूर्वीच प्रो. वाघांनीं त्या वाघाकडे पाठ फिरवली आणि पळत पळत ते ओरडूं लागले, "झाडा, गोळी झाडा त्याच्यावर! घाबरूं नका. वाघाकडे पाठ फिरवली कीं तो अंगावर येतो."

प्रो. वाघाच्या मेव्हण्यानें घाईनें एक गोळी झाडली; पण वाघानें बहुतेक ती पेपरमिटाच्या गोळीसारखी खाऊन टाकली असावी, आणि मग झेप टाकून त्या नोकराला कांकडीसारखे खाण्याकरितां तो पुढें झाला.

वाघाची झडप पडतांच नोकर ओरडला, "गोळी घालूं नका. नाहीं तर मला फुकट माराल." आणि त्यानें कमरेचा कोयता काढला.

आणि त्याच वेळेला प्रो. वाघांचा मेव्हणा कमरेची पाटलोण सावरीत पळत सुटला. त्यानें पळणाऱ्या प्रो. वाघांची कॉलर पकडून त्यांना आपल्या मागं ढकललें आणि तो पुढें पळूं लागला. तेव्हां प्रो. वाघानीं चपळाई करून त्याची कॉलर पकडून त्याला मागे ढकललें आणि ते पुढें पळूं लागले. वाघाचें भक्ष्य दुसऱ्यानें व्हावें असा प्रत्येकाचा प्रयत्न होता. अशा प्रयत्नांतच ते दोघे घरीं पोंचले. दोघांनीं एकाच खोलींत प्रवेश करून आतून दार लावून घेतलें. मग खिडक्या बंद केल्या, आणि एकमेकांना मिठ्या मारून पांघरुणें घेऊन ते झोपले.

इकडे काशाचा—त्या नोकराचा—एक हात वाघानें डांसाळला आणि आपल्या पंज्यानीं त्याचें अंग फाडलें. पण तेवढ्यात त्याच्या हातातल्या कोयत्याच्या वारानें वाघाचा मागचा पाय जायबंदी झाला. दुसरा घाव वाघाच्या डोक्यावर तिरपा बसला. त्यानंतर काशानें वाघाला ठार मारलें आणि तेथून गावाकडे परतण्याचा प्रयत्न करीत असताना तो वाटेंतच बेशुद्ध झाला.

आणि प्रो. वाघ व त्यांचा मेव्हणा ह्याना भरलेली हुडहुडी कमी होईपर्यंत व त्यांची दांतखीळ उघडेपर्यंत काशाला तसेंच बेशुद्ध पडून रहावें लागलें असतें तर तो मेलाच असता ! पण सुदैवानें त्या वाटेनें जाणाऱ्या एका माणसानें त्याला पाहिलें आणि त्याची व्यवस्था केली. काशाला शेजारच्याच तालुक्याच्या गावच्या हॉस्पिटलमध्यें पोंचवण्यांत आलें.

प्रो. वाघ एवढे पट्टीचे वक्ते, पण त्यांच्या तोंडांतून एक अक्षरहि बाहेर पडत नव्हतें. चमचा घालून त्याची दातखीळ उघडावी लागली आणि त्यांच्या तोंडांत ब्रॅडी ओतावी लागली, तेव्हां कुठें त्यांची हुडहुडी कमी होऊन त्यांच्या तोंडांतून शब्द फुटूं लागले. दोन दिवस ते वाघ ह्या विषयावरच तुटकपणें बडबडत होते. भाषण म्हणजे विषयान्तर असें समीकरण असलेल्या या महाराष्ट्रात, एकाच विषयावर दोन दिवस सतत बोलून प्रो. वाघ ह्यानीं एक विक्रमच प्रस्थापित केला असें म्हटलें पाहिजे.

पण वाघ ह्या विषयाची प्रोफेसरमजकुरांच्या मनावर जी जबरदस्त पकड होती ती कमी झाल्यावर मात्र त्यांची तल्लख बुद्धि कामाला लागली. झालेल्या प्रसंगाचा वाईट अर्थ लोकांकडून लावला जाणें किती शक्य आहे हें त्यांच्या ताबडतोब ध्यानांत आलें. एखादा चावट वार्ताहर असल्या अफवाचा किती दुष्ट उपयोग करूं शकेल ह्याची जाणीव होतांच प्रो. वाघाचा जीव कळवळून गेला. आपल्या व्याख्यानांतून जीवननिष्ठेचा ऐसपैस संदेश देणें ह्या अफवांनीं कसें दुर्घट होईल तें त्याच्या डोळ्यांसमोर लकाकूं लागलें.

ह्या सगळय गोष्टी ध्यानांत येतांच प्रो. वाघांनीं ताबडतोब आपल्या मनांत एक योजना तयार केली, आणि ते तडक काशाला जेथें ठेवलें होतें त्या हॉस्पिटलमध्यें गेले. काशा शुद्धीवर आला होता आणि हळूहळू सुधारत होता. प्रो. वाघ तेथें पोंचले व काशानें भिंतीकडे तोंड फिरवलें आणि मग थोड्या

वेळानें तो विचार करून म्हणाला, " निदान तुम्हीं गोळी घालून मला मारलं नाहींत हें काय थोडं झालं ? "

प्रो. वाघ ह्यांना काशाचा हा दृष्टिकोण मुळींच पसंत पडला नाहीं. आणि त्यांत इष्ट ते फेरफार करण्याकरितां त्यांना जाहीर सन्मान, थैली वगैरे गोष्टींची माहिती काशाला द्यावी लागली. बऱ्याच वेळानें काशाच्या डोक्यांत प्रकाश पडला, कीं आपण वाघ मारल्याबद्दल सगळ्या लोकांच्या समोर आपल्या गळ्यांत हार घालायचा आणि आपला हात जायबंदी झाल्यामुळें आपल्याला एक थैली म्हणजे बरेचसे पैसे द्यायचे, असा प्रो. वाघ यांचा विचार आहे.

तें समजल्यावर काशा खूष झाला आणि म्हणाला, " वाघानें हात खाल्ल्यावर असे पैसे मिळतात हें माहीत असतें तर मीं माझा दुसरा हात पण त्याच्या तोंडात दिला असता. "

ह्यावर प्रो. वाघ ' गरीब बापडा ' असें मनाशीं म्हणत उदारपणें हसले आणि ह्या बोलण्याचा कुठच्या तरी व्याख्यानांत परिणामकारक उपयोग करण्याचें त्यांनीं मनाशीं ठरविलें.

त्यानंतर वाघ मारतेवेळीं खरोखर काय झालें ह्याविषयीं काशाच्या मनांत ज्या चुकीच्या कल्पना होत्या त्या प्रो. वाघांनीं कुशलतेनें दूर केल्या. ' गोळी झाडूं नका, फुकट मला माराल ' असें आपण ओरडल्याचा काशाला भास होत होता. त्याचप्रमाणें प्रो. वाघ व त्यांचा मेव्हणा ह्यांना अतिशय वेगानें अदृश्य होतांना आपण पाहिलें असेंहि त्या वेड्याला वाटत होतें. पण प्रो. वाघांनीं त्याला समजावून सांगितलें, कीं ते व त्यांचा मेव्हणा ह्यांनीं काशाला वाघ मारायला महत्त्वाची मदत केली. तो वाघाचा एक पाय तोंडीत असतांना त्यांनीं वाघाचा दुसरा पाय व शेपटी धरून ठेवली होती. आणि वाघ मारल्यावर ते पळत सुटले होते ते केवळ काशाला मदत पाठविण्याच्या हेतूनें !

प्रो. वाघांनीं ताबडतोब आपला व काशाचा फोटो काढून घेतला आणि मुंबईच्या वर्तमानपत्रांत छापवून आणला. त्यासोबत एक कॉलमभर मजकूरदेखील प्रो. वाघ ह्यांनीं पाठविला होता. त्यांत त्यांनीं काशापेक्षां स्वतःचाच उल्लेख अधिक वेळां केलेला होता. संपादकांनीं त्यांत फेरफार करून स्वतःचा उल्लेख त्यांत केला. आपण बखेडें गांवांत मागें एकदां व्याख्यानाला कसे गेलों होतों तें

त्यांनीं खेळकरपणें लिहिलें आणि प्रो. वाघांची व आपली दोस्ती कशी आहे तें लिहून अखेर प्रो. वाघांनीं काशा नांवाचा वाघ मारल्याचा निर्देश केला.

हें झाल्यावर प्रो. वाघांनीं निधी जमवायला सुरुवात केली. स्वतः पन्नास रुपयांचा घसघशीत आंकडा घातला. मुद्दाम पावतीपुस्तक छापून घेतलें आणि हजार रुपये जमा केले.

काशा बरा झाल्यावर गांवांत त्याच्या गौरवार्थ एक मोठी सभा भरविण्यात आली. नेहमींप्रमाणें कस्टम्समधले रिटायर्ड सुपरिंटेंडंट श्री. भाऊसाहेब पारकर अध्यक्षस्थानीं होते. व्यासपीठावर इतर आठदहा अण्णासाहेब, नानासाहेब वगैरे मडळी होती. पण काकासाहेब व दादासाहेब वगैरे मंडळींनां व्यासपीठावर खुर्च्या न दिल्यामुळें ती चिडून हमरीतुमरीवर आली. त्यांच्यापैकीं एकानें तर खुद्द भाऊसाहेब पारकरांवर छत्री उगारली. खूपच बोलाचाली झाली आणि अखेर ती मंडळी खुर्चीवर नाहीं तर नाहीं, पण व्यासपीठावर बैठक मारून बसली. ह्या भानगडींत काशाला व्यासपीठावर बसायला जागा राहिली नाहीं. म्हणून तो खालीच उभा राहिला. तेव्हां प्रो. वाघांनीं धावत जाऊन त्याला व्यासपीठावर आणलें आणि टाळ्यांच्या गजरात आपल्या खुर्चीवर बसवलें. मग काशा शरमून उभा राहिला आणि प्रो. वाघ पुन्हा स्थानापन्न झाले.

सुरुवातीला शाळेच्या हेडमास्तरांनीं आपण स्वागतपर गीत रचल्याचें सभेला सांगितलें आणि मग तें म्हणणाऱ्या मुलांत भाऊसाहेब पारकर ह्यांचा मुलगा असल्याचा उल्लेख केल्यावर, भाऊसाहेब पारकर हे कसे थोर गृहस्थ आहेत ह्या नेहमींच्या विषयांवर त्यांच्या भाषणाची रेकॉर्ड पुन्हापुन्हा अडखळत राहिली अर्धा तास हा प्रकार झाल्यावर पंधरा मिनिटें स्वागतगीत झालें.

स्वागतगीतानंतर भाषणांना प्रारंभ झाला. पहिल्या वक्त्यांनीं, आपण काशाला दारू पिऊं नये असें एकदां कसें सागितलें होतें व एकदां त्यानें केलेली नारळांची चोरी कशी माफ केली होती तें सांगितलें, आणि आतां एवढा मोठा वाघ मारल्यानंतर तरी तो नारळांच्या चोऱ्या करणार नाहीं अशी आशा व्यक्त करून त्यांनीं भाषण संपवलें व स्वतःच टाळ्या वाजवीत ते खालीं बसले. तोंच ते एकदम पुन्हा उठले आणि प्रो. वाघ हे थोर गृहस्थ असल्याचें सांगून पुन्हा बसले. ह्यानंतर इतर थोर पुरुषांचीं नांवें त्यांना पुन्हा पुन्हा स्मरत होतीं आणि

र्ती सांगण्याकरितां ते पुन्हा पुन्हा उठण्याचा प्रयत्न करीत होते; पण प्रो. वाघ त्यांना मोठ्या कौशल्यानें आवरीत होते.

त्यानंतर शाळेच्या हेडमास्तरांनीं भाषण केलें. राणा प्रताप, शिवाजी, तात्या टोपे, लोकमान्य टिळक वगैरे थोर पुरुषाचा त्यानीं पुन्हा पुन्हा उल्लेख केला. काशाचें नावदेखील त्यांनीं एकदा घेतलें. आणि त्याचा मुलगा शाळेंत अभ्यास करीत नाहीं ह्याबद्दल दुःख व्यक्त केलें. ह्यानंतर आजची पिढी कशी बिघडत चालली आहे व शिक्षकवर्गाविषयीं ती कसा अनादर दाखवीत असते ह्या आपल्या आवडीच्या विषयावर ते कळवळून बोलले. आणि अखेर शाळेच्या बोर्डाचे अध्यक्ष भाऊसाहेब पारकर हे कसे थोर गृहस्थ आहेत तें सद्गदितपणानें सागून ते खालीं बसले—नव्हे, बसणार होते, पण इतक्यांत प्रो. वाघाचा मोठेपणा सांगण्याची त्याना आठवण झाली आणि तो पाचसहा मिनिटे सांगून मगच ते खालीं बसल्यावर त्याना शंका येऊं लागली कीं आपण भाऊसाहेब पारकरापेक्षां प्रो. वाघाची अधिक स्तुति केली असावी. त्यामुळें ते सभा संपेपर्यंत अस्वस्थ होते.

पुढच्या वक्त्यांनीं महात्मा गांधी हे सर्वांहून श्रेष्ठ आहेत असें संतापून सांगितलें. महात्मा गांधीपेक्षां दुसरा कोणी मनुष्य श्रेष्ठ असल्याचें सिद्ध करून दाखविण्याचें त्यांनीं हेडमास्तरना आव्हान दिलें, भाऊसाहेब पारकराना आव्हान दिलें, सगळ्या सभेला आव्हान दिलें. ते ओरडून म्हणाले कीं, 'वाघ मारण्यापेक्षां पासष्ट दिवस उपास करणें अधिक कठीण आहे.' आणि खराखुरा मोठेपणा मिळवायचा असेल तर काशानें पासष्ट दिवस उपास केला पाहिजे, असें सांगून ते खालीं बसले. तितक्यांत पुन्हा उठून त्यानीं प्रो. वाघाना आपलें समग्र भाषण वर्तमानपत्रांत छापून आणण्याची सोय करण्याची जाहीर विनंति केली.

ह्यापुढचे वक्ते तर इतके चवताळले कीं त्यांच्या तोंडांतून शब्दच फुटेना. बराच वेळ आपल्या हातांतली काठी ते आधींच्या वक्त्याच्या चेहऱ्याच्या रोखानें हलवीत होते. मग त्यांना एकदम वाचा फुटली आणि ते किचाळले, "अहो ! वाघ मारणें म्हणजे काय सोपी गोष्ट आहे ? आहे इथें कुणाची वाघ मारायची हिंमत ? हे काकासाहेब कशाला उगीच गोष्टी करीत आहेत ? मला त्यांच्याहून

आज जास्त पेन्शन मिळत आहे. वयानें देखील मी त्यांच्याहून मोठा आहें. मी सागतों कीं त्यांना वाघ मारतां यायचा नाहीं. आणि मी त्यांच्याहून वयानें मोठा असल्यामुळें त्यानीं माझें बोलणें ऐकून घेतलेंच पाहिजे !" ह्यानंतर सदरहू वक्त्यांची वाचा पुन्हा गेली आणि ते पुन्हा रागानें नुसतीच काठी हलवीत उभे राहिले. प्रो. वाघांनीं त्याना खाली बसविण्याचा प्रयत्न केला तेव्हां त्यांना पुन्हा वाचा फुटली, आणि प्रो. वाघ दूर होतांच पुन्हा त्याची वाचा गेली. असें दोनतीनदा झाल्यावर त्यांना जबरदस्तीनें खालीं बसवण्यांत आलें.

भाऊसाहेब पारकर तोंडांतल्या तोंडांत बोलल्यामुळें त्यांचें भाषण कोणालाच समजलें नाहीं. पण जुन्या काळीं शिस्त कशी कडक असे व गोरे साहेब लोकाकडून कशीं कामें करून घेत असत, त्याविषयींच ते बोलले असावेत. अखेर प्रो. वाघ आपला फोटो छापवून आणणार असल्याची बातमी त्यांनीं सर्वांना सागितली.

शेवटीं प्रो. वाघाचें भाषण झालें. आणि त्यांनीं इतकें अस्खलित आणि वीरश्रीयुक्त भाषण केलें, कीं लोकानी नुसता टाळ्यांचा कडकडाट केला. बरेचसे लोक 'महात्मा गांधीकी जय' असें ओरडले. प्रो. वाघांनींच वाघ मारला अशी सर्वांची खात्री पटली.

आणि नंतर शूर वीर काशा जेव्हा भाषण करायला उठला आणि आपल्याकडे टकमकां पहाणारे इतके लोक पाहून जेव्हां तो लटलटां कांपत मटकन् खालीं बसला, तेव्हां खरी शिकार प्रो. वाघानींच केली असली पाहिजे अशी सर्वांची अधिकच खात्री पटली !

★★★

# गंगाधर गाडगीळ यांची पुस्तकें

**कथासंग्रह**

मानस–चित्रें
कडू आणि गोड
नव्या वाटा
संसार
भिरभिरें
उध्वस्त विश्व
कबुतरें
खरं सांगायचं म्हणजे



**प्रवासवर्णन**

गोपुरांच्या प्रदेशांत

**नाटक**

वेड्यांचा चौकोन
पांच नाटिका

**अर्थशास्त्र**

आर्थिक प्रश्न आणि अर्थरचना

**बालवाङ्मय**

लखूची रोजनिशी
धाडशी चंदू